# मांडवावरील वेली—

( कथासंग्रह )

विष्णु विनायक बोकील

जुलै १९४१ ]

[ किंमत २-४-०

मित्राचें ऋण फेडावयाचें नसतें—
तसा प्रयत्न मी कधीच करणार नाही.
परंतु—फूल ना फुलाची पाकळी
या नात्यानें—

हा संग्रह

मित्रवर्य रामचंद्र काशिनाथ जोशी
(रुईकर)

यांस

**सादर समर्पण**

वि. वि. बोकील

# कथाक्रम



# वि. वि. बोकील यांचें वाङ्मय

प्रकाशित—

## कथासंग्रह

( १ ) वळवांचे पाऊस.

( २ ) गारांचा वर्षाव.

( ३ ) जलधारा.

( ४ ) उल्कापात.

( ५ ) बोकिलांच्या गोष्टी.

( ६ ) मांडवावरील वेली.

## कादंबरी

( ७ ) फोल आशा.

( ८ ) झंझावात.

( ९ ) दुसरी सांवली.

( १० ) मंगळागौरीच्या रात्रीं

## आगामी

( ११ ) भिकारी कुबेर ( कादंबरी )

( १२ ) बेबीची बहीण ( ,, )

( १३ ) ? ( कथासंग्रह )

( १४ ) लघुनिबंध ( निबंध )

# मांडवावरील वेली

## वसंताचें रामायण

मधून मधून जिभेचा शेंडा बाहेर काढून नाकाच्या टोंकाला लावण्याचा प्रयत्न करीत कपाळाला सतराशें साठ आठ्या घालून, छातीवर पुस्तक टेकवून वसंताचें एकाग्रतेनें वाचन चालू होतें. आश्चर्याची गोष्ट ही कीं, वाचतांना हुरूप येण्यासाठीं आईच्या नकळत लंपस करून आणलेली सुक्या मेव्याची बरणी तशीच तोंड उघडें ठेवून उभी होती. खाण्याचे बाबतींत वसंत 'कर्ज काढून तूप प्या' म्हणणाऱ्या चार्वाकाचा गुरू शोभलं असता. परंतु आज तो वाचनांत गर्क होऊन गेला होता त्याअर्थी वाचनविषय तसाच जबरदस्त असला पाहिजे यांत शंका नाहीं. पार्थिव गोष्टींपेक्षां कधीं कधीं आध्यात्मिक गोष्टीसुद्धां इतक्या मनोरंजक असूं शकतात तर !

खिडकीच्या तावदानावर आतांपर्यंत दोनचार पाकोळ्या स्मित नजरेनें त्याच्याकडे पाहून गेल्या, दोन भुंगे त्याच्याशीं बातचीत करायला आले होते तेही कंटाळून गेले. 'पकड मला' असें आव्हान देण्याकरतांच कीं काय दोन चिमण्याही घटकाभर त्या ठिकाणीं

टेकल्या—परंतु, छेः ! वसंताला आज असल्या फालतू गोष्टींकडे लक्ष पुरवायला मुळींच वेळ नव्हता. मध्येंच पायाला रग लागल्यामुळें त्यानें एक तंगडी झटकारली त्यासरशीं मेव्याची बरणी पालथी झाली. एक क्षणभरच वंसतानें थांबण्याचा विचार केला असेल—पण क्षणांत त्याचा मोह नाहींसा झाला. जगबूड आली तरी कुछ पर्वा नहीं या थाटांत त्यानें बरणीकडे ढुंकूनही न पाहतां आपली वाचन-तपश्चर्या तशीच अविरत णें चालू ठेविली. उगाच नाहीं माणसें जगांत महत्पदास पोहोंचत ! पानामागून पानें ओल्य, बोटानें सरकवलीं जात होतीं. हाताचीं बोटें आणि जीभ आपलीं कामें अत्यंत कसोशानें पार पाडीत होतीं. वाचन चाललेंच होतें—

**'ज्येष्ठ भावाला पित्यासमान मानून, लक्ष्मणानें चौदा वष त्याच्याबरोबर वनवासांत अतिशय हालअपेष्टा सहन करीत घालविलीं. ही त्याची बंधुनिष्ठा खरोखरीच जगाच्या इतिहासांत अपूर्व अशीच होय. अशा तऱ्हेची तत्त्वनिष्ठ आणि ध्येयवादी माणसें ज्या भरतभूमींत जन्म घेतात तो देश संस्कृतिदृष्ट्या मागें पडेल असें कालत्रयींही घडून येणें शक्य नाहीं—'**

आतां पुढें मजकुराचीं पानें संपून पुराणिक आणि मंडळी यांची चातुर्मासांत वाचण्यास उपयुक्त अशीं पुस्तकें त्यांच्या टपाल खर्चाच्या आंकड्यासह दिलेलीं असल्यामुळें वसंताचें वाचन आटोपलें. ज्या गाडींतून शें दोनशें मैलांचा प्रवास करून यावा ती सोडून स्टेशनबाहेर पडतांना जितकें त्याला वाईट वाटत असे तितकें तें पुस्तक हातावेगळें करतांना त्याला वाटलें. काय लोक तरी असतात पहा—शंभर पानांऐवजीं हजार पानें लिहिलीं असतीं तर याचें काय बिघडलें असतें ? पण मग लहान मुलांना छळता कसें येईल ! वसंताची पुस्तकाच्या अखेरची उत्सुकता सुरवातीस मुळींच नव्हती म्हटलें तरी चालेल.—हें पुस्तक त्याच्या हातांत आलें कसें—? पुस्तकें ही चीज दुरून पाहण्याकरितां असते—विकत घेण्याकरतां मुळींच नाहीं ही महाराष्ट्रीय मनोवृत्ति वसंतांत पुरेपूर बाणलेली होती. पैशानें पेपरमिंट विकत घेतां येतें, चिकी विकत घेतां येते;—पुष्कळ पैसे असतील तर क्रिकेटची बॅट किंवा चेंडू विकत घ्यावयाचा असतो. दरवर्षी पास झाल्यानंतर नवीन वर्गाचीं पुस्तकें खरेदी करीत असतांना त्याला पास झाल्याचा अतोनात पश्चात्ताप होत असे. वडिलांना त्यानें या अनाठायीं खर्चाची बचत करण्याविषयीं अप्रत्यक्षरीत्या कितीतरी वेळां समजावून

सांगण्याचा प्रयत्न करून पाहिला होता. पण जेव्हां वडील 'तू बंद करतोस का–' असा सवाल टाकीत तेव्हां तो, जीव बचावणं हा सुद्धां कांहीं कमी शौर्याचा भाग नाहीं, या पोक्त विचारानें 'बंद' करीत असे. परंतु राहून राहून त्याला वाईट वाटे, कीं वडिलांच्या लहानपणापासून झालेला पुस्तकांचा खर्च, थोरल्या भावाच्या कॉलेजांतील पुस्तकांचा चालू खर्च, थोरल्या बहिणीच्या शालेय पुस्तकांचा खर्च आणि त्यांत आपल्याही पुस्तकांचा खर्च—हा एवढा पैसा खर्च करणं म्हणजे केवढा जुलूम आहे! एवढ्या पैशांत सदाशिवपेठ भरून चॉकलेट आणि लिमलेट विकत घेतां आलं असतं. आणि मग जन्मभर आपण भाताला नि पोळीला शिवलोंसुद्धां नसतों.

वडील माणसें ही एक और चीज आहे, हा त्याचा ठाम ग्रह होऊन बसला होता. नाहीं तेथें खर्च करतील आणि पाहिजे तेथें नाहीं म्हणून अडून बसतील.

परंतु या पुस्तकानें त्याची दृष्टि थोडीशी निवळली होती. कांहीं कांहीं पुस्तकें बरीं असतात असें त्याला वाटूं लागलें होतें. पण तीं विकत घेणें म्हणजे मूर्खपणाचें होईल—आतां बक्षीस म्हणून एकाद्यानं दिलं तर हरकत नाहीं. आणि असेंच बक्षीस म्हणून हें पुस्तक त्याला शाळेकडून मिळालें होतें.

वसंतानें शेजारच्या बंगल्यांत राहणाऱ्या आपल्या दोस्त वामनाच्या कुजक्या बोलण्याला आव्हान म्हणून शाळेच्या संमेलनप्रसंगीं भरविण्यांत आलेल्या मर्दानी सामन्यांत १०० यार्ड पळण्याच्या शर्यतींत भाग घेतला होता. आणि मौजेची गोष्ट ही कीं त्याचा दुसरा नंबर आला. त्याचें त्यालाच या अनपेक्षित प्रकाराचें आश्चर्य वाटलें. कदाचित् घरांतल्या चारही वडील माणसांच्या हातून निसटण्याकरितां आपण वारंवार पळतों त्यामुळें पायांना संवय झाली असेल या विचारानें त्यानें आपली समाधानी करून घेतली. ह्या आपल्या भरमसाट कौशल्याबद्दल आपल्याला निदान एक खोलीभर पेपरमिंट, दहापांच बॅटी आणि वीस पंचवीस चेंडू इतकी बक्षिसी तरी रास्तपणें मिळावी या सुखस्वप्नांत तो बरेच दिवस गुंग होता. परंतु जेव्हां एका ढेरपोट्या अध्यक्षमहाराजांच्या हस्तें एक बालरामायणाची चोपडी त्याच्या हातांत पडली तेव्हां डोक्यावर आभाळ पडावें त्याप्रमाणें तो स्तंभितच झाला. त्या कृतघ्नपणाची त्याला भयंकर चीड आली. काय अन्याय आहे! गृहस्थ अध्यक्ष होतो, ऐटींत खुर्चीवर बसतो, तासभर 'खरें बोला' म्हणून सांगून आमचें डोकें उठवतो आणि काय

देतो तर एक ल्हानसें पुस्तक ! असलीं पुस्तकंच जर द्यायचीं होतीं तर पळायला तरी कशाला लावावं मुलांना ?

सर्वांनीं त्याचें कौतुक केलें पण वसंताचा हिरमोड झाला. कधींही स्वप्नांतसुद्धां चांगलें न म्हणणाऱ्या वडिलांनींसुद्धां आपल्याकडे थोडा वेळ टक लावून पाहिलें हें त्याच्या लक्षांत आलें होतें. आईनें तर काय त्या दिवशीं त्याला फडताळाच्या किल्ल्या देऊन त्याचा यथोचित गुणगौरव केला. थोरल्या भावानें म्हणजे शरद्नें त्याला दिवाळींत एक बॅट देण्याचें कबूल केलें. आणि सिंधूनें म्हणजे बहिणीनें आपलें मोडकें फाउंटनपेन दुरुस्त करून देण्याचें कबूल केलें. अध्यक्षांनीं केलेल्या अपमानाची थोडी फार भरपाई या आश्वासनानें होण्याजोगी होती म्हणून वसंत स्वस्थ बसला. परंतु त्यानें वामनजवळ बोलून दाखविलें कीं 'मी मोठा होऊं दे, असाच मीही अध्यक्ष होईन अन् त्या कालच्या अध्यक्षाला माझें मराठी चौथीचें फाटकं पुस्तक देईन. मग असा जिरेल कीं नाहीं—' परंतु वामननें आपल्या एक वर्षाच्या अधिक्याला जागून शंका प्रदर्शित केली कीं, 'तुला अध्यक्ष करतीलच कशावरून ? अन् कालचा अध्यक्ष पळण्यांत दुसरा नंबर कशावरून येईल ? कदाचित् तो पळणारही नाहीं.'

पण असल्या किरकोळ शंकाकुशंकांना भिऊन कच खाणारा वसंता नव्हता.

'वेडा आहेस तूं. मला दुसऱ्या कोणी कशाला अध्यक्ष करायला पाहिजे ? माझा मीच होईन. मॅच खेळतांना मी नाहीं का कॅप्टन होत ? आणि तो कालचा अध्यक्ष पळेलच. नाहीं पळाला तर आमचा टाम्या त्यांच्या अंगावर सोडूं. आणि मग टाम्या पाहिला आणि अध्यक्षमहाराज दुसरे—! पुन्हां तुला शंका आली वाटतं ! तुला बऱ्या बुवा नेहमीं शंका येतात. वर्गांतसुद्धां तूंच नेहमीं मास्तरांना शंका विचारतोस ! मला कशा कधींच शंका येत नाहींत ?' वसंत आश्चर्यानें म्हणाला.

'तूं कधीं वाचून येत नाहींस. तुला कशा शंका येणार ?' वामननें सवाल टाकला.

'म्हणजे हा बरा धंदा आहे. शंका याव्यात म्हणून वाचायचं होय ! आमचा शरद सांगत होता कीं दगडाला नेहमींच शंका असतात.'

'म्हणजे मी दगड होय ?' वामन अवसानानें म्हणाला.

'मी म्हणालों आहे का तुला दगड ? नुसतं माझा भाऊ काय म्हणाला तें तुला सांगितलं—' वसंत सावधगिरीनें म्हणाला.

'तूं दगड आहेस–मास्तर तुला नेहमीं म्हणतात–' वामन ओरडून म्हणाला.

आणि किरकोळ झटापट होऊन या आठवड्यांतील नववें भांडण त्या दोघां जिवलग दोस्तांत निर्माण झालें.

तेव्हां भांडणामुळें दोस्ताशीं अबोला, रविवार म्हणून शाळेला सुटी, बाहेर जावें तर वडील पुढच्या माडींत बसलेले, घरांतल्या घरांत गाणें म्हणत बसावें तर आईला आपलें गाणें आवडत नाहीं, अशा स्थितींत सहज चाळा म्हणून वसंतानें तें पुस्तक चाळायला सुरवात केली. नाहीं तर वाचणें, अभ्यास करणें आणि कोणीही सांगितलेलें काम वेळच्या वेळीं करणें या गोष्टी अकरा वर्षांच्या उभ्या आयुष्यांत त्यानें, सावकाराच्या वाटा ज्या तत्परतेनें एखादा ऋणको टाळतो त्याप्रमाणें अत्यंत कसोशीनें टाळल्या होत्या.

पुस्तक खालीं ठेवल्यावर आडव्या बरणीकडे त्याचें लक्ष गेलें. एक मूठभर बोकाणा भरीत असतां त्याचा मेंदू दुसरीकडेच गुंतला होता.—

लक्ष्मणाप्रमाणें आपल्यालाही शरदची सेवा करतां येईल. आपणही त्याला पित्यासारखें मानूं. आहे काय त्यांत ? पित्यासारखें मानणें तितकेंसें कांहीं अवघड नाहीं. वेडावून दाखवूं नये, त्याच्या खिशांत हात घालून त्याच्या पेन्सिली घेऊं नयेत, तो कॉलेजांत खेळायला चालला म्हणजे त्याची टेनिसची बॅट आपण घेऊन जावें म्हणजे झाली सेवा. पण शंका उद्भवली. राम वनवासांत होता आणि शरद तर पुण्यांतच आहे. परंतु या शंकेचें निराकरण त्यानें स्वतःशींच करून टाकलें. लक्ष्मणाप्रमाणें आपणही आपला भाऊ जेथें जेथें जाईल तेथें तेथें जाऊन त्याची सेवा केली पाहिजे—

सेवेच्या पवित्र विचारासरशीं तो ताड्कन् जागचा उठला. हातीं घ्याल तें तडीस न्या, या बोधवचनाच्या शिकवणुकीनें त्याला शाळेनें केव्हांच भारून टाकलें होतें. मग उगाच उशीर कां ? पुस्तकाकडे एकवार मोठ्या कौतुकमिश्रित आदरानें त्यानें पाहिलें. पुन्हां केव्हां तरी पुढें काय करावें असा प्रश्न पडला तर समजायला उपयोगीं पडेल म्हणून त्यानें तें पुस्तक आपल्या भोंवरे, तारांचे तुकडे इत्यादिकांच्या संग्रहांत मोठ्या आदरानें ठेवून दिलें आणि भावाची सेवा करण्यास प्रारंभ म्हणून खोलीबाहेर पडणार इतक्यांत त्याचें उपास्य-दैवतच दारांतून कडाडलेलें त्याला ऐकूं आलें—

'काय रे ए टोणग्या, ती बरणी कशाला आणली आहेस ?'

' कसली बरणी ? हं-हं, ती होय ? त्यांतली खडीसाखर मला पाहिजे होती—' मोठ्या कष्टानें नम्रतेचा आव आणून वसंतानें उत्तर केलें.

' तें समजलं मला--! पण घरांतल्या माणसांना विचारण्याची कांहीं जरूरी आहे कीं नाहीं ? ' शरद्‌नें मोठ्या भावाच्या गांभिर्यानें विचारलें.

' आई नेहमीं म्हणते कीं मी औषध घ्यायला फार खळखळ करतों अन् मग तिला फार त्रास होतो. कालपासून मला खोकला येतो आहे म्हणून आईला त्रास न देतां मीं खडीसाखर आणली आहे. ' वसंतानें लक्ष्मणाच्या अदबीनें उत्तर केलें.

' तुला हे सगळे रोग आणि त्यांचीं औषधं अगदीं तोंडपाठ आहेत—थांब, आईलाच सांगतों. चोऱ्या करायला लागलास काय ? ' असे धमकावणीचे शब्द ऐकवून शरद पुढें निघून जात होता. ' तूं काय कमी चोऱ्या करतोस ? पर्वा कॉलेजांतून कोणत्या तरी मुलीची मनीबॅगच चोरून आणलीस अन् आईनं जेव्हां झाडलं तेव्हां दुसऱ्या दिवशीं परत केलीस. ' हा टोमणा त्याच्याजवळ अधिज्यधन्व्याप्रमाणें तयार होता, पण लक्ष्मणाचें अपूर्व आणि आणखी काय म्हणतात तसलें व्रत त्यानें पांचच मिनिटांपूर्वीं पत्करलें होतें. त्याच्याशीं विसंगत असें वर्तन करणें बरोबर नव्हतें म्हणून तो मुकाट उभा राहिला. त्या-ऐवजीं त्यानें खालच्या मानेनें म्हटलें, ' दादा--! ' त्याचा कंठ दाटून आला.

शरदनें आश्चर्यानें मागें वळून पाहिलें. उमाजी नाईक, तंट्या भिल्ल हे एक वेळ रडतील पण वसंत आणि खालच्या मानेनें उभा राहिलेला ? हा देखावा अगदीं उत्तर ध्रुवाजवळच्या मध्यरात्रींच्या सूर्यासारखा आश्चर्यजनक होता. शरदची कल्पना ही, कीं स्वारी मुद्दे-मालासकट सांपडली आहे आणि म्हणून गयावया चाललेली दिसते. परंतु वसंतालासुद्धां पश्चात्ताप होऊं शकतो ही कल्पनाच मुळीं विरोधी होती.

' दादा,—तूं पुण्यांत राहूं नकोस. आपण दोघेही रानांत जाऊं या. ' वसंतानें नम्रपणें त्याला विनंति केली.

' म्हणजे ? डोकं फिरलं का काय तुझं ? ' शरद आश्चार्यातिशयानें म्हणाला.

' शहरांत राहूं नये. माणसानं नेहमीं रानांत रहावं. आयोध्येचा मालक रामसुद्धां रानांतच रहात होता. चौदा वर्षें तो रानांतच होता आणि त्याचा भाऊ लक्ष्मण त्याची अतिशय हालअपेष्टा सहन करून सेवा करीत होता. तसं आपण करूं या म्हणजे हिंदुस्थानाचं कांहीं तरी चांगलं चांगलं होईल. ' आठवण करीत वसंत उद्गारला.

'हें बघ, तुला मी आज नव्यान आळवात नाहीं हे ध्यानांत असूं दे. तुझा हा कांहीं तरी नवीन डाव दिसतो आहे मला त्रास देण्याचा. माझ्या कोणत्याही गोष्टींत तुला लक्ष घालण्याचं कारण नाहीं. जर फाजीलपणा करशील तर याद राख. दिवाळींत क्रिकेटची बॅट तर अशानं देणार नाहींच उलट......' ध्वनिकाव्याच्या साह्यानें वाक्य पूर्ण करण्याची जबाबदारी वसंतावर टाकून शरद निघून गेला.

वसंतानें खिन्नपणें आपल्याशींच मान हालवली. काय हें अलीकडचे राम झाले आहेत पहा! धाकटया भावांना लक्ष्मण होऊं देण्याचीसुद्धां यांची तयारी नाहीं. दंडकारण्य का काय म्हणतात तें जाऊं दे, पण चतुर्शिंगीच्या रानांत तरी हा राम जाईल कीं नाहीं कुणास ठाऊक! आणि मग आपण लक्ष्मण कसे होणार?

दुसऱ्या दिवशीं आपल्यापेक्षां एक वर्ष वयानें श्रेष्ठ असलेल्या वामनाला त्यानें आपला अबोला गुंडाळून ठेवून हा प्रश्न विचारला.

'तूंच सांग वामन, आतां मी लक्ष्मण तरी कसा होणार?' मोठ्या गंभीरपणें आपले सुपासारखे कान खाजवीत वसंत म्हणाला.

वामननें बराच वेळ विचार करून पाहिलें. परंतु त्यालासुद्धां ही अडचण कशी दूर करावी हें एक अगम्य कोडेंच होतें. 'रामच जर रानांत जायला तयार होत नाहीं तर काय करणार? तुला सांगतों, तो भीत असला पाहिजे रानांत जायला.' वामननें पृच्छात्मक सुरांत म्हटलें.

'तो उंदरालासुद्धां भितो. तें मला माहीत आहे. पण प्रश्न हा कीं आपण काय करावं?' वसंतानें शंकातुर स्वरांत म्हटलें.

यावर वामननें रामलक्ष्मणाची गोष्ट खोटी कशावरून नसेल असाही नवलपूर्ण मुद्दा उपस्थित केला.

'त्याचं काय सांगावं? माझा भाऊ असलींच कसलीं तरी पुस्तकं वाचीत असे आणि एके दिवशीं रात्रीं 'चोर, चोर' म्हणून ओरडत उठला. चोर नाहीं नी कांहीं नाहीं. आमच्या बाबांचा रेनकोट खुंटीवर होता त्यालाच तो चोर समजून भ्याला. आईनं त्याला बजावून सांगितलेलं मीं ऐकलं. असलीं कादंबऱ्यांचीं पुस्तकं वाचूं नयेत, त्यांत सगळं खोटं असतं असं आई म्हणाली—' वामननें माहिती पुरविण्याकरतां म्हटलें.

‘ मला नाहीं हें पटत. अरे, एका माणसानं लिहिलं तर कदाचित् खोटं असेल पण–पण पुराणिक आणि मंडळी—म्हणजे किती तरी माणसं असतील ! ते सगळेजण खोटं लिहि-तील ? ’ असें म्हणून रामायण खोटं ठरविणाऱ्या वामनाला वसंतानें निरुत्तर केलें.

एकंदर दोघांच्या विचारें ठरलें कीं वसंतानें शरदला कधींही एकटा सोडूं नये. अनायासें पुढच्या आठवड्यापासून दिवाळीची सुटी सुरू होणारच होती. तेव्हां निदान एक महिनाभर तरी त्याला एकटें हिंडूं देऊं नये. वाटेंत त्याला तहान लागली आणि वेळेवर भांडें सांपडलें नाहीं तर आपल्या टोपींतून पाणी नेऊन त्याला पाजावें, रोज घरांत त्याच्या खोलींतलें सामान नीट आवरून ठेवावें, त्याचीं पुस्तकें रांगेनें लावून ठेवावींत आणि असा एक महिना गेला म्हणजे त्याची त्यालाच लाज वाटेल आणि मग तो चट रानांत यायला कबूल होईल.

‘ मग काय मजा होईल, नाहीं ? शाळेचाही त्रास अनायासें मिटेल—’ वसंतानें डोळ्या-पुढें भावी कालाचें रम्य चित्र चितारीत म्हटलें. हा नवीन शाळेचा मुद्दा ऐकून वामनला-सुद्धां वसंताच्या बुद्धिमत्तेचें कौतुक करावेंसें वाटूं लागलें. वामन हा जरी सर्वसाधारण विद्यार्थी होता तरी क्वचित् प्रसंगीं दुधांत पाणी घालून लबाडीचे व्यवहार करणाऱ्या गवळ्यांविषयीं त्याच्याही मनांत अनादर उत्पन्न होई. आणि लबाडी करणारा एक वेळ करील. आपणसुद्धां होमवर्कची वही विसरली म्हणून थाप मारतोंच. पण ज्यांच्या हाताखालीं आपण शिकायचं त्यांना हें उमगत कसं नाहीं ? खुशाल आपले त्यावर आंकडे-मोड करायला लावतात. तेंही केलें असतें परंतु गवळ्याची लबाडी मान्य करायची आणि आम्ही लबाडी करून उत्तर बरोबर आणलें तर मार द्यायचा, ही कुठल्या मुलखाची रीत ? असले भयंकर विचार त्याही चिमुकल्या डोक्यांत मधून मधून उमटत असत. तेव्हां लक्ष्म-णाच्या वनवासांत जाण्याच्या उदाहरणानें ही सगळी ब्याद आपोआप नाहींशी होऊन पुन्हां वर वसंत म्हणतो त्याप्रमाणें आपल्यावर पुस्तकें लिहिलीं जातील ! कल्पना मोठी रम्य होती, पण तूर्त वामनाचा भाऊ कॉलेजच्या गॅदरिंगमध्यें गडबडींत असल्यामुळें वामनाला आपली महत्त्वाकांक्षा दाबून ठेवावी लागली. मात्र पुढें कांहीं दिवसांनीं आपणही असाच कांहीं तरी पराक्रम गांवांतल्या गांवांतच करून दाखवूं असें त्यानें वसंताला आश्वासन देऊन ठेवलें.

त्याच दिवशीं रात्रीं शरद्‌ला वसंताची सेवा हळूहळू जाणवूं लागली. जेवतांना पाण्याचें भांडें सुरवातीस नक्की त्याचेजवळच होतें, परंतु पुढें तें एकाएकीं बेपत्ता झालें. चटणीनें तोंड भाजलेलें आणि भांडें जवळ नाहीं, बोलावें तरी पंचाईत अशा स्थितींत त्यानें घटका-

भर कोणाच्याही लक्षांत येणार नाहीं अशा बेतानें हळूच आसपास पाहिलें--आईच्या लक्षांतून मुलाची कोणतीही हालचाल सहसा सुटत नाहीं. वडील मात्र १९१० सालीं पुण्यांत झालेल्या प्लेगाची भयंकर परिस्थिति पत्नीस वर्णन करून सांगण्यांत चूर होते. सिंधू आपल्या वेणीच्या शेपट्याला कुरवाळीत मधुनच 'अय्या !' 'काय ग बाई तरी ऽऽ' इत्यादि प्रोत्साहनपूर्ण शब्दांनीं पितृदेवांना खूष करीत होती. अर्थात् नवीन पातळाची मागणी पुढें करायला तब्बल आठवडा असली तपश्चर्या करावी लागते हें कोणतीही सुजाण कुमारिका सांगूं शकेल.

'काय रे काय पाहिजे ?' आईनें मध्येंच थबकून शरद्ला प्रश्न केला.

'कांहीं नाहीं, सहज !' शरदने चपापून उत्तर केलें.

'तुझं लक्ष कांहीं जेवणांत दिसत नाहीं—' आईनें प्रेमळपणानें म्हटलें.

'नसायला काय झालं ?--चांगला भरभक्कम जेवतो आहे तर काय झालं ! तेव्हां कुठवर आलों होतों बरं--हं ! हो. झोपड्यांत राहायला आम्ही गेलों होतों, नाहीं का ? अन् एक दिवस असा सडकून पाऊस आला--' वडिलांनीं पुन्हां सर्वांचें लक्ष आपणाकडे वेधून घेण्याचा प्रयत्न केला. पण शरद् पाण्यानें डबडबलेल्या नेत्रानें त्यांच्या पुढ्यांत असलेल्या तांब्याकडे पाहूं लागला.

'दादा, तुला भांडं पाहिजे का-हें घे. तूं घ्यायला विसरलास.' असें गंभीर वाणीनें म्हणत वसंतानें शरद्चें लपवलेलें भांडें पुढें केलें. गोष्ट ऐन रंगांत आलेली आणि हा वारंवार होणारा अडथळा, कोणत्या घराचा धनी सहन करून घेईल ?

'म्हणजे, तूं भांड्याशिवायच बसला होतास वाटतं ? शाब्बास ! अरे बाहेर वाटेल तसे वागतां, घरांत जरा तरी मुर्वत धरा--' म्हणून आधींच चिडलेल्या पितृदेवानें मुलाच्या खुलाशाकडे बिलकुल लक्ष न देतां ऐसा उपदेशाचा डोस ठेवून दिला कीं शरद्नें दुर्वासऋषीच्या संतप्त डोळ्यानें वसंताकडे एकवार जळजळीतपणें पाहून घेतलें. वसंत कृतकृत्य झाल्याच्या समाधानानें त्याच्याकडे पहात असलेला त्याला दिसला.

वसंताचा सेवाधर्म सुरू झाला.

शरद् लगबगीनें माडीवर आपल्या खोलीकडे निघून गेला. दिवा लावून तो टेबलापाशीं बसला आणि आश्चर्यानें लगेच जागचा उठून उभा राहिला. टेबलावर एक पुस्तक नव्हतें.

शाईचा पत्ता होता परंतु तो खालीं फरशीवर होता. टेबलावरचीं झाडून सारीं पुस्तकें बूट ठेवण्याच्या फळीवर कोणी तरी ओळीनें मांडून ठेवलेलीं दिसत होतीं. आणि बूट, वाहणा इत्यादि पादत्राणें खुंटाळ्यावरून माळेसारखीं लटकावून दिलेलीं होतीं, आणि उलथापालथ झालेली नाहीं असा एकही कोपरा शिल्लक राहिलेला नव्हता. एवढ्यानेंच भागणार नव्हतें. कसली तरी शंका येऊन शरदनें टेबलाचा ड्रावर खस्‌दिशीं ओढून पाहिला, आणि त्याला भर दुपारच्या उन्हाची तिरीप लागल्याप्रमाणें झालें आजपर्यंतच्या सोळा ते एकोणीस या तीन वर्षांच्या धुंदकारलेल्या आयुष्यांत शरद्‌नें कोणालाही कळूं न देतां हा एक नवीन उपद्याप चालविलेला होता. त्याला हळूहळू प्रेम करूं लागलें होतें. रमणीच्या गौर हस्तावरच्या निळसर शिरा मोठ्या मोहक असतात हें सत्य त्याला उमजूं लागलें होतें. कॉलेजमधील मुलीशीं बोलत असतांना आपण कुठें तरी दूर दूरच्या ग्रहावर जात असल्याचा त्याला नवीन अनुभव येऊं लागला होता. एक दिवशीं एक मुलगी मनीबॅग लायब्ररींत विसरून गेल्याचें त्याच्या दृष्टीस पडलें आणि, कोलंबसाला अमेरिका सांपडल्याचा आनंद कसा व किती झाला असेल हें कोडें त्याला चुटकीसरसें सोडवतां आलें. ती बॅग परत करावी म्हणून त्यानें आसपास कोणी नाहीं असें पाहून कोटाआड दडवली. रोज ती परत करण्याबद्दल त्याची सदसद्विवेकबुद्धी त्याला सुचवीत होती पण त्याची गद्धेपंचविशी त्याला तसें करूं देत नव्हती. रोज रात्रीं टेबलाच्या ड्रॉवरमधून हळूच ती बाहेर काढावी आणि तीवरचीं 'एस्. चिटणीस' हीं अक्षरें त्यानें अधाशासारखीं पुनः पुनः वाचावींत यांत स्वर्गसौख्य होतें. चिमाजीअप्पानेंसुद्धां वसईच्या किल्ल्याकडे इतक्या आशाळभूतपणानें पाहिलें नसेल. हा मूर्खपणा आणखी किती दिवस चालला असता कुणास ठाऊक, परंतु सिंधूनें एके दिवशीं हा प्रकार आडून पाहिला आणि आईच्या कानावर घातला—आणि ती बॅग एखादा प्रांत दुसऱ्याच्या हवालीं करतांना राष्ट्राधिकाऱ्याला ज्या वेदना होत असतात त्या वेदनेनें त्यानें परत केली. पण ओळख झाली.

आणि त्या ओळखींतून अनेक नवीन अंकूर उद्भवले. आशा पालवली गेली आणि अगदीं सोंवळ्या, सनातनी चिठ्ठ्या सुरू झाल्या. 'आपण अलीकडे कॉलेजांत पहिल्या तासास कां येत नाहीं?' ही पहिली चिठ्ठी होती. आणि दोन वर्षांनंतरची अगदीं शेवटच्या आठवड्यांतील ताजी चिठ्ठीसुद्धां तितकीच निर्लेप होती. 'गॅदरिंगच्या नाटकांत मुलींनीं भाग घ्यायला काय हरकत आहे?' अशी प्रामाणिक पृच्छा तींत करण्यांत आली होती. शकुं-

तलेनें धाडलेल्या या चिठ्ठया शरद्‌नें पोस्टाच्या सेव्हिंग-सर्टिफिकेटाइतक्या जपून ठेवलेल्या होत्या. त्याच्याही चिठ्ठया तितक्याच सोज्ज्वळ होत्या. अजून त्याला धीर होत नव्हता हेंच बुडाशीं कारण होतें. परंतु केव्हां केव्हां तो निवांतपणें कॉटवर पडला असला म्हणजे डोळ्या-पुढें त्याच्या एक रम्य दृश्य तरळूं लागे--एक बंगला, मोटार, एक सुंदरसा बाग, कारंजें, शकुंतला आणि शरद्—हीं त्या चित्रांतील प्रमुख मंडळी होती--आणि मग......!

आणि त्या चिठ्ठया ड्रॉवरमध्यें बिलकुल दिसत नव्हत्या. हा उद्योग कुणी केला ? जगांत त्याला एकच शत्रु संभवनीय दिसत होता आणि तो म्हणजे वसंत—त्याचा सख्खा भाऊ. आईबापांना आनंद होतो दुसरा मुलगा झाला म्हणून, पण भावाच्या कपाळीं आंठी चढते घरांत वैरी जन्माला आला म्हणून. वसंताचे आणि शरद्‌चे बहुतेक वर्षाच्या अकरा महि-न्यांतून असेच सलोख्याचे संबंध असत. आज झाला हा प्रकार मात्र अक्षम्य होता. तिरमिरीसरशीं दिवा बंद करून शरद् घाईघाईनें वसंताच्या खोलीकडे धांवला. परंतु वसंताची खोली म्हणजे सिंधूचेंही त्यांत वास्तव्य आलेंच. त्याच्या सुदैवानें अजून सिंधू आईच्या हातांखालींच पहात असल्यामुळें वसंत एकटाच गंभीर मुद्रा करून दिव्यावडे टक लावून पहात असलेला त्याला दिसला.

‘ ए, शहाण्याच्या कांद्या, मी नसतांना माझ्या खोलींत कोण गेलं होतं, बोल—’ संतापानें शरद् म्हणाला.

‘ मी—’ संथपणें वसंतनें उत्तर केलें आणि संपलें आपलें काम अशा विचारानें पुन्हां दिव्याकडे पहाण्यास सुरवात केली. हें सत्यकथन शरद्‌ला नवीन होतें. वसंतचें आजचें उत्तर ऐकून तो गडबडला. पुन्हां सांवरून तो हलकेच ओरडला, ‘ कां ? हा नसता चोमेडपणा करण्याची तुला काय गरज होती?’ शरदचा हा प्रश्न ऐकून वसंतानें एकवार ‘ आपलाच राम असें बोलत आहे काय ? ’ अशा थाटानें त्याच्याकडे मिचमिच्या डोळ्यानें आपादमस्तक न्याहाळून पाहिलें.

‘ तुझी खोली मीं आवरली—’ वसन्तानें लक्ष्मणाचें चित्र डोळ्यापुढें आणून अदबीनें उठून उभा राहून उत्तर केलें.

‘ तुला लाखदा सांगितलं असेल कीं माझ्या खोलींत पाऊल टाकूं नकोस. कां धडपड-लास ? पुन्हां तर ये माझ्या खोलींत, तंगडीच तोडून टाकतों—’ शरद रागाचा पारा दाबून म्हणाला.

' त्यांत जर तुला सुख होणार असेल तर पुन्हां कशाला ! ही बघ माझी तंगडी आत्तांच तोड ' हें वसंताचें नम्रपणाचें उत्तर ऐकून शरद्ला पृथ्वी भोंवतीं फिरत असल्याचा त्याला भास झाला. त्याला काय करावें हेंच सुचेना.

' माझीं ड्रॉवरमधलीं महत्त्वाचीं पत्रं कुठं आहेत ? ' विद्ध कंठानें तो कसेंबसें उद्गारला.

' तीं मी तारखेवार लावून ठेवीत होतों तोंच अण्णा मागाहून आले आणि त्यांनीं तीं हिसकावून घेतलीं. ' खिन्नपणें वसंत उद्गारला. या उत्तरानें शरद एकदम दोनशें फुटांवर खालीं आदळल्यासारखा झाला. हें प्रकरण आतां चावडीवर गेल्यासारखें झालें होतें. आतां केवळ वसंताला शिक्षा करून भागणार नव्हतें. कदाचित् वडिलांनीं तीं पत्रें एव्हांना वाचून-सुद्धां टाकलीं असतील ! शरद्ला हा जन्म आतां पुरे झाला असेंच कांहींसें वाटूं लागल्यास नवल नाहीं. राग गिळून बसण्यापेक्षां दुसरा मार्गच नव्हता.

' बरं-बरं. पण पुन्हां हात लावलास माझ्या वस्तूंना तर याद राख-' ही ठराविक धमकी उच्चारून तो जवळ जवळ झिंगतच परत फिरला. वसंताचा सेवाधर्म चालू होता—!

एखादी गोष्ट मनानें घेतली कीं शेंडी तुटो वा पारंबी तुटो या अट्टाहासानें ती चालू ठेवण्याचा वसंताचा अट्टाहास असे. त्या दिवशीं रात्रीं दहा वाजेपर्यंत शरद्च्या खोलीच्या दारावर त्याचा खडा पाहारा होता. हा इतका त्रस्तसमंधासारखा हात धुवून आपल्या पाठीस कां लागला आहे हेंच कोडें शरद्ला उलगडेना. शेवटीं हा हांकलूनही जात नाहीं असें पाहून शरद्नें नाइलाजानें दिवा बंद केला तेव्हां ' तुला पाणी वगैरे लागलं तर मला सांग ' असें पुनः पुनः बजावून स्वारी एक दिवसाची नोकरी बजावल्याचें समाधान मानून आपल्या खोलीकडे परतूं लागली. परंतु सरळ इच्छित स्थळीं जावें हा धडा अजून त्यानें गिरवलाच नव्हता. आज या नवीन उद्योगामुळें मनीची शेपटी कुरवाळायला त्याला वेळ मिळाला नव्हता किंवा टाम्याचे दांत मोजायलाही फावलें नव्हतें.—मनीच्या शोधार्थ म्हणून अखेरचा प्रयत्न करीत हिंडत असतांना अजून अण्णा व आई जागे असल्याचें त्याला आढळून आलें. इतका वेळ अण्णा स्वयंपाकघरांतच पाटांच्या चवडीला टेकून बसलेले पहातांक्षणींच कांहीं तरी आपल्यासंबंधीं शिजत असलें पाहिजे या कल्पनेनें त्याचे पाय नकळत तिकडे वळले आणि कानही बहिरे नसल्यामुळें बाहेरचे बाजूनें ऐकूं लागले.

' हे आपल्या ज्येष्ठ चिरंजिवाचे चाळे बरं—' अण्णाचा आवाज येत होता.

'पण तुम्ही म्हणतां तसं होणार नाहीं. त्या मुलीचं लग्न ठरलं आहे असं मी ऐकते--' आईचा आवाज त्याच्या कानावर आला.

'पण हें ह्या गाढवाला कळलं असेल तर ना! याच्या चिठ्या चालूच आहेत. आज मला अचानक दिसल्या. तिनं ह्याला धाडलेल्या मीं डोळ्यानं पाहिल्या—कांहीं तरी बंदोबस्त केलाच पाहिजे.' निश्चयाच्या स्वरानें अण्णा म्हणत होते.

'मी म्हणते कांहीं करूं नये आपण, ठेंच लागली म्हणजे चट मनुष्य जपून चालतं—' आई म्हणत होती.

या संवादांत स्वतःसंबंधीं कांहीं नाहीं एवढं वसंता जाणून होता. परंतु मघाच्या चिठ्या, आपला मानलेला राम आणि कुणी तरी मुलगी असली कांहीं तरी ही विचित्र सांगड असावी हें त्यानें ताडलें आणि इतका वेळ त्याला एका बाबतींत रुखरुख लागून राहिली होती ती सुटण्याची आशा वाटूं लागली. मराठी चौथीच्या पुस्तकांत व बक्षीस मिळालेल्या बाल-रामायणांत रामाच्या खांद्यावर हात ठेवून उभी असलेली सीता त्यानें पाहिली होती. वास्त-विक बायकांनीं या भानगडींत कां लक्ष घालावें हें त्याला अजून पटलें नव्हतें. वसंत या सुधारलेल्या युगांतसुद्धां पक्का सनातनी होता. बायकांनीं वनवासांतसुद्धां पुरुषांची पाठ पुरवावी हा कमालीचा अन्याय आहे असें त्याचें ठाम मत होतें. आणि एका बाईला खुशाल आपल्या खांद्यावर हात ठेवूं देणाऱ्या रामाविषयीं प्रथम त्याला थोडासा अनादरच वाटला. पण जेव्हां वामननें त्याला 'काटा मोडला असेल' म्हणून रामानें तिला तसें करूं दिलें असेल असा निर्वाळा देतांक्षणींच तो गप्प बसला. तरी पण बायकांना इतक्या सव-लती दिल्या तर त्या आपल्या बहिणीप्रमाणें शिरजोर होऊन भांडणाच्या वेळीं डोक्यांतल्या आकड्यानें कशावरून टोंचणार नाहींत ही शंका कांहीं केल्या त्याच्या मनांतून जाईना. शेवटीं रामाचा हा प्रश्न आहे, लक्ष्मणानें या भानगडींत लक्ष घालण्याचें कारण नाहीं असा युक्तिवाद मनाशीं करून तो आपल्या शरद्च्या सीतेची चौकशी करूं लागला.

शरद्नें अजून लग्न करूं नये याचा त्याला अत्यंत संताप आला. थोरले भाऊ म्हणजे लहान मुलांना संकटांत टाकायलाच जन्माला आले असतात कीं काय असा पुसटता विचार त्याच्या डोक्यांत चमकून गेला.

आत्तां आईच्या आणि अण्णांच्या या भाषणानें त्याचा जीव भांड्यांत पडला. कसेंही करून ही चिठ्ठीवाली मुलगी कोण आहे, याचा पत्ता लावला पाहिजे. शरद् कुठल्याशा

लांबच्या गांवचा कलेक्टर आहे, आणि त्याच्याजवळ एक तळघर भरून पैसे आहेत इत्यादि थापा तिला मारून एकदांची सीता मिळविली पाहिजे हा निर्धार त्यानें कायम करून टाकला.

आठ दिवस त्याला हा नवीन बेत अमलांत आणायला सवडच मिळाली नाहीं. सहामाही परीक्षेच्या धांदलींत त्याला वेळ मिळणें शक्य नव्हतें. त्यानें खूप प्रयत्न केला पण आईनें त्याला जेव्हां जरब घालून सारखा अभ्यासास बसवला तेव्हां त्याचा नाइलाज झाला. 'फार वाचलं म्हणजे डोळे बिघडतात अन् मग मी आंधळा होईल अन् मग सगळेजण तुला आंधळा मुलगा झाल्याबद्दल नांवं ठेवतील' हा धाक त्यानें वारंवार आईला घालून पाहिला; पण आईनें जेव्हां त्याला चक्क बजावलें कीं अभ्यासाचें पुस्तक वाचलें नाहीं तर माधुकरी मागावी लागेल, तेव्हां त्यानें मुकाट्यानें माघार घेतली.

परीक्षेचा शेवटचा दिवस संपतांच त्यानें आपल्या कार्याची मुहूर्तमेढ रोंवली. एक वेळ सावलीनें शरद्ला डावललें असतें पण वसंतानें त्याला क्षणभर इकडचा तिकडे होऊं दिलें नाहीं. शरद्च्या कॉलेजला सुट्टी होती. तो दुपारीं मित्राकडे आपल्या नाजुक ध्येयाचें नामसंकीर्तन आणि गुणगौरव हा दुहेरी कार्यक्रम अत्यंत सात्त्विक मूर्खपणानें पार पडण्याकरतां गेला होता. वसंत शक्य तोंवर आपली छबी त्याला दिसूं न देतां त्याच्या आसपास घुटमळत बंगल्याच्या बाहेर उभा होता. उपास्यदेवतेचें एकशें सत्तावन्नाव्या वेळां वर्णन करून झाल्यावर शरद् छाती अर्धा इंच फुगवून बंगल्याच्या बाहेर पडला. वसंत चट्कन् एका झाडाआड झाला.

काय करावें आणि कोठें जावें अशा संमोहावस्थेंत शरद् क्षणभर रस्त्यांत थबकला. सहजच त्यानें रस्त्यांत या टोंकापासून त्या टोंकापर्यंत निरखून पाहिलें. आणि एकदम आफ्रिकेंतल्या एखाद्या अनामिक चुलत्याच्या अकस्मात् मृत्यूमुळें दहा लाखांच्या इस्टेटीचा वारस झाल्याचें वृत्त कानीं पडतांच माणसाचा चेहरा जसा पिकलेल्या टॉमेटोसारखा लालबुंद पडतो त्याप्रमाणें त्याची अवस्था झाली. चेष्टेनें चंद्र खेळायला मागवा आणि एखाद्यानें खरोखरच तो झाडावरल्या सफरचंदासारखा तोडून हातांत द्यावा असें त्याला होऊन गेलें.

समोरून शकुंतला येत होती. वाफेच्या उपयोगाचा शोध लागण्यापूर्वी शिडाचीं जहाजें अशींच डुलत येत असावींत. शकुंतला रस्त्यांतून बागडत येत असली कीं सायकलवाले [ आणि तेसुद्धां पुण्याचे ! ] मुकाट्यानं जवळच्या गल्लीची आडवाट शोधूं लागत. टांगेवालेसुद्धां एकदम विरुद्ध दिशेनें भरधांव निघून जात. ऐन रंगांत धांवत असतां मध्येंच

टायरनें बसकण मारली असतां मोटारवाल्याचा चेहरा जसा एकदम खरकतो त्याप्रमाणें निष्पाप पादचाऱ्यांच्या बाबतींत होत असे. तनुदुरुस्तीसाठीं तुरुतुरु धांवण्याचा माफक व्यायाम घेणारा, डोईस मफलर गुंडाळलेला पेन्शनर तर बेशुद्ध पडण्याच्या बेतांत येई, पण लगेच त्या महिन्याची पेन्शन घ्यावयाची आहे या विचारानें शुद्धीवर येई. पुण्यांतील अनेक हिमालय–कन्यकेप्रमाणें शकुंतला हें एक अक्षरशः प्रशस्त प्रकरण होतें. कोणत्याही धाडसी तरुणाची तिचा विनयभंग करण्याची स्वप्नरंजनावस्थेंतसुद्धां छाती झाली नसती. आणि तसला प्रकार जर यदाकदाचित् घडून आला असता तर तिनें पायांतल्या नाजूक चपलेऐवजीं नाल लावलेला आवडक चौवडक असा एखादा पुरभय्यी स्लीपरच उगारला असता, आणि तो तरुण पुन्हां विनयभंग करायला ह्या पृथ्वीवर शिल्लकच राहिला नसता.

पण प्रेमाचे मार्ग प्रेमिकांशिवाय इतरांना कसे सुधारणार ? शरद्च्या दृष्टीनें शकुंतला म्हणजे—!

पण प्रत्यक्ष शकुंतला पुढें आल्यावर तिचें उपमान हवेंतल्या हवेंत विरून जाई आणि खडी दाबण्याच्या इंजिनापुढें वाळूचा खडा जसा नम्र होतो त्याप्रमाणें त्याचें होई.

' अय्या–! कुठं चाललांत ? मला किनई तुम्हाला एक गंमत सांगायची आहे. कुठं भेटाल ? केव्हां भेटाल ? ' ऐसपैस अशा भालप्रदेशावर उमटलेले घर्मबिंदु हातांतल्या लंगोटीवजा रुमालानें टिपीत ती म्हणाली.

' असं ? मग येतां का फिरायला ? ' स्वराज्याची भिक्षा मागणाऱ्या मवाळ पुढाऱ्या-प्रमाणें हस्तिदंती करून शरद् म्हणाला. शकुंतलेनें मनगटावरील घड्याळाकडे पाहिल्या-प्रमाणें केलें आणि—दोघेंही जणें विठ्ठलवाडीच्या रस्त्याला लागलीं. वसंतानें फौजदारासारखा त्यांचा पाठपुरावा करण्यास सुरवात केली.

ही सीता त्याला एकदम पसंत होती. दहा राक्षसांना भारी असलेली देवता जर लाभत असेल तर आणखी काय पाहिजे ? वसंतानें हीच सीता असें मनाशीं ठरवून टाकलें.

रस्त्याच्यापासून थोड्याशा दूर अंतरावर असलेल्या एका प्रस्तरखंडावर शकुंतला विराज-मान झाली आणि वीतभर रुंदीच्या ढेकळावर शरद् सर्कशींतल्या बकऱ्याप्रमाणें बसून राहिला होता. सूर्य अस्तास जाण्याच्या बेतांत होता. झाडांच्या लांबच लांब सावल्या अस्पष्टपणें पसरलेल्या दिसत होत्या. वायूच्या मंदमंद लहरी शकुंतलेला टाळून दूरवरून

वहात होत्या. कॅनालचें गढूळ पाणी, वाळलेला पाला, काटक्या इत्यादि मालमत्ताला घेऊन पुणेकरांना जीवन देण्याकरतां अत्यंत मंदगतीनें पुढेंपुढें सरकत होतें. आपल्या निवाऱ्याच्या मार्गांत हे कोण नवीन प्राणी आले आहेत असा आपआपसांत खल करीत पक्षीगण आसपास घिरट्या घालीत होता; आणि वसंत एका झाडाआड एकदां एका पायावर, पुन्हां दुसऱ्या पायावर असा आलटून पालटून अंगाचा भार टाकून उभा होता—

'मलासुद्धां तुम्हांला एक गंमत सांगायची आहे. मी—म्हणजे मला—म्हणजे आपलं मीच—' शरद् म्हणत होता.

'अय्या! खरंच मीही तुम्हांला गंमत सांगणार आहे; आपले ते रावबहादुर जोशी नाहींत का—' परंतु शकुंतलेचें वाक्य पुरें व्हावयाचें नव्हतें. झाडाआडून कांहीं तरी धप्पदिशीं पडल्याचा आवाज झाला. दोघेंही दचकून उठलीं. वसंताची सर्कस चालू असतां त्याचा तोल गेल्याचें दृश्यफळ त्यांना पाहायला मिळालें.

शरद्च्या तोंडून संतापातिरेकानें एक शब्दसुद्धां फुटेना. शकुंतला पाठीवर पडलेल्या वसंतास न्याहाळून पहात होती. वसंता तसाच डोळे मिटून पडून होता.

दुसऱ्या दिवशीं वसंतानें पश्चात्तप्ततेचें असें कांहीं बेमालुम सोंग वठवलें कीं शरद्सुद्धां चकला. शकुंतलेला पत्रद्वारें आपला मनसुबा कळवावा कीं नुसतें सिनेमाला म्हणून आमंत्रण द्यावें आणि तेथें आपलें हृदय तिच्या स्वाधीन करून टाकावें या विचारांत शरद् गुंग होता. शेवटीं लेखी न सांपडण्याचा हिशेबी विचार करून नुसतें सिनेमाचें आमंत्रण द्यावें हा विचार त्यानें केला आणि वसंताच्या विनवणीवरून तें पत्र त्याच्या हस्तें पाठविण्याचें त्यानें मान्य केलें. मात्र 'जर का दुसऱ्या कुणाच्या हातांत देशील तर याद राख—' ही अतिपरिचित धमकी देण्यास तो विसरला नाहीं. लिफाफा बंद करून त्यानें वसंताच्या हातांत दिला. आणि संध्याकाळीं साडेपांच वाजेतोंपर्यंत आराध्यदेवतेचें मानसपूजन करण्याच्या दृढनिश्चयानें तो आपल्या खोलींत जाऊन पडला. वसंत लगबगीनें न्हाणीघरांत शिरला. आंतील चिठ्ठी त्यानें वाचून पाहिली. हंः असें स्वतःशींच निषेधपूर्वक पुटपुटून त्यानें ती चिठ्ठी फाडून टाकली. असल्या चिठ्ठ्यानें रामाला सीता मिळणें कालत्रयींही शक्य नाहीं असेंच त्याला वाटलें असावें.

स्वतःच्या खोलींत धांवत जाऊन त्यानें दार आंतून लावून घेतलें. मराठीच्या वहीचें एक पान टरकावून त्यानें स्वतः लिहावयास सुरवात केली.

'मीच हें पत्र लिहीत आहे. माझा भाऊ लिहीत नाहीं. माझा भाऊ फार चांगला आहे. तो लक्ष्मण आहे. मी राम आहे. आम्ही वनवासांत जाणार आहोंत. चौदा वर्षें राहूं अन् मग परत येऊं. आम्हांला एका सीतेची जरूरी आहे. तूं चल. तूं राक्षसांना मार आणि आम्ही परत आल्यावर तुला आमच्या बहिणीचें एक आकड्याचें पान बक्षीस देऊं. त्वरा करा आणि लौकर चला.

शरद ( राम )

शेवटच्या वाक्यावर वसंत बेहद्द खुष होता. पत्र पाकिटांत घालण्याचेपूर्वी त्यानें पुनः पुनः तें वाचून पाहिलें तरी त्याचें समाधान होईना. शेवटीं नाइलाजास्तव तो पत्र बंद करून जागचा उठला.

शकुंतलेनें तें पत्र वाचतांक्षणींच तिला हंसूं लोटलें असेल यांत शंका नाहीं. तरी पण हंसूं दाबून धरून गंभीर मुद्रा करून पुढ्यांत बसलेल्या वसंताच्या डोक्यावरून तिनें आपला हात फिरवला आणि चिठ्ठीचें उलट उत्तर तात्काळ लिहून दिलें. वसंताच्या रामायणाची हकीकत ऐकतांक्षणींच तिला सर्व प्रकार कळून चुकलासें दिसलें. तरी पण वसंताला त्याची ओळख न देतां तिनें आपल्या गालाएवढालीं दोन सफरचंदें त्याच्या खिशांत त्याच्या चंद्रबळाला न जुमानतां कोंबलींच. वसंत ह्या प्रकारानें एकदम खूष झाला. आतां रानांत निघण्याचीच काय ती बाकी होती—!

परंतु शरद्नें शकुंतलेचें उत्तर वाचतांक्षणींच जे डोळे गरगर फिरवले त्या क्षणींच त्याला कांहीं तरी संशय आला. जगांत बायका कधीं सरळ वागल्या आहेत ? शरद्नें उशींत हलकेच डोकें खुपसून प्रेमभंग झालेल्या तरुणाचें अवसान आणण्याचा प्रयत्न केला. तेवढ्या अवधींत वसंतनें शकुंतलेची चिठी झटकन् वाचून काढली. त्याचा तर्क बरोबर होता. जगांतल्या कुठल्याही बाईवर विश्वास टाकूं नये म्हणून अण्णा कधीं कधीं म्हणतात तेंच खरें याची त्याला बालंबाल खात्री पटली. येत्या मार्गशिर्षांत रावबहादुर जोशांच्या चिरंजिवाशीं आपला विवाह नक्की ठरल्याची गोड बातमी शकुंतलेनें आपल्या सुहृदास कळवली होती. शरद् बराच वेळ उशींत डोकें खुपसून पडला होता. पण त्याची छाती बंद पडली नाहीं आणि त्याच्या डोक्याच्या चिंधड्याही पण होण्याचीं लक्षणें दिसेनांत.

बऱ्याच वेळानंतर शरदनें डोकें वर करून पाहिलें. प्रेमभंग झाल्यानें महाराष्ट्रांतला कोणता तरुण आज स्वर्गलोकीं जायला तयार झाला आहे ? अनेक मुळ्यांपैकीं एक मुळी

तुटली म्हणून वडाच्या डोळ्याला कधीं पाणी आलें आहे ? शरद्नें गंभीर मुद्रा केलीं आणि चिडून म्हटलें—पण तें छापण्याजोगें नाहीं.

वसंतही कंटाळला. एकच सोंग किती दिवस चालावयाचें ? दिवाळींत फटाके उडवावयाचे असतात, सापसुरळी तोंडानें फुंकर घालून दोस्त वामनाच्या घरांत उडवायची असते आणि करंजा, लाडू, अनरसे–, शिवाय शाळा बंद ? छेः ? लक्ष्मणाला अपूर्व राहूं देणेंच चांगलें असा पोक्त विचार करून त्यानें त्या ढेरपोट्या अध्यक्षाचा कसा सूड घेतां येईल या प्रश्नाकडे पुन्हां आपलें लक्ष वळवलें. जपून ठेवलेल्या बालरामायणाची प्रत त्यानें सिंधूच्या पुस्तकांत फेंकून दिली आणि दिवाळीचें यथोचित स्वागत करण्याकरितां किल्ल्याची माती जमवायला प्रारंभ केला.

एके दिवशीं रात्रीं अण्णा कांहीं तरी आईला सांगत असल्याचा त्याला वास लागला— ‘तो चिटणीस म्हणजे माझ्या ऑफिसांतला रेकॉर्ड क्लार्क. त्यानं मला आपल्या वसंताच्या हस्ताक्षराची चिठ्ठी दाखवली. असे आम्ही हंसलों म्हणतेस ! तूं कांहीं म्हण, वसंत डोकें काढल्याशिवाय रहाणार नाहीं.’ अण्णा किंचित् अभिमानानें म्हणत होते.

वडिलांचे हें जन्मांत न ऐकलेले उद्गार कानी पडतांच आश्चर्यातिशयानें त्यानें आपले सुपासारखे कान जोरजोरानें चोळायला सुरवात केली !

[ Richmal Crompton च्या William वरून सुचलेली कल्पना ]

---

# वाफेचा रूळ !

वर्गात शेवटच्या बाकावर बसणारा तो एक विद्यार्थी होता. तो कोणत्याहीं शिक्षकाला प्रश्न विचारीत नसे वा कोणत्याहि शिक्षकाच्या प्रश्नाला उत्तर देण्याच्या भानगडींत पडत नसे. गाडीनें विना मोबदला प्रवास करणारा विंध्यागाळू भिकारी जसा एका कोपऱ्यांत अंग चोरून वसतो त्याप्रमाणें विनू त्या वर्गात बसत असे.

त्याच्या वर्गात किती तरी हुशार मुलें होतीं. कांहींना युक्लिड, न्यूटन म्हणजे रस्त्यांत उभ्या असलेल्या विजेच्या खांबाइतके जवळचे वाटत असत. कांहींनीं शाळेच्या गुणविकास वर्गात शिक्षण घेऊन आपली उद्योगप्रियता पेनबाम, स्नो, दंतमंजन इत्यादि गोष्टी तयार करून चांगलीच व्यक्त केली होती. मराठी वाङ्मयांत आज सामोरीं उभीं असलेलीं मोहोरीं कांहींच्या रोजच्या बोलण्यांत डोळ्याच्या पापण्या लवण्याप्रमाणें वारंवार येऊन जात. ‘ वाङ्मय म्हणजे काय ’ यावर वर्गातील मास्तरांनीं पढवलेलीं मुलें मोठ्या आत्मौपम्य बुद्धीनें तासन् तास बोलत राहिलीं असतीं. एके काळीं ख्यातनाम असलेली एडमंड, बर्क इत्यादि मंडळीसुद्धां ( हयात असती तर ) थक्क व्हावी अशा प्रकारचीं पद्धतीचीं बोलणारीं मुलें त्या वर्गात त्याच्या बरोबरीनें आपलें आयुष्य सार्थकीं लावीत होतीं. पण—

पण—विनूला वाटे, ज्या गोष्टी स्वयंसिद्ध आहेत त्या गोष्टी अट्टाहासानें सिद्ध करण्याचा साधकपणा युक्लिडनें केला त्यांत त्याचा मोठेपणा कसला आला आहे? दोन वांकड्या रस्त्यांनीं प्रवास करण्यापेक्षां एका मधल्याच रस्त्यानें प्रवास करणें केव्हांहि जवळचेंच ठरेल. हें तत्त्व पटवून घेण्याकरितां त्रिकोणाच्या कोणत्याहि दोन बाजूंपेक्षां उरलेली तिसरी बाजू लहानच असते हें प्रमेय शिकण्याची आटापीट कराच कां? परंतु त्याची शिक्षक मंडळी त्याला सांगत, "तूं युक्लिडचा खापरपणजा दिसतो आहेस—, गप्प बैस." आणि तो गप्प बसे.

त्याच्याच्यानें अनावश्यक उद्योगप्रियताहि साध्य करून घेणें जमलें नाहीं. तो म्हणे स्नो कशाला करायचा? जी वस्तु तोंडाला लावून पुन्हां ती दिसूं नये अशा बेतानें पुसून टाकावयाची ती लावाच कशाला? आणि मौज ही कीं कुठल्याशा अमेरिकन गृहस्थानें प्रसिद्ध केलेल्या 'एक हजार एक' तंत्रकावरून ( Formula ) जी कृति विद्यार्थ्यांना शिकवली जाई ती तितकीशी बाजारांतील जिनसांची टक्कर घेण्यास समर्थ ठरत नसे. त्या कृतींत कांहीं तरी वैगुण्य असे. आणि तें वैगुण्य त्याच्या मतें धंदेवाईकपणांत जमा होण्यासारखें होतें. कोणीहि जरी झाले तरी आपल्या धंद्याची संगोपांग माहिती छापखान्याच्या द्वारें सबंध जगाला बहाल करील अस्सा विश्वास धरणें अप्रयोजकच ठरेल.

त्यानें वाङ्मयाकडे बिलकूल लक्ष दिलें नाहीं असें नाहीं. प्रथम त्यानें वडिलांच्या सांगण्यावरून, शिक्षकांच्या प्रोत्साहनाला मोहवश होऊन एक लघुकथांचें पुस्तक वाचून काढलें. आणि त्याची आत्यंतिक निराशा झाली. लेखणीच्या फटकाऱ्यासरशीं कांहीं तरी कुरापती काढून आईबाप मारून टाकावे, मुलेंबाळें आणि पत्नी स्वर्गाला पोहोंचवावी आणि त्या नायकाला वेडा ठरवून वाचकांच्या मनाची सहानुभूति संपादन करण्याचा लेखकानें प्रयत्न करावा हें त्याला पटलें नाहीं. तो विचार करूं लागला कीं आप्त—स्वकीय माणसें मारून जर कलेचा उत्कर्ष साधला असें लेखकास वाटत असेल तर मग विश्वाचा संहारकर्ता यमराज सगळ्यांत मोठा कलावान् समजला पाहिजे. दुसऱ्याला रडविण्यांत कला असेल तर दोन तोंडांत मारूनसुद्धां तें कार्य अत्यंत सोईनें करून दाखवितां येईल. हें कसलें रडकें वाङ्मय? लोकांना रडविण्यांत कसली आली आहे कला? आणि त्याविषयीं आपण मोठा भक्तिभाव दाखविण्याचें काय कारण?

—एकंदरीनें त्याचा अभिजात मठ्ठपणा कायमचाच राहिला. आपल्या मठ्ठपणाचें त्याला कौतुक वाटत नव्हतें. परंतु हा आरोप आपल्यावर करणाऱ्या इतर मंडळीचें मात्र त्याला

भरपूर कौतुक वाटत असे. आपण स्वतः तर मूर्ख आहोंतच. परंतु आपल्यावर मूर्खपणाचा आरोप करणारी ही विद्वान मंडळी सुद्धां स्वतः पायानें पांगळी असावी याचें त्याला आश्चर्य वाटे. फरक एवढाच कीं त्यांना स्वतःचा मूर्खपणा कळून घेणें सोईचें वाटत नव्हतें. आणि त्याला मात्र आपलें अज्ञान अमावास्येच्या रात्रीप्रमाणें काळेंकुट्ट असलेलें स्पष्ट समजत होतें.

ह्या वर्षी सालाबादप्रमाणें तो इंग्रजी सहावीच्या परीक्षेंत तिसऱ्यांदा नापास झाला. प्रत्येक विषयामध्यें दोन आकड्यांच्या आंत गुण मिळवून त्यानें ह्या वर्षी आपल्या अपयशाचा आजपर्यंतचा विक्रम तोडला होता. शिक्षकांनीं त्याच्याकडे सहानुभूतिशून्य मुद्रेनें पाहिलें होतें. शाळेचा भरभक्कम आधारस्तंभ म्हणून त्याची अवहेलनापूर्ण संभावना करण्यांत आली. तो थोडासा गोरामोरा झाला. परंतु जिभेवर आलेले वांकडे शब्द त्यानें पुन्हां आंत दाबून धरले. गुरुजनांचा अनादर करण्याचें धैर्य त्याच्याच्यानें दाखवलें नाहीं.

घरीं आला तो, तों खालीं मान घालूनच. आपलें अपेक्षित अपयश प्रत्यक्ष पाहिल्यावर त्याला वांईट वाटल्यावांचून राहिलें नाहीं. वयाला सोळा वर्षे लोटलीं तरी आपल्याला इतरांच्या इतपत शहाणपण कां गोळा करतां येऊं नये याचें त्याला राहून राहून सखेद आश्चर्य वाटत असावें. या जगांत ज्याप्रमाणें मूर्ति घडवायला उपयोगी पडणारे दगड सांपडतात, त्याचप्रमाणें घाणेच्या जागेंत पायरी म्हणून बसण्याचें नशिबीं आलेले धोंडेहि सांपडतात, तसला कांहीं प्रकार आहे कीं काय ? आपल्या नशिबीं लोकांच्या लाथा खाणें एवढेंच लिहिलेलें आहे कीं काय ? तो घरांत शिरला. त्याचे वडील समोरच पडवींत उभे होते.

"काय हो चिरंजीव, दिवाळीच्या पणत्या शेवटीं उपड्या झाल्याच ना ?" वडिलांनीं त्याला सवाल टाकला. त्याला रडावेंसें वाटेना. त्याच्या कंठांतून शब्द फुटेना. तो खालच्या मानेनें घरांत शिरला.

मातेची अंथरुणाला खिळून जर्जर झालेली मूर्ति त्याच्याकडे मोठ्या आशायुक्त मुद्रेनें रोखून पहात असलेली त्याला दिसली. परम कारुणिकता, आणि होय नाहीं या परस्पर-भावांनें आंदोलित होणारी मातेची सजल दृष्टि पहातांक्षणींच त्याच्या पोटांत भयंकर कालवाकालव झाली. जगांतील वाटेल ती आपत्ति सहन करवेल पण मातेच्या नेत्रांतील निराशा सहन करणारा वीर प्रत्यक्ष सैतानाखेरीज दुसरा कोण असूं शकेल ? विनू सैतान नव्हता, म्हणून त्याला अनावर हुंदका आला.

" मी मेल्याशिवाय तुम्हाला देव सुबुद्धि देईलसं वाटत नाहीं. माझ्या नशिबींच जर हे धोंडे होते तर तुमच्याकडे बोल लावून काय उपयोग ? " त्याची आई काय समजायचें तें समजून कण्हत कुंथत कसेंबसें म्हणाली व भिंतीकडे तोंड करून अश्रु विसर्जन करूं लागली.

विनू खाड्‌कन भानावर आला. कोणी तरी त्याला लाक्षणिक चपराक इतक्या आवेगानें मारली होती कीं त्या शब्दांसरशीं त्याचा आळसटलेला मेंदू खडबडून जगा झाला. खरंच, काय हें आपलं आयुष्य ! आईनेंसुद्धां आपल्याला शेवटीं धोंडा म्हणून संबोधावें यापरता जीव गेलेला काय वाईट ? मनुष्य जगाची हेटाळणी कितीहि निढावलेल्या मनानें सहन करीत असला तरी आपल्या म्हणून मानलेल्या विश्वासू व्यक्तीनें चेष्टेंत जरी दोन निंदेचे शब्द ऐकवले तरी वैतागाची भयंकर चीड उसळल्यावांचून रहात नाहीं. विनू एक अक्षर न बोलतां त्याच पावलीं तडक घराबाहेर पडला— !

तो बाहेर पडून काय करणार होता ? त्याचें दुखावलेलें मन त्याला सुचवीत होतें कीं आयुष्याचा शेवट केलेला फार उत्तम. त्याचें डिवचलेलें अभिमानी मन त्याला सुचवीत होतें कीं, जीव देण्यापेक्षां दूर कुठें तरी जाऊन निराळ्या क्षेत्रांत विलोभनीय कामगिरी करून दाखवावी व आईचा अंतरात्मा संतोषित करावा. पण निराळें क्षेत्र कोणतें ? व दूर म्हणजे कोठें जावयाचें—?

तो पुढें पुढें चालला होता. उन्हाची आग पृथ्वीवर पाखडली जात होती. झाडेंझुडपें अधोवदन होऊन पडत्या काळाच्या निर्वाणाची वाट पहात उभीं होतीं.

पर्वतीच्या बाजूला भिकारदास-मारुतीच्या पुढच्या भागांत रस्ता करण्याचें काम चालू होतें. सबंध रस्ता खणून काढण्यांत आला होता व नवीन अणकुचीदार खडी रस्त्यावर टाकण्यांत काहीं माणसें गुंतलीं होतीं. रस्त्याच्या कडेला खडीचे बरास चौकोनांत लावून ठेवलेले होते. कांहीं फुटकीं घमेलीं व एकदोन फावडी त्या ढिगांच्या आसपास विखुरलीं होतीं. थोड्याच अंतरावर एक गुलमोहोरीच्या तात्पुरत्या सावलीखालीं पाटींत एक लहान मूल डोळ्यावर येणाऱ्या उन्हाच्या कवडशाशीं डोळ्यांची उघडझाप करीत खेळत होतें. धुळीचे लोट आणि गरम वाऱ्याचे झोत या दुहेरी अवधानांकडे पूर्ण दुर्लक्ष करून पाट्या वाहण्याचें काम त्या कातवडी बायका अत्यंत बेफिकीरीच्या उत्साहांत पार पाडीत होत्या. कपाळावरील घाम धुळीनें पांढुरक्या बनलेल्या खडबडीत तळव्यानें वारंवार निरपून टाकीत होत्या. एक काळाकभिन्न रोम्या भराभर फावड्यानें घमेलीं भरून देत होता. त्याच्या हाता-

पायावरील शिरा दांडरल्यासारख्या तट्ट फुगलेल्या स्पष्ट दिसत होत्या. मधून मधून कामांत शैथिल्य डोकावण्याचें लक्षण दिसतांच तो फाजील शिष्ट नागरिकांच्या दृष्टीनें अश्लील वाटणारीं वाक्यें त्या बायांना उद्देशून मोठ्यानें उच्चारी व त्या शरमिंद्या झाल्याचें पाहून खदखदा हंसे. काम पूर्ववत् वेगानें पुढे सरके.

विनूचें लक्ष त्या एंजिनाकडे चटकन वेधलें. काय तो बेढब आकार. असलें विचित्र यंत्र निर्माण करणाऱ्या संशोधकाला थोडीसुद्धां सौंदर्यदृष्टि नसावी याचें त्याला आश्चर्य वाटलें. पण लगेच त्याच्या मनांत एक विलक्षण विचार उद्भवला. दर्शनी सौंदर्यापेक्षां उपयुक्ततेलाच महत्त्व जास्त देण्याचा त्या निर्मात्याचा हेतु असावा काय? जगांतील दिखाऊ सौंदर्य टिकाऊ नसतें—तें उन्हानें कोमजतें, थंडीनें गारठतें व वाऱ्यानें दशदिशास उडविलें जातें. सौंदर्यापेक्षां, दिखाऊपणापेक्षा, जगांत चिरस्थायी स्वरूपाच्या उपयोगी वस्तूंनाच तर जास्त महत्त्व नसेल?

तें खडी दाबण्याचें एंजिन ताशीं दीड मैल वेगानें क्षुण्ण मार्गानें अरतीपरतीचा प्रवास अत्यंत निर्विकार मनानें करीत होतें. वरील उन्हानें त्याचें अंग तापलें होतें, आंतील पेटल्या अंगारानें त्याच्या अंगाचा दाह होत होता, खडबडीत रस्त्यावरून जातांना त्याला मनस्वी हेलकावे बसत होते पण तें दुसऱ्या लोकांच्या सोयीकरतां आपलें काम शांतपणें करीत होतें. वायुवेगी धूरचक्र्या मागाहून येऊन, खदखदां हंसत क्षणोक्षणीं पुढें निघून जात होत्या, 'काय त्रास आहे' अशा मुद्रेनें सभ्य नागरिक रस्त्यांतून झटकन त्याच्या पुढें सटकून जात होते. पण त्याचें कार्य अविरतपणें चालूच होतें. रस्त्यांत येणाऱ्या जाणाऱ्या माणसांकडे त्यानें पाहिलें न पाहिल्यासारखें करावें परंतु आपल्या कार्यांत व्यत्यय येऊं देऊं नये अशा तऱ्हेचा प्रकार पाहतांक्षणींच विनूच्या डोक्यांत विचारांची गर्दी उडून गेली.

खरंच, आपण लोकांच्या उपहासाकडे कां लक्ष पुरवावें? आणि आपल्या विहित कर्मांमध्यें उपहासाच्या भीतीनें चुकारपणा करणें किती लांछनास्पद आहे!

एक निर्जीव यंत्र ज्या उत्साहानें आपलें नियोजित कार्य करून दाखवितें तो उत्साह अपल्याला कां पारखा व्हावा? नरानें नारायण होण्याची महत्त्वाकांक्षा कां बाळगूं नये?

—विचारासरशीं विनूचें मस्तक आपोआप उन्नत होऊं लागलें. आत्मविश्वासाच्या दमदार झोतानें त्याची छाती रुंदावूं लागली, आणि—

—आणि पळून जाण्याचा किंवा जीव देण्याचा आत्मघातकी, भेकड, नेभळ्ट विचार सोडून देऊन तो कृतनिश्चयानें तडक माघारीं फिरला.

—एंजिननें कर्कशसुरानें दिलेली आरोळी ऐकून त्याला वाटलें कीं, आपलें हे नवे निश्चयाचे विचार समजूनच कीं काय त्या निर्जीव यंत्रानें हर्षातिरेकानें आपली पसंती व्यक्त केली असावी.

हल्क्या झालेल्या हृदयानें तो झपाझप पावलें टाकीत घराकडे निघाला— !



# त्याची पहिली कादंबरी—!

एक दोन गद्यकाव्यें, आणि दोन चार भाषांतरित गोष्टी एवढी वाङ्मयसेवा उरकल्या-नंतर राजाभाऊनें सरस्वतीला याहून अधिक छळण्याचें साफ नाकारलें. सदरहू लिखाण प्रसिद्ध होऊन आल्यावर त्याच्या कात्रणावर उर्वरित आयुष्य व्यतित करण्याचें राजाभाऊनें ठरवून टाकिलें होतें. ओळखीच्या संपादकांनीं त्याची ही अल्पस्वल्प सेवा गोड करून घेतली आणि सरस्वतीच्या पायीं वाहून टाकली. राजाभाऊला स्वजनांचें ऋण फेडण्याइतकें समाधान झालें—

--पण पुढें दोनाचे चार हात झाल्यावर एके दिवशीं सहजच घरच्या सरस्वतीनें, सिंधूनें, आपल्या पतिराजांचे हे चाळे अडगळीच्या खोलींतून बाहेर उजेडांत आणले. प्रथम तिचा डोळ्यांवर विश्वासच बसेना. एक वेळ मोती वधारेचें पुस्तक राजाभाऊच्या खिशांत सांपडलें असतें तरी तिला एवढा आश्चर्याचा झटका आला नसता. अंघोळीच्या वेळीं न्हाणीघरांतून चालू सिनेमांतील गाण्यांचें आलाप त्याच्या तोंडून ऐकूं येण्याऐवजीं पुरुष-सूक्त, गणपतिअथर्वशीर्ष इत्यादि संस्कृत कटकटी पश्चात्तप्त सुरांत म्हटलेल्या कानीं पडल्या असत्या तरी तिचें नेत्र इतकें विस्फारलें गेले नसते. किंवा रोजच्या ड्रेअर्सच्या पांढऱ्या

उदबत्तीएवजीं खाकी लवंगी त्याच्या ओठांत लटकलेली पाहून तिला इतकें विस्मयजनक वाटलें नसतें. ! पण राजाभाऊच्या ठेंगण्या ठुसक्या, सावळ्या बावळट मूर्तींत वाङ्मयांत शिलेदारी गाजविण्याची सुप्त इच्छा वावरत आहे--हें पाहतांच तिला परमावधीचें आश्चर्य वाटलें. मारवाडाच्या वाळवंटांतील विहिरी खोल तर खऱ्याच, पण पाण्याचा झरा मात्र सततचा हेंच खरें. त्याच वेळीं तिनें मनाशीं ठरवून टाकलें कीं, स्त्री ही पुरुषाची स्फूर्तिदेवता आहे; त्याची कीर्ति त्रिखंडांत पसरण्याइतकी अचाट कृति स्त्रीनें पुरुषाकडून करवून घेतली तरच तिच्या अयुष्याचें सफलत्व झालें असें म्हणतां येईल.

त्याप्रमाणें सिंधूकडून पृच्छा होतांच राजाभाऊनें लाजत मुरकत आपली वाङ्मयसेवा तिच्याजवळ कबूल केली.

' तसं म्हटलं तर–कांहीं फारसं मीं लिहिलं नाहीं. पण माझ्या कांहीं स्नेह्यांच्या मतें मीं जें लिहिलं आहे तें अपूर्व आहे. मीं लिहिलेलं वाचून कांहीं कांहीं नाणावलेले वृद्ध लेखक मुर्च्छा येऊन पडले होते असंही मला मागाहून कळलं. पण जाऊं दे. त्याची आतां वाच्यता पाहिजे कशाला ? एकदां वाहून गेलेला पाणलोट माघारीं येणं शक्य नाहीं.' राजाभाऊ दैवी तेजानें झळकल्यासारखी मुद्रा बनवण्याचा प्रयत्न करीत म्हणाला.

पाणलोटाच्या खबबीवर स्वस्थ बसणारी सिंधू नव्हती. सिंधूला पाणलोट पूर्ण परिचित असतात.

' उद्यांपासून तुम्ही ऑफिसांतून परत आलांत कीं कांहीं तरी लिहीत बसा.' सिंधू गंभीरपणानें म्हणाली.

' अग पण–मला आतां सिनेमाची निर्बुद्ध जाहिरातसुद्धां लिहितां यायची नाही–' राजाभाऊ सचिंत मुद्रेनें म्हणाला.

' हेंच तें. मी नव्हतें तेंव्हां तुम्हाला लिहायला सुचलं. अन् आतां मी सांगतें म्हणून सुचत नाहीं होय ? आणि बायकांचे कैवारी म्हणून म्हणवून घेतानं स्वतःला ! नुसती तोंडाची वाफ दवडायला काय जातं ! पुरुषांची जातच मेली ही अशी. त्यांच्याशीं कितीही गोडीनं घेतलं तरी बायकोच्या मर्जीविरुद्ध वागण्यांतच त्यांना पुरुषार्थ वाटायचा ! ' सिंधू आकाशांतल्या दूरवर उडणाऱ्या घारीकडे पहात उद्गारली.

'——पण मला सांग—वाङ्मयीन लिखाण करणं म्हणजे तें कां शुद्धलेखन लिहिणं समजतेस कीं काय तूं? कां मारवाड्याची कीर्दखतावणी समजतेस?' राजाभाऊ अजीजीच्या सुरांत म्हणाला.

'मी काय वाटेल तें समजेन. तुम्हांला माझ्या म्हणण्याप्रमाणें वागायचं नाहीं नं! स्त्रियांना पायदळीं तुडविण्याचा तुमचा हट्टाग्रह कायम आहे नं? मग माझ्याशीं बोलूं नका.' सिंधू बगळ्यासारखी ताठ मान करून म्हणाली.

'हा शुद्ध जुलूम आहे तुझा. 'गाढव हो' म्हटल्यानं कां माणसाला आपलें रूप पालटतां येणार आहे?' राजाभाऊ म्हणाला.

'उगीच शब्दच्छल करूं नका. मी तुम्हांला लेखक व्हायला सांगितलं आहे. दुसरं कांहीं नाहीं——!' सिंधू हंसूं दाबून म्हणाली.

'त्याचाच अर्थ तो. मला काय इतकं समजत नाहीं? पण मी तुला विचारतों——इतकं तूं मला बोलतेस-तूंहि इंटरला तीनदां बसली होतीस; सांग, तूं तरी काय लिहिलं आहेस एवढं? राजाभाऊ विजयी मुद्रेने तिच्याकडे पहात म्हणाला.

सिंधूनें पदर सांवरण्याच्या मिषानें त्याच्या बोलण्याकडे लक्ष नसल्यासारखें दाखवलें.

'आतां कां तोंडाला कुलूप? म्हटलं सौभाग्यवती सिंधूबाई, आपण त्या दृष्टीनें काय गूण उधळले आहेत तें आम्हांला कृपा करून सांगाल का? म्हणजे या प्रांतांत अधिकार-वाणीनें बोलण्याची आपली लायकी तरी आम्हांला कळून येईल.' सभा जिंकल्याचा आनंद राजाभाऊच्या तोंडावर खेळत होता. आनंदाच्या भरांत त्यानें पाकिटांतील एक सिगारेट फूल उचलल्यागत नाजुकपणानें बाहेर काढली, तिच्यावरचा छाप हंसतमुखानें वाचला आणि मोठ्या भक्तिभावानें ती ओठांच्या मध्यें सरकावून दिली.

'दुसऱ्याचा उणेपणा काढण्याच्या भरांत माणसाला सूर्यप्रकाशाइतका स्वच्छ असलेला पुरावासुद्धां दृष्टिआड करतां येतो.' सिंधू किंचित् फणकाऱ्यानें गुरकावली. राजाभाऊ दचकला. त्याच्या ओठांतली सिगारेट गळून पडली. घशाला कोरड पडल्यासारखें वाटून त्यानें आवंढा गिळण्याचा प्रयत्न केला.

'म्हणजे एखाद्या स्त्रीमासिकांत चटण्या कोशिंबरी कशा कराव्यात या संबंधींची ब्रह्मदेवाच्या बापालाहि न समजणारी विकृतकृति देणं याला तूं वाङ्मयसेवा समजतेस?

भले ! आपलं लग्न होण्याच्या आधीं मला ही वार्ता माहीत नव्हती म्हणून तर हा योग जुळून आला. पुढें माझ्या ऑफिसांतल्या मंडळींनीं तुझें हें तेजोवलय माझ्या डोळ्यांत खुपसलं, तेव्हां मी तर गारच पडलें. काय म्हणे-' भोपळ्याच्या सालीचा मुरंबा !' माणसाच्या मेंदूचा असा मुरंबा होत असेल याची त्या क्षणापर्यंत मला कल्पनासुद्धां नव्हती.' राजाभाऊ तावातावानें म्हणाला.

सिंधूच्या नाकाची बोंडी हा वेळपर्यंत रागानें लाल झाली होती. क्रोधातिशयानें तिचे विशाल वक्षःस्थळ सागराच्या भरतीओहटीप्रमाणें आंदोलन पावत होतें. त्या चिमुकल्या कोनाड्यांत दडून बसलेले फुफ्फुस बांध फोडून बाहेर येऊं नये म्हणून थरथरणाऱ्या हातानें तिनें घट्ट दाबून ठेवलें होतें.

' इतके तुम्ही कुचाळखोर असाल याची मला कल्पना नव्हती–' ती रागानें दातांच्या फटींतून फूत्कारली.

' अनुभवानें मनुष्य शाहणा होतो–' राजाभाऊ हंसत हंसत जमिनीवरची सिगारेट उचलून म्हणाला.

' असं ! मग तुम्हाला इतकी चिरड असेल माझ्या लिखाणाची, तर सांगतेच--दोन महिन्यांच्या आंत एखादी कादंबरी, किंवा एखादा प्रबंध जर लिहिलांत तर बरं आहे, नाहीं तर मी स्वतः लिहीन आणि ' सूड ' म्हणून तुमच्या नांवावर छापायला टाकीन समजलांत ! ' सिंधूनें कपाळावरचे केस मागें सारीत म्हटलें.

राजाभाऊची सिगारेट पुन्हां खालीं पडली. ती उचलून घेण्याचें त्याच्या अंगांत अवसानच उरलें नाहीं. सिगारेटच्या पेटीवरच्या दाढीवाल्या कप्तानसाहेबाचा त्याला अतोनात हेवा वाटला.--

* * * *

परंतु पुन्हां चेतलेलें इंधन आपली दाहकता प्रगट केल्याशिवाय सोडील कां ? वयांत आल्यापासून स्त्रीमंडळींत उठबस करण्याची संवय लागलेला प्रेमी पागल प्रतिकूल परिस्थितीच्या ढगाआडून आपली छबी बाहेर काढल्याशिवाय राहील कां ? हेरलेल्या रत्नाचा ठावठिकाणा शोधून काढल्याखेरीज कोणता तरुण वीर स्वस्थ बसेल ? राजाभाऊ तसा हाडाचा सोज्वळ होता. पण ओळखीच्या एका संपादकानें त्याला आपल्या मासिकाचें

अंगण चरायला मोकळें करून दिल्यामुळें त्याला दशदिशा ठेंगण्या वाटूं लागल्या. त्यांत पुन्हां त्याची आयुष्यांतली पहिली पेन्शन कॉलेजच्या रूपानें शांतपणें चाललेली. वेळेला काय तोटा ? लिहिल्या कांहीं थोड्याशा भानगडी आणि आणखीहि खूप लिहितां. परंतु कॉलेजचें पेन्शनी आयुष्य संपलें, इनकमटॅक्स ऑफिसांत नोकरी लागली, आणि पुण्याच्या कॉलेजांत चार वर्षें चिमखड्याप्रमाणें उडून दिसणारी सिंधू ह्याच्यावर पहारेकरी म्हणून आली—आणि तेव्हांपासून त्यानें वाङ्मय कल्पिण्यापेक्षां जगविण्याकडे जास्त लक्ष द्यायचें ठरवून टाकलें. एकदोनदां त्यानें आपला जुना मूर्खपणा सिंधूच्या गैरहजेरींत चालून पाहिला; पण त्याची त्याला लाज वाटूं लागली. मनुष्यप्राणी कोणत्याही कां होईना पण एखाद्या कैफानें कसा बेताल बनतो याचा पुरावा त्याला पुरेपूर मिळाला. ते कागद त्याला फाडून टाकण्याची इच्छा होईना आणि घरांत नजरेसमोर ठेवावेसें वाटेना. शेवटीं सुवर्ण-मध्य म्हणून त्यानें त्यांना अडगळीमध्यें कोंबून दिलें आणि अशा रीतीनें दृष्टीआड केलेल्या पापाचें आपण धनी नव्हतच अशा थाटांत तो राहूं लागला.

पण आतां सिंधूनेंच उचल खाल्ली होती. आतां माघार घ्यावी तर पत्नीच्या लेखणीनें आपली बेअब्रू होण्याचा बांका वक्त. त्यानें विचार करून पाहिलें. असल्या चमत्कारिक प्रसंगाला मराठ्यांच्या इतिहासांत फक्त आनंदीबाईची तोड होती आणि त्या वेळीं सुद्धां राघोभरारीनें शरणागति कबूल केल्यानें त्या बाईनें कुलाचा विच्छेद घडवून आणला. इतिहास एवढ्याकरतां शिकायचा असतो. बायकोच्या हातातली आपली अब्रू युक्तीनें कशी काढून घ्यावी हें शाळेंत इतिहास शिकल्यानें राजाभाऊला चटकन समजलें. आणि त्यानें ठरवून टाकलें कीं—

एक महिनाभर राजाभाऊचा मेंदू ठिकाणावर नव्हता. ऑफिसांत, घरीं, रस्त्यांत किंवा मित्राच्या बरोबर चौपाटीवर तो शरिरानें हजर असे. परंतु त्याचें मन सतराव्या प्रकरणांतील बाबूरावांचा व त्यांच्या पत्नीचा प्रेमकलह रंगविण्यांत गुंतून गेलेलें असे. अनेक हास्यास्पद गोष्टी त्याच्या हातून त्या महिन्यांत घडल्या असतील. घरांत सिंधूनें मात्र मान मुरडून, लाडिकपणानें पहात, ' समजलं बरं का मला ' अशा थाटांत त्याच्यापुढें पुढें करावें. एखादे वेळीं गैरसावध स्थितींत त्याच्या मनांत विचारसुद्धां येई कीं कशाला लोक कादंबऱ्या लिहितात अन् बायकांचीं वर्णनं करतात ? त्यापेक्षां बायकांना बरोबर घेऊन हिमालयांत कां जात नाहींत ? पण पुन्हां कर्तव्याची जाणीव उत्पन्न होई आणि हा भयंकर विचार दूर

केला जाई. सिगारेटचा खुराक त्याला दुप्पट लागूं लागला. दिव्याचें बिल चढूं लागलें. त्याच्या डोळ्यावरची धुंदी वाढूं लागली. ऑफिसांत रजेच्या चिठ्या वारंवार जाऊं लागल्या. हेडक्लार्कनें त्याला 'आमचींसुद्धां लग्नं झालीं होतीं. आम्हालाही तरुण बायका होत्या—' अशी सूचना देऊन ठेवली होती परंतु राजाभाऊनें सोळा सोमवारच्या व्रताप्रमाणें लेखनाचें काम अत्यंत कठोरपणें चालवलें होतें. शेवटीं प्रत्येक गोष्टीला आदीप्रमाणें अंतहि असतो, या सृष्टिनियमाप्रमाणें आरंभिलेली लेखनतपस्या पूर्णावस्थेला पोहोंचून कादंबरी एकदांची पूर्ण झाली! राजाभाऊनें सिगारेटचें जळतें थोटूक खिडकींतून फेंकून दिलें, खुर्ची खर्रकन् मागें ढकलली व सिंधूच्या अंगावर कागदांचा भारा भिरकावून दिला! समोरच्या आरशांत त्याला आपलें प्रतिबिंब सहजच दिसलें. एखाद्या प्रथितयश साहित्यिकाच्या फोटोकडे ज्या आदरानें खुळे वाचक मान वांकडी करून पाहतात त्या आविर्भावानें त्यानें स्वतःला आरशांत आपादमस्तक न्याहाळून पाहिलें.

त्याला स्वतःविषयीं आदर वाटला, अभिमान वाटला आणि थोडासा गर्वहि वाटला. लेखण्या मोडून तलवारी हातांत घेण्याचा उपदेश करणारे लोक किती खुळे असावेत याची त्याला साक्ष पटली. छेः! तलवार उचलतांना स्वतःचाच प्राण जाण्याची जेथें नव्याण्णव टक्के शक्यता त्या ठिकाणीं लेखणीनेंच बाजू सांवरून धरणें योग्य आहे. आजपर्यंत लेखणीच्या साहाय्यानें लोकांनीं थोड्या का घडामोडी जगांत घडवून आणल्या आहेत? सिंधूचा स्फूर्तिदायी सहवास आपल्याला घडायला आपल्या वडिलांचीच लेखणी कारण झाली होती. लेखणीनें काय करतां येणार नाहीं?

चोरांनासुद्धां लेखणीनें आजवर हात दिलेला आहे. लेखणीनें लढाया सुरू करतां येतात आणि शांतताहि प्रस्थापित करतां येते. नवराबायकोंतील युद्धेंसुद्धां लेखणीनेंच जमवून आणतां येतात. आणि कोर्टातला झगेवाला सद्गृहस्थ लेखणींच्या फटकाऱ्यानेंच त्यांना विभक्त करून त्यांचीं युद्धें मिटवितो. ज्या लेखणीनें अश्लील लिहिलें जातें तीच लेखणी त्यावर अश्लीलतेचा मोर्तब करते. शेवटच्या विचारासरशीं त्याचें त्यालाच हंसूं आलें.

त्यानें सहज मागें वळून पाहिलें. सिंधू आपल्याकडे पिंजऱ्यांतल्या पोपटासारखी तिरकी मान करून कौतुकानें व अभिमानानें पाहात असलेली त्याला दिसतांच त्यानें—पण नको!

* * * *

## त्याची पहिली कादंबरी—!

दुर्दैव राजाभाऊचें ! त्याचा दोस्त संपादक कुठल्याशा लफडयांत हात अडकण्याचा संभव दिसल्यामुळें दोन महिन्यांपूर्वीच गोव्याला फरारी झाला होता. तो गोव्यांत नक्की कोणत्या गांवीं होता हें त्याच्या पत्नीलासुद्धां माहीत नसल्याचें राजाभाऊला कळतां क्षणींच त्याचा सारा उत्साह मावळला. देवब्राह्मणासमक्ष 'नातिचरामि' म्हणून त्रिवार घोषिलेल्या शपथेला ठोकरीसरशी उडवून देऊन पत्नीला मुंबईत ठेवून स्वतः गोव्यांत चरायला गेलेल्या संपादकाची त्याला भयंकर चीड आली. लोक शपथा घेतात कां, आणि त्या घेतल्यानंतर मोडतात कां या विषयावर त्याच्या डोक्यांत वादळ माजून राहिले. संपादकासारख्या जबाबदार माणसानें तर न घेतलेल्या शपथासुद्धां पाळायला पाहिजेत, त्याशिवाय वाङ्मयाची अभिवृद्धि होणारं तरी कशी ?

शेवटीं एकदोन ठिकाणीं त्यानें चौकशी करण्यास सुरवात केली.

दादरच्या एका जुन्या पुस्तकाच्या दुकानदारानें हा एक अव्यापारेषु व्यापार आरंभिला होता. जुन्या पुस्तकाच्या विक्रीमुळें होणारा भरमसाट फायदा त्याच्या डोळ्यावर चढला होता कीं काय राम जाणे ! त्यानें हा प्रकाशनाचा आंतबट्टयाचा व्यवहार धडाक्यानें सुरू केला होता. आतांपर्यंत 'पुणेरी मैना' 'दिल्लीचा दिलखुष दिलवर,' 'साग्र संगीत शुकरंभा'— असल्या नवोनव प्रकाशनानें त्यानें इतर प्रकाशकांच्या छातीवर पाय दिल्याप्रमाणें करून सोडलें होतें.

राजाभाऊंशीं त्यानें बोलणें सुरू केलें—

'मंग—तुम्हीं हा बद्दा जाडा किताब लिखला हाय. त्येचा वजन तो दहा पांच शेर पूरा भरेल. असला किताब छेपून आंमी खावां काय ? हे तुमचा गरंथ छेपला तर आमाला शिवी खावा लागेल.' त्यानें मिशांच्या बुखुंडावर तळहात फिरवीत म्हटलें.

'पण शेटजी, ही कादंबरी आहे, कादंबरीवाचनाचं लोकांना बेसुमार वेड आहे. लोक जेवायचं विसरतील, स्वतःचीं सुखदुःख विसरून काल्पनिक सुखदुःखानं त्यांच्या छातींत कालवाकालव होईल. तुम्हीं विचार करा—' राजाभाऊ सिंधूकडे पहात म्हणाला. सिंधूनें डोळ्यानेंच आपला नैतिक पाठिंबा व्यक्त केला.

'आमी छेपणार नाय असा नाहीं बोलले. छेपेल ? कां नई छेपेल ! फौरन् दमडा काय दल ते तर बोलेल का नाय ?' शेटजींनीं हातानें मानेवरचीं चिलटें उडवीत म्हटलें.

' म्हणजे ? ' सिंधू आणि राजाभाऊ दोघेही जण आश्चर्यानें म्हणाले !

आणि नंतर लौकरच त्यांच्या ध्यानांत आलें. पैसा रोख, माल चोख ! राजाभाऊनें पांचशें रुपये द्यावे. ग्रंथ छापून शेटजी देतील आणि मग—मग कशाला एकमेकाला भेटा-वयाचं आहे ? एकदां पृथ्वी निर्माण करून परमेश्वरानें माणसाच्या हवालीं केली आहे. आतां तिचं नफानुकसान काय झालं आहे याची चौकशी करायला तो डाकुरजी कधीं येतो आहे का ? तसंच—! राजाभाऊनें आपला चेहरा शक्य तोंवर निर्विकार ठेवण्याचा आटोकाट प्रयत्न करून म्हटलें, ' पण शेटजी, हा व्यवहार नाहीं— ' आपल्याला व्यवहार शिकवायला निघालेल्या ह्या जोडप्याकडे शेटजींनीं एकवार निरखून पाहिलें.

' अरे कसला वेवहार बोलते ? मेरा बाप, असा भरताड लिखवाण्यापरीस एकादा आषुकमाषुकचा वग लिहून आण. इतिहासमधिल जोरकस केरेक्टर घालेल तो एकदम पांच रुपिया छोडेल. ' मुंबईची नखरेल भीमी ' लिवेल तो एक रुपिया कम. येला व्यवहार बोलते. समजावो नथी ?' शेटजी धोतराच्या सोग्यानें नाक साफ करीत म्हणाले.

राजाभाऊ आणि सिंधू वादळांत शिडें बेपत्ता झालेल्या जहाजाप्रमाणें झुकत झुकत घरीं आले.

*　　*　　*　　*

एके दिवशीं अचानक राजाभाऊला पत्ता लागला. ' के. के आणि के ' कंपनीच्या शेवटच्या ' के 'ची म्हणजे कुळकर्णी या गृहस्थाची त्यानें विजेच्या वेगानें जाऊन गांठ घेतली. ही तीन ' के 'ची कंपनी म्हणजे आंधळे परंतु ज्ञान, वय आणि तप या तिन्हींचाही अकारण बकवा माजवणारे खुडुक काशिनाथपंत आजोबा. मधला के सध्यांचे पिढींतील व्यवहारी केशवरावांबद्दल आलेला होता. शेवटचा के कुळकर्णी ह्या आडनांवाबद्दल असावा किंवा केशवरावांच्या तान्ह्या आणि अजाण कमलाकराबद्दल असावा. तें कांहीं असेना, आजपर्यंत २५–३० कथाकादंबऱ्यांचे ग्रंथ त्यांच्याकरवीं वाङ्मयसरितेला येऊन मिळाले होते. शेवटच्या माळ्यावर एका अंधाऱ्या खोलींत जाऊन केशवरावांजवळ त्या दोघांनीं आपला मनसुबा व्यक्त केला. भवति न भवति होऊन शेवटीं कागदोपत्रीं कलमांची नोंद करण्यांत आली. राजाभाऊनें लेखकाचा मेहनताना २०० पृष्ठांला निदान ४०० रु. तरी मिळावा म्हणून सूचना केली. परंतु केशवरावांनीं एकवार छद्मी हास्य करून

ती बेमालूम फेटाळून लावली. शेवटीं सिंधूनें दोनशेंपर्यंत मिळावे ही सूचना पुढें केली. आणि ही उपसूचना कुळकर्णी यांनीं बराच वेळ विचार करून, मोठा अनुग्रह करीत आहोंत अशा मुद्रेनें मान्य केली. मात्र पैशाचे व्यवहार पुस्तक बाहेर पडल्यानंतर दोन महिन्यांनीं विचारांत घेतले जातील, हें त्यांनीं बजावून सांगितलें. आणि पुरवठा व मागणी, या विश्वाला वेढून टाकणाऱ्या तत्त्वास अनुसरून सिंधूनें व राजाभाऊनें जास्त ताणून न धरण्याचें ठरविलें. इतर किरकोळ बाबतींत कुळकर्णी यांनीं तारतम्यभावानें जें काय योग्य दिसेल तें करावें असें ठरलें.

कादंबरी प्रसिद्ध होऊन दोन महिने पुरे होत आले तरी आपल्या कादंबरीविषयीं कोणासही कांहींच कसें म्हणावयाचें नाहीं ह्याचें राजाभाऊस भयंकर आश्चर्य वाटलें. यःकश्चित् प्लेगाची किंवा महामारीची सांथ उपटली तरी लोकांना त्या विषयाची चर्चा केल्याशिवाय करमत नाहीं. एखाद्या फडतुस राजकीय पुढाऱ्यानें एक अर्धा इंच हास्य केलें तरी वर्तमानपत्रांना आवेगाचे झटके येतात. आणि मॅट्रिकसारख्या बाजारबुणग्या परिक्षेला नेमलेल्या उताऱ्यांत एखाद्या कोपऱ्यांत असलेल्या शब्दाला उद्देशून, इच्छित् रूप घ्यावें कां इच्छेत् घ्यावें यासंबंधीं वर्तमानपत्रांत रकानेच्या रकाने खरडले जातात; अन् सामाजिक, राजकीय, शैक्षणिक, मानसशास्त्रीय इत्यादि अनेक मुद्द्यांचा सखोल परामर्ष घेणाऱ्या ललित कृतीकडे कोणी वळून पाह्यला तयार नाहीं !

राजाभाऊंच्या हृदयांतला एक कोपरा या अन्यायाविरुद्ध खवळून गेला होता. आपल्या या नूतन कृतीनें जगाचें नाहीं तरी महाराष्ट्राचें लक्ष आपणाकडे वेधून घेऊं ही त्याची स्वाभिमानी पूर्व कल्पना होती. आजपर्यंतच्या लेखकांना जें शक्य कोटींत वाटलें नाहीं तें तो करून दाखवणार होता. ललितवाङ्मयाच्या द्वारें त्याला समाजांतील दुःखें चव्हाट्यावर मांडून दाखवायचीं होतीं. त्यानें अन्यायाची दवंडी पिटवली होती, पण दुर्दैवानें ती माळरानावर पिटवल्यासारखी झाली होती. महाराष्ट्राच्या बुद्धिमत्तेविषयीं ज्या त्याच्या आजवरच्या उच्च कल्पना होत्या त्या हळूहळू विलयाला जाऊं पहात होत्या. कादंबरी लिहिणं म्हणजे काय हातचा मळ ! एक महिन्यांत आजवरच्या लेखकांना त्यांच्या डळमळीत सिंहासनावरून खालीं ओढतां येईल, अशा स्वरूपाची घोषणा त्यानें किती तरी वेळां सिंधूसमोर उच्चारली होती. परंतु हा सध्यांचा प्रकार मात्र पूर्णपणें अनपेक्षित असाच होता.

सिंधूनें खूप उचलून धरलें. त्याच्या पुस्तकावर आपल्या महिला समाजांत एक दिवस चर्चाही घडवून आणली. पण चर्चेच्या दिवशीं तिनें एक चूक केली. आधीं अल्पोपहार

झाल्यामुळें महिलागणांना एकदम कामें असल्याची आठवण झाली; त्यामुळें चर्चा फार महागांत पडली.

पुस्तकाप्रीत्यर्थ मित्रांना चहापाणी देण्यांत झालेला खर्च तरी भरून निघावा म्हणून एका रविवारीं राजाभाऊ सिंधूला घेऊन गिरगांवांत के. के. आणि के. कंपनीच्या दुकानीं म्हणजे बिऱ्हाडीं सकाळीं दहाच्या सुमारास गेला.

फाटक्या सतरंजीच्या एका टोकाला एक मळका पंचा लावून एका कळकट कारागिरां-कडून केशवराव श्मश्रू करवून घेण्यांत गर्क झाले होतें. तोंडावरचा साबण ' फू ' करून बाजूस करीत केशवरावांनीं त्यांचें स्वागत केलें. वृद्ध आजोबांनीं सार्थ सत्यनारायणाची पोथी जास्तच डोळ्यावर ओढून घेतली. मागच्या खोलींतून रडण्याचे व चिडून बोलल्याचे आवाज बाहेर येत होते. मधून मधून समोरच्या नळावरील जलसा हवेच्या झोताबरोबर अस्पष्टपणें कानावर पडत होताच. कोणालाही घाई नसल्यानें स्पष्ट दिसत होतें. घाई काय ती लेख-कांच्या वांट्याला आलेली असते. बऱ्याच वेळानंतर केशवरावांनीं कारागिराची ' पुढच्या रविवारीं ये ' म्हणून हवाल्यावर बोळवण केली. एका कळकट दोरीनं आवळलेल्या दोन औंसच्या हिरव्या बाटलींतलें काळें मिचकूट तेल केशरावांनीं शेंडीला चोपडलें व तोच हात तोंडावरून फिरवला.

' आम्ही आज मुद्दाम आलों आहोंत—' राजाभाऊनें बेफिकीरी थाटांत म्हटलें.

' वाः ! वाः ! छान ! आलांत ? आनंद आहे. अहो, असं आल्यागेल्याशिवाय का भागणार आहे ? ' जानव्यांत माळेसारखा हात अडकवून केशवराव हंसत म्हणाले.

' नाहीं, म्हटलं—दोन महिने कालच झाले—' सिंधूनें हळूच म्हटलें.

' दोन महिने झाले अं ! काय वेळ झपाट्यानं जातो पहा ! आज दोनच झाले. आणखी दोन महिन्यांनीं चार महिने गेले म्हणून तुम्हीच म्हणाल. सांगा—म्हणाल कीं नाहीं ? ' केशवराव धोतराचा सोगा साफ करीत म्हणाले.

हा पेंच विलक्षण होता. राजाभाऊला शक्य तोंवर दूर ढकलण्याचें त्याचें धोरण उघड दिसत होतें. ' मला तें नाहीं म्हणायचं. माझं म्हणणं असं कीं—, थांबा ऐका माझं,—कीं आपल्या पैशाचं काय करायचं? आम्हाला तूर्त फार नड आहे म्हणून आम्ही आज आलों आहोंत. ' राजाभाऊ सपाट्यानें बोलून गेला.

केशवराव क्षणभर सचिंत उभे राहिले. पण पंचवीसतीस पुस्तकें काढणारा प्रकाशक कांहीं कोंबडीच्या हृदयाचा बनलेला नसतो. लगेच त्यांनीं हंसत हंसत राजाभाऊकडे तिरक्या नजरेनें पाहिल्यासारखें करून म्हटलें—

‘ अगदीं त्याच तजविजींत आज मी होतों. आलांत हें फार छान केलंत. म्हणजे तेवढाच भार माझ्या डोक्यावरचा कमी होईल, काय ? पण त्याला एक गोष्ट कराल का—? आतां माझ्याजवळ कांहीं नाहीं; दुपारीं तिपारीं किंवा उद्यां परवां आलांत तर पहा—म्हणजे पुन्हां तुम्हांला हेलपाटा नको—’

राजाभाऊला आतां मात्र हें कूळ विश्वासाचें आहे असें वाटेना. आणि ही खेप फुकट गेल्यावर आणखी किती खेपा माराव्या लागणार याचा त्याला अंदाज करतां येईना.

‘ आम्ही दुपारीं दोन तीन वाजतां आलों तर—’ सिंधूनें हलकेच म्हटलें.

‘ उत्तम ! कांहीं हरकत नाहीं. मी घरांत नसलों तर आमचे तीर्थरूप आहेतच. मात्र जरा मोठ्यानं बोलावं लागतं. कानानं जरा अधु आहेत. वयच मुळीं सत्तर झालं आहे ना ’ केशवराव एकवार वडिलांकडे साभिमान दृष्टिक्षेप टाकून म्हणाले.

‘ नक्की—? ” राजाभाऊनें टोपी डोक्यावर ठेवीत म्हटलें.

* * * *

दुपारचा तीन वाजेपर्यंतचा वेळ त्यांनीं कांदेवाडींतल्या एका स्नेह्याचे घरीं काढला. आणि तीन वाजतां नाटकाला जाण्याची स्नेह्याला थाप मारून ते केशवरावांच्या ताजमहालाकडे वळले.

खोलीच्या सकाळच्या स्वरूपांत काडीचाहि फरक नव्हता. उन्हाच्या चढउतारानें यत्किंचितहि फरक न पडणारी ती खोली होती. आंतल्या खोलींतून घोरण्याचे आवाज येत होते. नळावर सामसूम होती. आणि क्वचित् एखाद्या भटक्या कावळ्याच्या कर्कश ओरडण्यापलीकडे जवळचा असा दुसरा कोणताच आवाज ऐकूं येत नव्हता.

आजोबा एका पोत्यावर अंग टाकून निद्राधीन झालेले दिसत होते. त्यांना उठवणें सोपें काम नव्हतें.

‘ केशवराव कुठें आहेत ? ’ राजाभाऊनें तिसऱ्यांदा ओरडून म्हटल्यावर त्यांनीं एकवार जांभई दिली.

‘ ऍं ऽऽऽऽऽ ’ त्यांनीं पृच्छा केली. राजाभाऊनें पुन्हां आपला प्रश्न उच्चारला.

' नागपूर–नागपूर. ' आजोबानें हातानें पुढचें वाक्य पूर्ण केलें.

' मी त्यांची गांठ घ्यायला सकाळीं आलों होतों. व्यवहार मिटवायचा आहे. ' राजाभाऊ ओरडून म्हणाला.

' एँ ऽ ऽ ऽ–' आजोबांनीं बावळट मुद्रा करून म्हटलें. राजाभाऊ पुन्हां जोरानें ओरडला.

' किती मोठ्यानें ओरडतां! मला काय ऐकायला येत नाहीं ? ' आजोबा रागानें उसळी खाऊन म्हणाले.

मोठ्या कष्टानें राजाभाऊनें आपल्या आगमनाचा हेतु कथन केला. आजोबानें डांबर माखलेल्या तरटांत गुंडाळलेला एक गठ्ठा आणून त्याच्यापुढें ठेवला. राजाभाऊ थक्कच झाला. त्याच्याच कादंबरीच्या त्या प्रती होत्या!

' पुस्तकं मिळालीं आहेत. आतां पैसे पाहिजेत—' राजाभाऊ म्हणाला.

' स्वतःचीं पुस्तकं तुम्हांला नकोत ? लेखक स्वतःच आपल्या पुस्तकांची किंमत मान्य करीत नाहीं ? मग लोकांनीं दोन रुपये देण्याची तरी तयारी कां दाखवावी ? केशवरावानं हिशोब करून कमिशन वजा जातां ह्या दोनशें रुपयांच्या प्रती तुमच्याकरतां काढून ठेवल्या आहेत. ह्या घ्या, विका नाहीं तर जाळून टाका. रीतसर पावती देऊन गठ्ठा घेऊन जा—' असें म्हणून आजोबा चंची सोडून बसले.

' अहो पण—' राजाभाऊनें खज्या सुरांत सुरवात केली.

' एँऽऽऽ—' आजोबांच्या दिशेनें कर्कश आवाज आला.

केशवरावांची लबाडी राजाभाऊनें ओळखली होती. आतां जास्त बोलण्यांत आपल्यालाच त्रास पडणार हें त्याला उघड दिसत होतें. त्यानें रागारागानें पावती लिहून दिली व एका हमालाला बोलवून त्याच्या डोक्यावर तो गठ्ठा दिला. सिंधू चिमणीसारखें तोंड करून त्याच्या मागोमाग त्या घराबाहेर पडली.

' त्या करकऱ्यांच्या दुकानीं चल—' राजाभाऊनें गंभीर चर्या करून म्हटलें.

करकऱ्यांच्या दुकानाच्या फळ्या अजून पुरत्या उघडलेल्या नव्हत्या. दुकानांत पुस्तकांचे भारे अस्ताव्यस्त पडलेले होते. मुंबईतील पुस्तकांचे घाऊक व्यापारी म्हणून करकरे ओळखले जात होते. एका मोठ्या टेबलावर बसून पुढ्यांत पडलेल्या खाऱ्या दाण्याचा समाचार घेण्यांत करकरे गर्क झाले होते. आसपास चहाचे डाग पडलेल्या कपबशा तशाच पडलेल्या

होत्या. एखाद दुसरी माशी मधून मधून लाडिकपणानें इकडून तिकडे उडत होती. निर्विकार मुद्रेनें करकऱ्यांनीं राजाभाऊंची विनंति मान्य केली.

—' तेव्हां पुस्तकाची योग्य ती किंमत आपण मला द्यावी—आणि त्या किंमतीचीं पुस्तकं मी आपल्याला देतों—' राजाभाऊ कपाळावरचा घाम पुशीत मोठ्या आशेनें म्हणाला.

करकऱ्यांनीं हातांतला शेवटचा दाणा तोंडांत टाकला, एकवार आकाशांत स्वैर हिंडणाऱ्या घारीकडे पाहून घेतलें. परंतु मोडलेली मांडी बिलकूल न सरकवतां घोगऱ्या आवाजांत म्हटलें—

' अरे बन्नू , ए बन्नू , मेला वाटतं लेकाचा—'

बन्नू मेला नव्हता हें त्याच्या लवकरच झालेल्या आगमनावरून सिद्ध झालें.

' अरे, त्या शेजारच्या शंकरराव कोळसेवाल्याकडे जा अन त्यांच्याकडून मणाचा कांटा घेऊन ये. ' करकरे दाढी खाजवीत म्हणाले;

सिंधु एकदम दचकल्यासारखी झाली. तिनें घाबऱ्या घाबऱ्या राजाभाऊच्या कानांत कांहीं तरी म्हटलें. राजाभाऊचा चेहरा खर्‌दिशी उतरला !

तो लागलाच करकऱ्यांकडे वळून म्हणाला, " म्हणजे माझीं पुस्तकं तुम्हीं वजनावर घेणार कीं काय ?'

करकरे हंसले नाहींत. डोळ्याची पापणी वर उचलून आश्चर्य वाटल्यासारखें करून ते म्हणाले–' मग ! त्यांत काय बिघडलं ?'

राजाभाऊनें सिंधूचा हात धरून तिला जवळजवळ ओढीतच बाहेर नेलें.

' पुन्हां लेखक व्हायला सांगशील ? चल आधीं घरीं—' असें तिच्या कानाशीं फुसकारल्यासारखें करून तो तिला हाताला धरून समोरच्या धांवत्या ट्रामगाडीकडे धांवला.

फुटपाथवर चंची पसरून बसलेला हेलकरी दचकून ताड्‌कन उठून उभा राहिला.

' अहो शेटसाहेब, माझी मजुरी द्या ना—' तो ओरडून म्हणाला.

ट्राममध्यें बसलेल्या राजाभाऊनें चेहऱ्यावर समाधानाचें हास्य आणून ' काडी लाव त्या गठ्ठ्याला ' असें खुणेनेंच सांगितलें !

ट्रॅम निघून गेली !

---

# भिकारडा

“कवाधरनं वाट बघतुया, पर तानी त्वांड बी करीना हकडं ! ” किंचित् निराशेच्य उद्वेगानें तर किंचित् स्वतःवरच चिडलेल्या सुरांत त्या मुलानें हातांतील ठिसूळ मुरुमाचा खडा दूर एका वठलेल्या झाडावरील कावळ्यावर भिरकावून देत म्हटलें. मुरुमाचा खडा अलीकडेच पडला; परंतु त्या आवाजानें कावळा ‘फरफर’ असा पंखाचा आवाज करीत दूर उडून गेला. पुन्हा त्या मुलानें दुप्पट अवसानानें दुसरा एक खडा भिरकावून पाहिला. या वेळींहि त्याच्या नशिबीं अपयशच लिहिलें होतें. मनांतल्या मनांत एक इरसाल (अप) शब्द पुटपुटून दातांच्या फटींतून पिचकन थुंकी टाकीत त्यानें आपली जुजबी समाधानी करून घेण्याचा प्रयत्न केला. दातांच्या फटींतून दूर भिरकावलेली पिचकारी अपेक्षेप्रमाणें झोकांत उडाली नाहीं. इतकेंच नव्हे तर आधींच रंगीबेरंगी मळक्या आणि फाटक्या कुडत्याच्या टोकाला तिनें जातां जातां चांगलाच प्रसाद दिला होता. परंतु असल्या या नाजूक प्रकाराकडे लक्ष पुरवून मनाचा समतोलपणा बिघडूं देण्याइतका तो लेच्यापेच्या मनाचा नव्हता असें दिसलें. स्वच्छता, नीटनेटकेपणा इत्यादि आधुनिक खुळें अजून त्याच्या मनाला स्पर्शहि करून गेलेलीं नसावींत हें त्याच्या कपड्यांवरून उघड दिसत होतें. दोन महिन्यांपूर्वी ग्रहणाच्या दिवशीं एका म्हातारीच्या

बोचक्यांतून लंपास करून आणलेलें फाजील लांब कुडतें त्याच्या आंगावर आजून टिकून राहिलें होतें. सदरा बराच लांब, म्हणजे गुढघ्यापर्यंत पोंहोचणारा असल्यामुळें एक मळकी लंगोटी त्याची शिल्लक असलेली अब्रू संभाळण्यास पुरेशी होती असें दिसत होतें. चिंध्या बाटलीवाल्या बाईनें संतापानें फेकून मारलेली एक फाटकी वहाण काथ्याच्या दोरीनें आवळून त्यानें एका पायाला बक्षीस देऊन टाकली होती; व दुसऱ्या पायांत एका देवळां-तून घाईघाईनें एकच पळवून आणतां आलेला जाळीदार कॅन्व्हसचा बूट धोतराच्या कांठळीनें आवळून टाकलेला दिसत होता.

हातांतल्या जळक्या ॲल्युमिनियमच्या वाटीकडे त्यानें मोठ्या आशाळभूत नजरेनें पाहिलें. गांवांतल्या एका धनाढ्य गुजराथ्याच्या बंगल्यांत कसलासा समारंभ होता. त्या समारंभाप्रीत्यर्थ जेवणावळ झडली होती. रस्त्याच्या कडेला उभा राहून ' अन्न वाढा वो ताई ऽ ऽ ऽ ' म्हणून ऊर फुटेपर्यंत तो तब्बल तीन घंटे ओरडला होता. जगांत शक्य असतील तेवढे आशिर्वाद त्यानें त्या मालकाला बहाल केले होते. तीन बायका करूनहि त्या मालकाच्या न झालेल्या लेकाला त्यानें 'म्हातारा होईल' म्हणून रिकाम्या तोंडानें आशीर्वाद दिला होता. शेवटीं आशीर्वादानें ह्या लोकांच्या सद्बुद्धीवर कांहींहि परिणाम होत नाहीं हें पाहून त्यानें 'धर्म करा हो' म्हणून फुकटचा उपदेश करायला सुरुवात केली; व त्यानेंहि बधत नाहीं हें पाहून त्यानें चोरीचा राजमार्ग पत्करला. कुणब्याधुणब्यांना वाढ-ण्याकरतां एका हाऱ्यांत बुंदीच्या लाडवांचा ढीग त्यानें पाहिला आणि पातेल्यांतल्या दुधा-वर डल्ला मारणाऱ्या डोळेमिट्ट बोक्याप्रमाणें त्यानें मुसंडी मारली. कोण हाहाःकार उडाला ! एक भिकारडें कारटें मस्तवाल होऊन बागेंत शिरलें आणि लाडवाला हात लावूं लागलें. हा आश्चर्यजनक प्रकार जो तो तोंड फाटेपर्यंत दुसऱ्याला वर्णन करून सांगूं लागला. कोणी त्या कारट्याला 'चेंचून कां काढलें नाहीं ?' असा सवाल टाकूं लागले तर कोणी 'पोलीस काय मेले होते ?' असा रोखठोक प्रश्न टाकूं लागले. एकंदरींत चारदोन चापट्या व एक काठीचा फटकारा एवढ्या प्रसादचिन्हांवर भागून तो मुलगा तेथून निसटला. परंतु ह्या गडबडींत पळवतां आलेले दोन सबंध वाटोळे लाडू—त्यांच्याकडे पाहून त्यानें एक समाधानाचा सुस्कारा टाकला.

वाटींत आतां फक्त एकच लाडू शिल्लक होता. तोहि मटकावून टाकण्याची इच्छा वारंवार दाबून टाकतांना त्याच्या मनाला अतिशय ताण पडत असावा हें स्पष्ट होतें. अजून खाल्लेल्या

माराची आठवण बुझालेली नव्हती. मारणाऱ्यांच्याविरुद्ध त्याच्या मनांत कसल्याहि प्रकारचा राग नव्हता; परंतु मारामुळें अंग दुखत होतें ही जाणीव तो कसा विसरूं शकेल ? दुःखाची मानसिक बाजू त्याला मुळींच त्रास देत नव्हती. आज त्याच्या वयाला चौदा वर्षें होत आलीं होतीं. समजावयास लागल्यापासून तो जगाचे तडाखे एकटा सहन करीत होता. त्याच्या आईबापांची व त्याची तोंडओळखदेखील नव्हती. चोऱ्या करून जिन्नस कसे लाटावे, इतर पोरांशीं मारामाऱ्या करून आपल्याला हव्या असलेल्या वस्तु कशा मिळवाव्या, वेळप्रसंगीं बेधडक खोटें बोलून मार कसा चुकवावा, इत्यादि धंद्यास आवश्यक अशा गोष्टी त्यानें फार लहानपणापासून हस्तगत करून घेतल्या होत्या; परंतु आपल्याला 'मन' म्हणून कांहीं चीज आहे याचा मात्र अजून त्याला पत्ता लागला नव्हता; त्याच्या बरोबरीनें भीक मागणारी 'तानी' ह्याडानें जातिवंत स्त्री होती. बारा वर्षांची झिपरी, परकरी पोर—पण तिला अलीकडे एकदोन वर्षें या मनाची थोडी थोडी बाधा होऊं पाहत होती. नेहमीं नाहीं परंतु एकादे वेळेस झकपक पोषाक केलेली, एकाद्या चित्रविचित्र रंगाच्या दिव्यांनीं लखलखणाऱ्या कापडाच्या दुकानांतून बाहेर पडणारी स्त्री तिनें पाहिली, कीं ती किंचित् बावरल्यासारखी होई आणि ती स्त्री मोटरमध्यें जाऊन बसलेली पाहिली कीं मग तिला थोडासा रागच येई. चिमकुल्या डोक्यांत तो राग मावेनासा होई आणि पैसा मागण्याच्या निमित्तानें मोटार नाहीं तर नाहीं,. पण निदान मोटारच्या पायरीला तर पाय लागेल या खुळचट विचारानें भारून जाऊन ती पुढें सरके. मोटार निघून गेल्यावर क्षणभर ती मागच्या दिव्याकडे टक लावून पाही व थोड्याच वेळांत सर्व कांहीं विसरून जाई.

तसें त्या मुलाचें नव्हतें. एकदोन लाडवांकरितां इतका मार खाल्ला होता, पण त्याला ह्याच्यापेक्षां तानीची वाट पाहत बसण्याचाच घोर जास्त लागलेला होता. दिवसभर गांवांत भीक मागायची आणि प्रामाणिकपणानें व खोटेपणानें मिळविलेली लूट घेऊन संध्याकाळीं, दिवस कासराभर वर असतां, पर्वतीच्या मागच्या बाजूस जमायचें हा त्यांचा नित्याचा कार्यक्रम होता. त्यांत कारणपरत्वें थोडाफार फरक होत असे परंतु एरवीं दोघेंहिजण या ठिकाणीं रोज जमत असत. म्हणजे कोणत्याहि तऱ्हेचा लफड्याचा विचार यांच्या मनांत होता हा तर्क मात्र चुकीचा होईल. पुढचें कोणी सांगावें ? परंतु आज-मितीला त्यांना स्त्री-पुरुषांसंबंधींची अस्पष्टशी कल्पना जरी होती तरी त्या बाबतींत प्रयोग करण्याचें धाडस त्यांच्याच्यानें अजून करवलें नव्हतें. तानीला एकटीला रात्रीची भीति वाटत

असे म्हणून तिनें त्याची सोबत आज जवळ जवळ तीन वर्षे पत्करली होती आणि आपल्या दांडगाईचें प्रदर्शन कोणापुढें तरी करावें असें त्याला मनापासून वाटत होतें; म्हणून प्रेक्षक या नात्यानें तानी त्याला पसंत होती. तानी समोर असली कीं संध्याकाळीं पर्वतीच्या मागच्या बाजूला एखाद्या झाडाखालीं तो आपले खरेखोटे सर्व पराक्रम तिला सक्तीनें ऐकून घेण्यास भाग पाडीत असे—आणि तानी केव्हां कौतुकानें, तर केव्हां जांभई देऊन पिवळसर, काळसर दांतांचें प्रदर्शन करीत शांतपणें सर्व कांहीं ऐकून घेत असे. रात्र पडली कीं दोघेंहि गांवांत येत व जागा सापडेल तेथें अंगाच्या वळकट्या करून झोपीं जात—!

दूरवर समोरून दिसणारा काळा ठिपका पाहतांक्षणींच तो हातांतील वाटी खालीं ठेवून ताड्कन् उठून उभा राहिला. तानीशिवाय दुसऱ्या कुणाचा तो आकार असणार ?

डोक्यावरील बहुरंगी झिपऱ्या नारळाच्या करवंटीनें खाजवीत तानी ताड्ताड् उड्या मारीत येत असलेली त्यानें पाहिली. मधून मधून अब्रूसंरक्षणार्थ म्हणून गुंडाळून घेतलेल्या फाटक्या, विटक्या तुकड्याच्या पदरानें ती नाकतोंड पुशीत होती. तुकड्यानें गुडघ्यापर्यंत मजल मारलेली असल्यामुळें पावलावरील व घोट्यावरील शिरा ताठरलेल्या होत्या. ओरखाडे, जखमा, खोका सर्व कांहीं त्या चिमुकल्या देहावर हजर होतें. जवळ आल्यावर तिनें पाठीवर एका फडक्यांत बांधून आणलेली विटलेल्या भाताची व तार तुटणाऱ्या भाजीची लहानशी रास मोठ्या अभिमानानें त्याच्यापुढें ठेवली.

" भिका, लई—लई कटाळलें बग. दिवसभरून गांवांत फिरलें पर यक तुकडा दिसऽल तर अक्षी भैरूबाचीच शिपत. कायरं, आपल्यावानीच समदीं मानसं भिकारी हायतीं कारं—? " तानी पुनः डोक्याला करवंटी घाशीत म्हणाली.

" तसं नव्ह ताने ! त्येला माझ्यावानी हिकमत जुगाया लागती. तूं वराड, वराड वरडतीस, पर कंदीबीं चपळाई दावीत न्हाईस. ह्यो लाडू तुझ्याकरतां आनला त्यो काय मला पोटच्या गोळ्याला म्हून त्या मालकानं दिलाय व्हय ? " भिका तिच्यापुढें लाडूची वाटी सारून अभिमानानें म्हणाला.

" मुडद्यावानी मार खाल्लायसा ! पघू, पघू, दाव मला तुझ पाठान-( पाठ ) " तानीनें घाईघाईनें त्याच्या पाठीवरच्या फाटक्या सदऱ्यांत हात घातला. भिकानं कळवळून ' आईऽऽअ ' म्हणून म्हटलें. तानीनें कांहीं एक न बोलतां त्याची पाठ उघडी केली. पाठीवर बसलेल्या छडीचा काळानिळा वळ स्पष्टपणें दिसत होता. तानी काय करणार ?

असें कोठें लागलें तर लागलेल्या ठिकाणीं तेल लावतात हें तिला पाहून माहीत होतें; पण उभ्या वर्षांत स्वतःच्या झिपऱ्यांना सुद्धां तेलाचें बोट लागलें नव्हतें तें आतां भिकाच्या पाठीला लावायला कोठून आणणार ? रक्तावर माती टाकावी, ठेंच लागली तर गवताचा रस पिळावा, पण वळ दिसला तर त्याला काय करतात ?

आश्चर्याची गोष्ट ही कीं त्याच्या पाठीशीं बसून एका हातानें झिपऱ्या मागें सारीत, व दुसऱ्या हातानें त्याच्या दंडाचा आधार घेत लागलेल्या ठिकाणीं अत्यंत हळुवारपणानें तानीनें आपली ओली जीभ फिरवावयास सुरुवात केली. भिकाच्या वेदना यत्किंचितहि कमी झाल्या नाहींत; तरी पण तानीच्या, 'ग्वाड वाटतंय् कारं ?' या वारंवार विचारल्या जाणाऱ्या प्रश्नाला त्यानें आश्वासनपूर्वक 'तर तर, व्हय ग व्हय—!' इत्यादि उत्तरें देण्यास सुरुवात केली आणि खरोखरीच माराच्या वेदना जरी कमी झाल्या नाहींत तरी तानीची जीभ त्याच्या पाठीला लागतांच त्याला गुदगुल्या होऊं लागल्या. या गुदगुल्या शारीरिक होत्या आणि त्याला समजत नव्हतें—परंतु त्या मानसिकहि होत्या. आपल्याला असें कां वाटावें हें त्याला समजत नव्हतें; तें समजून घेण्याचा विचारहि त्यानें केला नाहीं.

"लई ग्वाड वाटतं, ताने. तूं अशी मला जीव लावूं लागलीस तर मी कितीबी मार खाईन; पर तुझ्याकरतां चार तुकडं आनल्याबिगर परतनार नाय." तो अभिमानानें तिच्या डोक्यावर हात फिरवून म्हणाला. तानीनें उत्तरादाखल त्याच्याकडे हसून पाहिलें व एकवार त्याच्या डोक्यावर आपलें डोकें जोरानें घासलें.

भिकानें मुकाट्यानें तिचें डोकें दूर केलें.

"आज डोकींतून किती किडं टपकलं ग ताने?" भिकानें तिच्या झिपऱ्या धरून म्हटलें.

"दोपारां एका पोरीनं ह्या करटीभर मारलं नव्हं का! अक्शी बेडकावनी तट्ट फुगल्या व्हत्या; अन टाणटाण उडत व्हत्या—भिका, आज एक नथवाली माय म्यां पघितली, काय तिचं क्यास व्हतं म्हून सांगूं? माझं क्यास तसं कंदी व्हनार न्हायती काय रं!" तानीनें आशाळभूतपणानें म्हटलें. तानीच्या स्वरांत आशानिराशा यांचा झगडा स्पष्ट दिसत होता. वर्तमानकाळांतील आहे त्यापेक्षां, भविष्यकाळांतील अज्ञात सुखाकडे स्त्री-जात नेहमीं याच पद्धतीनें पाहात असते. आजपर्यंत जगांतली कोणती स्त्री आहे त्यांत समाधान मानणारी निघाली आहे? तानी आईबापाविना भटकणारी एक भिकारडी पोरगी होती. तरी पण स्त्री-

जातीचा अनुवंशिक गुण तिच्यांत हळूहळू दृग्गोचर होऊं पाहत होता. भविष्यकाळचा पडदा दूर सारून त्यांत काय असावें हें पाहण्यासाठीं तिची बालबुद्धि तिला न कळत धडपडूं लागली होती. आणि भिका—? तो एकवार अत्यंत बावळट मुद्रा करून मोठ्यानें हसला—

" व्हय् ! व्हय् ! तुझं वयास अंबाडीच्या सुडक्यावानी लय मऊ व्हनार—आन मग तूं एकाद्या राजाची रानी व्हनार—आन फटकफटक करनाऱ्या चेपल्या पायात घालून एकाद्या बामनाच्या आवावानी शेरातून ( शहरांतून ) फिरनार—मग तुझ्या मोटारीपाशीं मीं येनार आन म्हननार—' शेट–सावकार, माझ्या गुनाची माय ! येग तुझ्या ल्येकराला योक पैसा—! व्हय ग व्हय ताने—" भिका तिच्या अंगावरच्या पदराला धरून ओढीत म्हणाला.

" दाताड इचकल—लई हसूं नगस—" तानी फणकाऱ्यानें म्हणाली.

भिकानें ओळखलें कीं तानीचा आजचा वार रागावण्याचा होता. गांवांत कुठेंहि कांहीं एखादी चांगली बाई दिसली कीं, तानीच्या अंगांत वारें भरत असें हें तो ओळखून होता आणि तसें वारें तिच्या अंगांत शिरलें कीं, तिचें लक्ष दुसरीकडे कुठें तरी गुंतविणें हाच एक मार्ग होता हें त्याला अनुभवानें पटलें होतें. आतां त्यानें लगबगीनें तिच्यापुढें लाडूची वाटी सारली, पण तानी आज इतक्या लवकर माघार घेणार नव्हती ! तिनें ती वाटी दूर ढकलून दिली.

" व्हय्, व्हय् ! माझ्याकरतां मार खा. एक दीस वढ्याला जा अन् तानीला राहूं दे जिंदी ( जिवंत ) डोकशींतले किडं उपटाया !" तानी एक एक शब्द संतापानें आपटून बोलत होती.

भिकाला तिची समजूत काढतां काढतां पुरेवाट झाली. भिकानें शेवटीं स्वतःच्या मनाविरुद्ध गोष्ट कबूल केली. बाज-पाळणे विणणें, लाकडें फोडून देणें इत्यादि किरकोळ कला त्याला अवगत होत्या. त्यांचा उपयोग करून चार पैसे मिळविण्याचें त्यानें कबूल केलें आणि मग पुलापलीकडच्या मोकळ्या पडलेल्या जागेवर तानी रॉकेल तेलाच्या भीक मागून आणलेल्या डबड्यांच्या मदतीनें एक मोठा राजवाडा बांधणार होती. त्या राजवाड्यांत त्या दोघांनीं दोन 'ल्येकरावानी' रहावयाचें किती साधा बेत होता ! ' अक्षी जोखाई शिपत, भइरूबा शिपत, आन् मरीआई शिपत, आन् सटवाई शिपत. आन् तानीच्या

गळ्याच्यान् !' अशा तऱ्हेचा शपथविधि जेव्हां झाला तेव्हां तानीनें लाडवाचा एक तुकडा भिकाच्या तोंडांत आणि दुसरा स्वतःच्या तोंडांत टाकला.

संध्याकाळच्या सावल्या हळूहळू लांबत चालल्या ! गांवांत परतण्याची त्यांची वेळ झाली होती. तानीनें भिकाच्या सदऱ्याला हात पुसले व भिकानें उलट तिच्या वस्त्राला हात पुसले ! दोघेहि जण हसत–खिदळत, रस्त्यांतील दगड उचलून समोरच्या झाडांवर भिरका-वीत पर्वतीच्या शेजारच्या रस्त्याला लागलीं अंधार पडूं लागला होता. आतांच ' खडकवा-सलें–खानापूर–डोणजे' वाली ठासून भरलेली मोटारगाडी त्यांच्यापुढूनच गेली होती. तिचा दूरवरचा पोंगा एखाद्या रोग्याच्या कण्हण्याप्रमाणें ऐकूं येत होता. विटांच्या भट्ट्यांतील दाबून ठेवलेला विस्तव कोठें कोठें दिसूं लागला होता.

भिका आणि तानी झपाझप पावलें टाकून मार्ग तोडूं लागलीं. कोपऱ्यावर वळणार इत-क्यांत समोरून येणाऱ्या मोटारीचे दोन झगझगीत दिवे त्यांच्या डोळ्यांपुढें एकदम लकाकले. निमिषमात्र दोघांनींहि डोळें झांकून घेतले. रस्त्याच्या बाजूला होण्याचें त्यांना भानच राहिलें नाहीं. आणि मोटार तशीच चालू राहिली असती तर–तर जग कांहीं बुडालें नसतें; परंतु भिका आणि तानी मात्र नाहींशीं झालीं असतीं. मोटारीनें प्रथम तीन-चारदां पोंगा वाजवून त्यांना दूर होण्याची इशारत दिली आणि घाईघाईनें ड्रायव्हरनें त्यांना चुकवि-ण्यासाठीं दुसऱ्या बाजूनें गाडी वळवली.

विशेष जखमा कोणालाच झाल्या नाहींत. परंतु झाडाला गाडीनें पुढील बाजूनें स्पर्श करतांच शेठजींनीं जीं किंकाळी फोडली ती त्यांच्या रणछोडदास नांवाचें सार्थक करणारी होती यांत शंका नाहीं. ड्रायव्हरनें चलाखी करून विशेष गंभीर स्वरूपाचा अपघात टाळला हें खरें; परंतु गाडी आतां पहिल्यासारखी पुनः लगेच सुरू होईल हे शक्यच नव्हतें. आणि आतां बंगल्यावर परत जाणार तरी कसें ?

तोंडानें त्या दोघां कारट्यांवर शिव्यांचा भडिमार करीत निरुपायानें शेठजींनीं गाडी बाहेर पाऊल टाकलें. भिका आणि तानी दोघेंहि रस्त्याच्या कडेला उभीं राहून गाडीची गंमत पाहत होतीं. परंतु जेव्हां शेठजींच्या बोलण्याचा अर्थ तानीच्या लक्षांत थोडा थोडा येऊं लागला तेव्हां तिनें भिकाच्या सदऱ्याला धरून त्याला ओढण्यास सुरुवात केली. भिकाहि पळण्याच्याच विचारांत होता; परंतु अजून पळण्यासारखी गंभीर परि-स्थिति आली होती असें त्याच्या मनाला वाटत नव्हतें; म्हणून तो तेथेंच उभा राहिला.

शेटजी गाडींतून उतरून शक्यतोंवर वेगानें त्याच्या अंगावर धावून गेलें; परन्तु इतक्यांत ड्रायव्हरच्या हातांतील टॉर्चचा उजेड नेमका भिकाच्या तोंडावर पडला—आणि—

"डाकूरजी—" म्हणून आनंदातिशयानें ओरडून शेठजी जागच्या जागीं थबकले.

तानीला या प्रकरणाचा कांहींच बोध होत नव्हता म्हणून ती प्रथमपासूनच दूर उभी होती आणि भिकानेंहि आपल्याप्रमाणेंच पळण्याच्या तयारींत असावें असें तिला वाटत होतें; पण भिकानें आपली जागा सोडली नाहीं. कांहीं झालें तरी शेठजी आपल्याला मारीत नाहींत हें त्याला पटलें होतें. आणि समजा, मारले तरी मारून मारून किती मारणार ? या निर्लज्जपणानें तो जागा सोडण्यास तयार नव्हता. आणखी एक कारण होतें. आज दुपारीं ज्या शेठजींच्या बंगल्यावर त्यानें दोन लाडवांकरितां इतका मार खाल्ला होता तेच हे शेठजी हें त्यानें दिव्याच्या प्रकाशांत ओळखले होतें. कारण माराच्या वेळीं 'अरे जाऊं दे,' 'अरे जाऊं दे' असें उद्गार काढीत पुढें आलेली तीच ही व्यक्ति हें त्यानें ओळखलें होतें.

समोरच्या बाजूनें दोन दिव्यांचा प्रकाश दिसूं लागला आणि पाठोपाठ 'बें-बें' असा टाहो फोडणारा भाड्याच्या मोटारीचा कर्णकटु आवाज ऐकूं आला मोटार जवळ आल्यावर मोकळी गाडी पाहतांक्षणींच शेठजींनीं ड्रायव्हरला सांगून गाडी उभी केली—आणि काय होतें आणि काय नाहीं हें उमगण्याच्या आंतच ड्रायव्हरनें भिकाला उचलून त्या गाडींत टाकून दिलें. 'कोरेगांव पार्क रोड' अशी सूचना देऊन शेठजी त्याच्या पाठोपाठ वर चढले. भिकाला कसेंसेंच होऊं लागलें. कोणत्या तरी कारणाकरितां आपल्याला धरून नेत आहेत हें त्याला समजलें; पण कां आणि पुढें आपलें काय होणार या विचारानें त्याला राहवेना. तो खालीं उडी टाकण्याकरिता गाडीच्या मागच्या दाराकडे वळणार इतक्यांत शेठजींनीं त्याचा हात धरून त्याला खालीं बसवलें आणि 'बें-बें' आवाज करीत गाडीनें झटका दिला—

तानीनें 'भिका' म्हणून ओरडत गाडीच्या पाठीमागें धावण्यास सुरुवात केली; पण गाडी केव्हांच दूर निघून गेली ! मोडक्या गाडीच्या ड्रायव्हरनें तिच्याकडे पाहून एकवार हास्य केलें.

"भाऊ का ग तुझा तो ?" धापा टाकणाऱ्या तानीला उद्देशून तो म्हणाला.

"नाय् जी. जातवाला हाय." म्हणून म्हणत तानीनें डोकें खाजवायला सुरुवात केली.

"विसर त्याला आतां. नाहीं तर तोच तुला एकदोन महिन्यांत विसरेल; जा आतां—" तो ड्रायव्हर म्हणाला.

तानीनें भकास मुद्रेनें इतस्ततः पाहिलें. तिला कांहींच समजेना. भिका गेला एवढेंच तिला समजत होतें तिचे डोळे, कां कुणास ठाऊक, पाण्यानें भरून आले आणि तिनें हातांतल्या करवंटीनें जोरजोरांत डोकें खाजवायला सुरुवात केली.

—२—

सकाळचे सात वाजून गेले होते. पण ही कालाची गति फक्त पहाऱ्याच्या घड्याळाला आणि बंगल्याच्या आवारांत फिरकणाऱ्या चिमण्या-कावळ्यांनाच माहीत असावी असें दिसत होतें. कारण पहाऱ्याचें घड्याळ साताचे ठोके देत असतांना त्याच्याकडे एकवार तुच्छतेनें बघण्यापलीकडे आणि पुन्हां दुसऱ्या कुशीला वळून झोपीं जाण्यापलीकडे पहारे-वाल्यानें दुसरी-तिसरी कांहींच जागरूकतेची हालचाल केली नाहीं. एक उघडाबोडका मनुष्य तावातावानें बाहेर आला.

" अरे ए प्रसाद, सात-सात वाजेपर्यंत झोप ताणायला बिलकूल शरम नाहीं आली ? शेठजींची चाकरी करतां का हजामती करतां ? साताचे ठोके कोण देणार, तूं का तुझा नरकां-तला बाप ? कालची थंडाई इतकी ढोसलीस तरी कशाला ? उठो-उठो; अन् ठोके देवो-" आपल्या मराठी हिंदीचें कौतुकास्पद प्रदर्शन करीत ती व्यक्ति उद्गारली. परंतु या आग पाखडण्याचा रामप्रसादवर यत्किंचितहि परिणाम झाल्याचें दिसून आलें नाहीं. त्यानें उलट डोळे किलकिले करून त्या व्यक्तीकडे एकवार मिस्किलपणें हसून पाहिलें आणि शांतपणें आळोखेपिळोखे देण्यास सुरुवात केली.

" तुम तो बहोत गहजब कर रहे हो, इस्नोपंत ! सकाळच्या रामपाऱ्यांत तुम तो बहोत चिल्लाते हो ! तुमी लोक प्रभूचा नाम नहीं घेते, लेकिन् गाली देते. " रामप्रसाद म्हणाला. विष्णुपंत जास्तच खवळले.

" हमी गाली देते अन् तुम्ही काय करते ? सगळे चोर लेकाचे. कुणालाहि काम करा-यला नको. शेवटीं भरडून घ्यायला विष्णुपंत दिवाणजी आहेतच. इकडूनहि थपडा अन् तिकडूनहि थपडा ! ह्या कामापायीं उभ्या वर्षांत घराचं दर्शनसुद्धां नाहीं—"

" फिर भी ग्यारा बच्चे लोक घरमें चिल्लाते हैं ! " रामप्रसादनें हळूच चिमटा काढला.

" होय, होय ! अकराच काय एकशें-अकरासुद्धां होतील ! तो माझा प्रश्न आहे. त्यालासुद्धां दैव लागतं. नाहीं तर तीन तीन शेटाण्या बाळगूनसुद्धां पोरगा होण्याकरितां एकादं रस्त्यावरचं भिकारड्याचं पोर संभाळावं लागतं. "

विष्णुपंत चिडून म्हणाले. संतापातिशयानें डोक्यावरची उरलीसुरली शेंडीची बटसुद्धां थरथरत होती.

" हां ! ये तो हमकु मालुम नहीं होता है के मालिकनें एक गरीब छोकरे को किस लिये पकड लाया है ? " रामप्रसादनें आपल्या मनांतील मळमळ काढून टाकण्याकरितां विचारलें. कारण गरिबाचा मुलगाच संभाळायचा तर आपल्या मुलखांतल्या भावालाहि तीनचार मुलगे आहेत, त्यांची वर्णी कां न लागावी हें त्याला कोडें पडलें होतें.

" मूर्खांचा कारभार आहे झालं. गरिबाचाच मुलगा पाहिजे तर, रामप्रसाद, मी काय गरीब नाहीं ? मला एक सोडून आठ मुलगे अन् तीन मुली आहेत. एकच काय, ऐन जिनशीं अकराच्या अकरा मीं शेठजींच्या बंगल्यांत आणून सोडलीं असतीं. पण खऱ्या गरिबांची ही दुनिया आहे का ? " विष्णुपंतांनीं थरथरणाऱ्या शेंडीला गाठ मारण्याचा निष्फळ प्रयत्न करीत केविलवाण्या सुरांत म्हटलें.

" सच है ! " एवढेंच रामप्रसाद पुटपुटला. एवढें आव्हान विष्णुपंतांना पुरें होतें.

"अरे सच काय अन् खोटं काय ? मतलबाची दुनिया आहे सारी. तीन चार दिवसांपूर्वीं शेठजींचा अठ्ठेचाळिसावा वाढदिवस झाला नाहीं का, त्या दिवशीं कुठलासा एक काठेवाडी ज्योतिषी आला होता, त्याला शेठजींनीं आपली पत्रिका दाखवली; आणि त्याच्या म्हणण्याप्रमाणं एक अगदीं गरीब, अनाथ मुलगा-भीक मागत फिरणारा उत्तमच-चार वर्षें वाढवून अन्नाला लावला कीं पुत्रसंतान हटकून होणार या विश्वासानं शेठजींनीं या पोराला हाताशीं धरलं आहे. काय जुलूम आहे ! कोणी कांहींहि सांगो, शेठजींचा तत्काळ विश्वास बसतो—" विष्णुपंत मालकांच्या कल्याणाच्या विचारानें कळवळून म्हणाले.

" एक बरसके बाद तुमच्या बी लई फायदा झाला, इस्नुपंत. तुमी तो मंतरतंतरवाला मालिकपाशीं पेश केलात, और त्येचा म्हणण्याप्रमाणं तुम्हाला शेठजींनीं घर बांधून दिला. " रामप्रसाद मध्येंच म्हणाला.

" तुम्हां सर्वांच्या डोळ्यांत माझं घर सलतं आहे. तुमचेहि देव्हारे सोन्यानं मढवले गेले आहेत हें आज तुम्ही विसरतां. पण मी म्हणतों, आपण खाऊं या. आपण पिढीजात नोकर आहोंत. आपण खाल्लं तर मालकाला आपले दुवेच मिळतील. पण या गटारांतल्या पोराला हाताशीं धरून काय होणार आहे ? त्याच्यावर देखरेख ठेवायची कामगिरी माझ्यावर आहे. आणि शिवाय आजपासून त्याला शिकवायला एक मास्तरडाहि

पाहून आणण्याचं काम शेठजींनीं माझ्यावर सोपवलं आहे." विष्णुपंतांनीं जणूं काय ' काय त्रास आहे ' ? असें पटविण्याकरतांच शेंडीला हातानें झटका देत म्हटलें.

" फिर, तुमच्या तो भावाचा छोकरा आहे ना ? त्येला का नाहीं बोलवत शिकवायला ?" रामप्रसादानें खवचटपणानें प्रश्न केला.

" तूं वाकडं बोल. तुझ्याच जातीमध्यें तुळशीदासासारखा महान् साधु होऊन गेला हें खरंसुद्धां वाटत नाहीं. बरं जाऊं दे—तूं ठोके दे. तुझं काम कर—"विष्णुपंत शेंडी सावरीत गडबडीनें म्हणाले.

भिकाला या अवचित भाग्याबद्दल काय वाटत होतें ?

आज धुळींत तर उद्यां अंबारींत, असें भाग्य फारच थोड्या जणांच्या वांट्याला येतें. लाडूच्या तुकड्याकरतां ज्या ठिकाणीं मार खावा लागला त्याच ठिकाणीं एका शब्दानें हाराभर लाडू त्याच्यापुढें आणून ओतवले असते. काल गटारागटारानें हिंडणारा भिका आज एका प्रशस्त बंगल्यांत या दालनांतून त्या दालनांत हिंडून जीवाची करमणूक करून घेत होता. ज्या बायकांचें नखसुद्धां त्याला एरव्हीं पाहायला मिळालें नसतें त्या शेठजींच्या बायका अहमहमिकेनें त्याला रिझवूं पाहत होत्या. त्याला पाहिजे तें त्यानें बोलण्याचा अवकाश, कीं सातासमुद्रापलीकडच्या वस्तु त्याच्यापुढें येऊन पडल्या असत्या. भिकाला अत्यंत आनंद वाटला होता असें म्हणण्यापेक्षां आनंदातिशयानें तो घाबरून गेला होता म्हणणें जास्त वस्तुस्थितीला धरून होईल. त्या गाडींतल्या गाडींतच शेठजींनीं त्याला थोडीशी जाणीव करून दिली होती. परंतु आपल्याला यापुढें एकाद्या राजासारखें राहतां येणार आहे, नवीन कोरे कपडे मिळणार आहेत, मधून मधून मोटारींत बसायला मिळणार आहे आणि अन्नाकरतां मार खावा लागणार नसून आपण मागूं तें, आपणांला लागेल तितकें आणि तेंसुद्धां वाटेल तेव्हां मिळणार आहे एवढेंच त्याला कळून चुकलें होतें. शेठजींनीं एवढा उपकार आपल्यावर कां करावा हें त्याला बिलकूल समजलें नाहीं. आणि तसा प्रश्न विचारणें म्हणजे धाडस होय हें तो जाणून होता. पुढें तीन–चार महिन्या नंतर त्याला हा ज्योतिषीबुवाचा प्रकार कळून आला.

रात्रीं बंगल्यावर गेल्यानंतर नोकर-चाकर आपल्याकडे पाहत आहेत हें पाहून तो घाबरला आणि पळून जाण्याकरतां धडपडूं लागला. परंतु शेठजींनीं त्याची भीति थोडक्याच वेळांत निराधार असल्याची खात्री करून दिली तेव्हां जरा त्याला हायसें वाटलें. परंतु

कसलाहि आवाज झाला कीं पोटांत कळ उठल्याप्रमाणें तो ताडकन् उठून उभा राही आणि पळवाट काढूं लागे. काय असेल तें असो, आपलें हें भाग्य खरें आहे हें त्याला बिलकूल पटेना. कांहीं तरी चुकतें आहे, कोणाच्या तरी हातून भयंकर चूक होते आहे हें त्याला राहून राहून वाटत होतें. जेव्हां शेठजींच्या थोरल्या बायकोनें मोठ्या प्रेमानें त्याच्या पाठी-वरून हात फिरविला, तेव्हां वळाच्या वेदना असह्य झाल्या तरी त्यानें त्या दाबून टाकल्या, आणि—" नाय माय, मी तुझं ल्येकरूं हाय " म्हणून केविलवाण्या सुरांत तिचे पाय धरले; सर्वजण हंसू लागले तेव्हां तो जास्तच घाबरला आणि दरवाजाकडे त्यानें धूम ठोकली.

त्याला आवरतां आवरतां पुरेवाट झाली. त्याला अंघोळ घालण्यांत आली, त्याचे जुने कपडे फेकून देण्यांत आले व नवीन कपडे शिवून येईपर्यंत त्याला तात्पुरते दुसरे कपडे पुरविण्यांत आले. धोतर त्याला नेसतां येईना. सदऱ्याच्या गुंड्या त्याला नीट घालतां येईनात. त्याला हें नवीन कांहींच जमेना. दुसऱ्यांनीं त्याला समजाविलें आणि सहजच इकडून तिकडे जातांना एका कपाटाच्या आरशांत त्यानें स्वतःला पाहिलें. दुसरें कोणी तरी आपल्याकडे रोखून पाहात आहे असा त्याला भास झाला. तो घाबरला. कपाळावर घामाचें थारोळें जमा झालें. परंतु नंतर त्याला आपली चूक समजून आली, तेव्हां तो किती मना-पासून हसला ! आणि आपली भीति किती वृथा होती हें स्वतःला अट्टाहासानें पटवून देण्याकरितांच कीं काय, आसपास कोणी नाहीं असें पाहून त्यानें आरशांतल्या भिक्याकडे पाहून जीभ बाहेर काढली. आरशांतल्या भिक्यानेंहि प्रत्युत्तर केलें. भिका स्वतःला विसरला आणि त्यानें नाना तऱ्हेचीं तोंडें करून आरशांतल्या भिकाला चीत करण्याकरितां अनंत मर्कटचेष्टा करण्यास सुरुवात केली. इतक्यांत शेटजींचें प्रतिबिंब आरशांत दिसूं लागलें. भिका घाबरून खालीं मान घालून उभा राहिला. शेठजींनीं आपल्यावर उपकार केला आहे तेव्हां शेठजींचें मन केव्हांही दुखवितां कामा नये ही खूणगाठ त्यानें पक्की करून ठेविली.

तानीला भिका विसरला ? आश्चर्याची गोष्ट ही कीं, होय. तो पाहीले कांहीं दिवस तिला अजीबात विसरला. मनुष्याचें मन मोठें विचित्र आहे यांत शंका नाहीं. एखादा अनपेक्षित अपघात अगर आघात झाला असतां प्रथम आपलें मन अत्यंत निर्विकार असतें आणि नंतर हलके हलके जागृति येते आणि मागाहून कळतें कीं आपल्या अमक्या अवयवांना बराच मार बसलेला आहे. जखमेच्या वेदना मागाहून लक्षांत येतात.

कोणत्याहि प्रकारच्या भावना उचंबळून आल्या, कीं मनुष्याच्या डोक्यांत प्रथम स्वार्थाचा विचार डोकावतो. भीति असेल तर ' माझें कसें होईल ' ही चिंता उभी राहते. लोभ असेल ' तर मला लाख रुपये मिळावे ' ही इच्छा थैमान घालूं लागते. पुत्रप्राप्ति असेल तर बायकोचा वाटा विसरून मनुष्य ' मला मुलगा झाला आहे ' या अव्याप्तिपूर्ण विधानाला चिकटून पाहतो. त्याप्रमाणें भिका तानीला विसरला त्यांत आश्चर्य वाटण्याजोगें कांहीं नाहीं.

—३—

दिवसांमागून दिवस जात होते. भिकाच्या बाह्य स्वरूपांत तर कल्पनातीतच फरक झाला होता. प्रथम प्रथम त्याला फार जड गेलें. तोंड पुसण्याकरतां सदऱ्याच्या बाहीचा उपयोग करण्याचा मोह दाबावयास त्याला कोण कष्ट पडत असत. ' नको ' म्हणावयास, ' होय ' म्हणावयास त्याची जीभ प्रथम प्रथम कोण आडवी पडत असे ! नागरी, व्याकरण-शुद्ध भाषा बोलतांना त्याला किती हसूं येई आणि किती त्रास पडे ! —विजारीच्या गुंड्या लावण्यांत कां उगाच वेळ दवडा हा विचार त्याच्या डोक्यांत किती तरी दिवस घोळत होता; परंतु भिकानें सर्व गोष्टींना मोठ्या धैर्यानें तोंड दिलें आणि विष्णुपंतासारख्या डोळयांत तेल घालून उणेपणा पकडण्यास तयार असणाऱ्या कावेबाज कोल्ह्याला-सुद्धां कावरेबावरें करून सोडलें. जन्मजात गुणावगुणांशीं तो निकरानें सामना लढवीत होता. ज्या समाजांत तो गेलें वर्षभर वागत होता त्या समाजाच्या चालीरीति व त्याच्या मूळच्या चालीरीति यांच्यांत जमीनअस्मानाचें अंतर होतें; पुष्कळ वेळेला तो स्वतःचें हसेंहि करून घेई; परंतु दृढनिश्चयानें दातओठ चावून तो परिस्थितीशीं धडका देत असे.

शेठजींच्याविषयीं त्याच्या मनांत अनन्यसाधारण श्रद्धा उत्पन्न झाली होती. शेठजींच्या एका शब्दाबाहेर तो जात नसे; इतकेंच नव्हे तर पुष्कळ वेळीं त्यांना खूष करण्याकरितां जिवाचें रानहि करून घेण्यास तो मागेंपुढें पाहत नसे. एकदां एका श्रावणी सोमवाराची गोष्ट. शेठजींची माया विशेषतः तिसऱ्या बायकोवर जास्त असे. तिनें सोमवारीं बेलाची परडी सांबाला वाहण्याचा नियम केला होता. एका सोमवारीं भटजीनें नेहमींप्रमाणें बेल आणण्यास आळस केला. शेठजी मुंबईला गिरणीच्या कामानिमित्त गेले असल्यामुळें विष्णु-पंतांना पुढें पुढें करण्याचें कांहींच कारण नव्हतें. रामप्रसाद सकाळींच घोड्याच्या अड्डयावर पसार झाला होता. घरांत गडीमाणसांपैकीं कोणीहि हजर नव्हते. बेल वाहिल्याशिवाय ती माउली अन्न घेण्यास तयार होईना. भटजींना गांवांत जाऊन पुन्हा परत येण्यास सवड

नव्हती. सर्वजण आपापल्या आसनावरून उठण्यास तयारच होईनात. बारा वाजून गेले तरी जेवणाची वर्दी कशी नाहीं या विचारांत भिका सहज खालीं आला. त्याच्या लक्षांत सर्व प्रकार आला. कोणाला एक अक्षरहि न बोलतां सुमारें एका मैलावर त्यानें पूर्वीं पाहिलेल्या एका बेलाच्या झाडाकडे धूम ठोकली. भिका थोड्यावेळानें हातांत भली मोठी बेलाची फांदी धरून परत आला. परंतु एक वर्षाच्या बुजालेल्या सवयीनें त्याची पांढरीशुभ्र विजार झाडावर चढतांना फाटली होती. हाताला ठिकठिकाणीं ओरखाडे पडलेले स्पष्ट दिसत होते. परंतु भिका अभिमानानें हसत होता. शेठजीच्या बायकोनें त्याला त्या दिवशीं प्रेमानें ओढून घेतलें व अश्रूंनीं न्हाऊं घातलें. कां कुणास ठाऊक, भिकाच्याहि छातींत कसेंसेंच होऊं लागलें.

हें शेठजींच्या कानीं यथावकाश गेलें तेव्हां भिकाच्या पाठीवर प्रेमळपणान शेठजींनीं फिरवलेला हात त्याला पृथ्वीमोलाचा वाटला यांत नवल नाहीं.

एक वर्षाचा काल हा असा निघून गेला.

त्या दिवशीं शेठजींची कनिष्ठ पत्नी आणि भिका, विष्णुपंतांसह मोटारींतून गांवांत कांहीं तरी खरेदी करण्याकरितां आले होते. शेठजींच्या पत्नीनें किंमतीचा कांहीं एक विचार न करतां मनाला आवडेल तो माल पसंत करावा आणि विष्णुपंतानें पिढीजात नोकरीच्या गुर्मींत तो माल नापसंत करावा असें नेहमींचें खेळ आजहि चालू होते. शेठजींच्या पत्नीनें एखादी साडी पसंत करावी आणि विष्णुपंतांनीं 'ती फार उठवळ दाखवते' या सबबीखालीं परत करावी. असें होतां होतां संध्याकाळ होण्याची वेळ होत आली तरी अजून एकहि वाण पसंतीस आला नव्हता. दुकानदार गुजराथी होता म्हणून बरें; नाहीं तर एखादा तत्त्वप्रधान महाराष्ट्रीय असता तर त्यानें केव्हांच उपहासाच्या ढुसणीनें त्या बाईला मेल्याहून मेल्यासारखें केलें असतें.

भिका शेजारींच उभा राहून गंमत पाहत होता. त्यानें विष्णुपंतांचीं खोली केव्हांच अजमावली होती. फक्त जरूर पडली तर मध्यें पडावें या विचारानें तो दूर उभा होता.

"तमे विष्णुपंत जवा तवा मोडता घालते. आम्हां बाईमाणसची साडीचोळी तुमाला काय समजेल ? हर एक बाबतींत असा वांधा घालनार असाल तर मला कांहींच नको. परत बंगल्यावर चला—" असें म्हणून त्रासिकपणें पुटपुटत बाईनीं हातांतील साडी खालीं ठेवली. भिकाच्यानें आतां मात्र राहवेना. तो पुढें होऊन म्हणाला,

" माई, हें काय ? कांहीं न घेतांच परतायचं ? " तो विष्णुपंताकडे बारीक नजरेनें पाहत होता.

" अरे मग काय करायचं ? साड्या आम्हांला वापरायच्या अन् पसंती विष्णुपंतांची ! हें कसं जमावं ? त्यापेक्षां फाटकीं वस्त्रं अंगावर काढलीं कीं, वरून आपोआप तंबी मिळेल–" म्हणून म्हणत, बाई खरोखरीच मागें परतल्या. भिकानें चटकन् पुढें येऊन त्यांचा मार्ग रोखून धरला.

" नाहीं, माई–तुमच्या साड्या तुम्हीच पारखून घ्या. विष्णुपंत तोंपर्यंत दुकानाच्या बाहेर जाऊन उभे राहतील. विष्णुपंत, मेहेरबानी करून बाहेर जाऊन उभा राहा ना––" खोट्या विनयानें मान लववून विष्णुपंताकडे पाहत भिका म्हणाला.

" पण शेठजी मला बोलतील––" विष्णुपंत रुमालाआड दडलेल्या शेंडीला हात लावीत म्हणाले.

" शेठजी बोलले तर आम्ही मधें पडूं. त्याची तुम्हांला फिकीर नको. साड्या पाहण्याचं काम बाईमाणसांचं आहे. पैसे मोजण्याचं काम शेठजींचं आहे. तुम्ही कां उगाच जिवाला लावून घेतां ? " भिका अत्यंत शांतपणें म्हणाला. विष्णुपंत मनांतून झालेला भडका दाबीत फुसकारून जातां जातां म्हणाले–"बरं–बरं, चोंबडेपणा बस् कर. पायरी संभाळून बोल–" भिकानें त्यांच्या बोलण्याकडे बिलकुल लक्ष दिलें नाहीं. ' कांहीं झालें नाहीं ' या मुद्रेनें त्यानें बाईंच्या पुढच्या लुगड्यांचा ढिगारा चाळवायला सुरुवात केली. गालांतल्या गालांत हसून बाईहि पण पुन्हा खालीं बसल्या.

सौदा पटायला फार वेळ बिलकुल लागणें शक्य नव्हतें. ड्रायव्हरशेजारीं बसून कांहीं तरी कुजबुज करीत बसलेले विष्णुपंत दुकानाच्या बाहेर आल्यावर भिकाला दिसले. बाई आणि भिका मागच्या बाजूस जाऊन बसले. बाई आधीं आंत शिरल्या व भिका मागाहून आंत शिरला. आंत शिरल्यावर दार लावून घेणार इतक्यांत–" ए माझ्या धर्माच्या बाप्पा, शेठ–सावकार, योक पैसा द्ये रे–" म्हणून केविलवाण्या सुरांत केलेली विनंति त्याच्या कांनावर आली. तो चमकला, स्वर त्याच्या ओळखीचा होता. तानीच असली पाहिजे ती. एक क्षणभरच–पण किती तरी विचार त्याच्या मनांत झरकन् चमकून गेले. खालीं उतरून आपण तानीशीं बोललों तर माई रागावतील का ? विष्णुपंत काय म्हणतील ? तानी आपल्याला

ओळखेल का ? आणि इतके दिवस आपण तिची विचारपूसहि केली नाहीं म्हणून ती रागावणार तर नाहीं ? आणि तिची समजूत घालावयास आतां आपल्याला कसं शक्य आहे ?

खरेंच, आपण तिला इतके दिवस विसरलों तरी कसे, याचेंच त्याला आश्चर्य वाटलें, विचार करावयास वेळ नव्हता. आधींच गाडीची घरघर सुरू झाली होती. आतां आपण खालीं उतरलों तर आधींच दुखवून ठेवलेल्या विष्णुपंतांना राग येईल आणि शेठजींना त्यांनीं सांगितले तर-?

"चल, दूर हो ग, ए हडळे!" म्हणून त्या पोरीच्या अंगावर खेकसून विष्णुपंतांनीं पुढें वाकून भिकाच्या शेजारचा दरवाजा खाडदिशीं लावून घेतला. गाडीनें इशारत देऊन पुढें झेप टाकली.

घाईघाईनें खिशांतली एक अधेली काढून भिकानें तानीच्या पुढें फेकली आणि-" ताने, उद्यां ह्याच टायमाला, हतंच वाट पग-"म्हणून आपल्या अस्सल मायबोलींत घाईघाईनें म्हटलें. तानीनें तें शब्द ऐकतांच आश्चर्यानें व आनंदानें त्याच्याकडे पाहिलें. पुढ्यांत पडलेली अधेली उचलून घेण्याचेंहि तिला भान उरलें नाहीं. मोटारीच्या खिडकींतून आपणाकडे पाहत कांहीं तरीं खुणा करीत असलेला चेहरा मात्र तिच्या दृष्टीस ओझरता पडला. आवाज भिकाचा पण खुणा करणाऱ्या व्यक्तीचा चेहरा मात्र तिचा परिचयाचा नव्हता, म्हणून ती जास्तच घोटाळ्यांत पडली. बऱ्याच वेळानें मोटार दिसेनाशी झाल्यावर तिची खात्री झाली कीं भिकाचाच आवाज आणि तो भिकाचाच चेहरा—! किती वाईट वाटलें पण तिला ? भिका जवळ असतांना आपण त्याला ओळखलें नाहीं आणि मागाहून ओळख पटली, आणि तो कांहीं तरी सांगत होता. काय सांगत होता हें तिला ऐकूं आलें नाहीं. आणि त्याचा कांहीं बोधहि झाला नाहीं. तरी पण उद्यांपासून रोज आपण याच वेळेला या ठिकाणीं येत जावें म्हणजे पुन्हां केव्हां तरी ह्याची भेट होईलच होईल; या विश्वासानें तिचें हृदय भरून आलें. इतका वेळ पुढें पडलेली अधेली तिनें चटकन उचलून घेतली. एकवार या अधेलीनें डोकें खाजवून, दातानें ती चावून तिच्यावर थुंकल्यासारखें करून तिनें ती अधेली फाटक्या पदरांत गाठीवर गाठी मारून आवळून बांधली आणि नंतर लढाई जिंकल्याच्या एखाद्या वीरपुरुषाच्या अवसानानें तिनें रस्त्यांतून चालायला सुरुवात केली.

— ४ —

मनुष्याच्या संकल्पित गोष्टी जर त्याच्या मनाप्रमाणें पार पडूं लागल्या तर जगांतलें बरेचसें कडवट तत्त्वज्ञान चुटकीसरसें नाहींसें होईल. तानी मोठ्या उल्हासानें त्या रात्रीं एका

दुकानाच्या फळीखालीं लवंडली. आज किती तरी दिवसानें तिला तिचा मूर्तिमंत आनंद परत मिळाला होता. काय असेल तें असो भिकाशिवाय त्या गांवांत राहण्याचें तिला जमेना. भिका जवळ असतांना ती त्याच्याशीं भांडे, त्याला चिमकुरे काढी, ओरबाडे, त्याच्या झिंज्या उपटी पण वेळप्रसंगीं त्याच्या जखमेला जीभहि लावीत असे. प्रेमाशिवाय चोड येणें शक्य नसतें. भिकाशीं ती पुष्कळ तंडण करी पण भिका तोंड फुगवून दूर सरकला, कीं पाळीव मांजरीप्रमाणें ती त्याच्याशीं लाडीकपणनें बिलगूं लागे. त्या दिवसापासून भांडणाचें सौख्य आणि एकत्र राहण्याचें सौख्य तिला पारखें झालें होतें. एकदां एक गोष्ट मनानें घेतली कीं, ती कालत्रयींहि सुटणार नाहीं या स्त्री-स्वभावाला ती अपवाद नव्हती. भिकाच्या संगतीचा तिला ध्यास लागला होता. भिका जवळ होता तोंपर्यंत तिला हें इतकें स्पष्ट समजून आलें नव्हतें. पण भिका दूर होतांक्षणींच तिला सबंध माणसांनीं गजबजलेलें शहर अगदीं भयाण वाटूं लागलें. आणि दोनतीन दिवसांनंतर गांवांत वणवण करीत हिंडूनसुद्धां जेव्हां भिकाचें दर्शनहि झालें नाहीं तेव्हां तिला अतिशय वाईट वाटलें आणि त्या उद्वेगासरशीं ती गांव सोडून दूर एका खेड्यांत जाऊन भीक मागण्याचा धंदा करूं लागली. परंतु तेथेंहि तिचें दुर्दैव एका दारुड्या नातलगाच्या रूपानें उमटल्यामुळें ती रातबेरात पुन्हा शहरांत पळून आली. भिकारणीच्याकडे जग नाना तऱ्हेच्या अपेक्षेनें पाहात असते. तिचा दारूडा नातलग तिच्याकडे सर्वच तऱ्हेच्या अपेक्षेनें पाहूं लागला. मौज ही कीं, एरवीं तिनें त्याला बिलकूल प्रतिकार केला नसता, परंतु कांहीं कांहीं बाबतींत भिकाचा आपल्यावर एक विशेष हक्क आहे आणि तो हक्क दुसऱ्यानें उपटूं नये अशा तऱ्हेची तिची मनोरचना होऊन बसली होती. भिकानें तिच्याशीं कितीहि अंगलट केली तरी त्यांत तिला मौजच वाटत असे; पण दुसऱ्यानें तिच्या अंगाला हात लावला, कीं तिला राग येऊं लागला आणि ह्या सर्व भानगडींतून मुक्त होण्याकरितां ती त्या नातलगाशी एक दिवस भांडण करून पळून आली. तिला दुसरा एक विश्वास वाटत होता. भिका ज्या ज्या ठिकाणीं भीक मागण्याकरितां पूर्वी जात असे त्या त्या ठिकाणीं तो केव्हांना केव्हां तरी भेटल्यावांचून राहणार नाहीं ही तिची पक्की खात्री होती. भिका आपल्याला कधींकाळीं विसरेल ही कल्पना तिच्या मनाला शिवली नाहीं.

आणि आज तोच भिका असा अचानक रीतीनें भेटलेला पाहून तिला कोण आनंद वाटला ! 'भिका मायंदळ शिरीमंत झालाया—त्यो आतां आपल्याला लइ जीव लावनार'

या एका कल्पनेनें तिची जगाकडे पाहण्याची दृष्टि साफ बदलून गेली. आतां भिका भेटल्या-वर आपण त्याला काय काय सांगूं, तो आपल्याला काय काय सांगेल इत्यादि गोष्टींचा पुनः पुन्हा विचार करीत असतांना तिचा डोळा लागला.

सकाळीं अजून तांबडेंसुद्धां फुटलें नव्हतें. माणसांची रहदारी अजून फारशी सुरू झाली नव्हती. तिला झोपेंतून जागें केलें तें एका वेडसर दिसणाऱ्या दारुड्याच्या लाथेच्या टोकरीनें. तानीनें घाबरून डोळे उघडून पाहिलें. तिचा नातलग तिच्यापुढें उभा राहून कांहीं तरी रागारागानें वडबडत होता. आणि जर आपण पळून गेलों नाहीं तर तो आपल्या जीवावर उठायलाहि कमी करणार नाहीं या भीतीनें तानी चटकन उठून उभी राहिली, आणि जीव घेऊन पळूं लागली. "कुराडीनं तुजं तुकडं करतों —" हे त्याचे धमकावणीचे शब्द तिच्या कानीं पडतांच तिला पळतां भुई थोडी झाली.

त्या दिवशीं संध्याकाळीं-आदल्या दिवशींच्याच वेळीं-भिका एकटाच मोटारींतून त्या ठिकाणीं आला होता. थोडेसे कागद विकत घेण्याच्या सबबीवर त्यानें बंगल्यातून आपली सुटका करून घेतली होती. तो किती उत्सुकतेनें त्या ठिकाणीं आला होता; पण त्याची निराशा झाली. सुमारें अर्धा तास त्यानें कागद घेण्यांत घालविला. पण तानीचें नखहि त्याला दिसलें नाहीं. एका वेडसर दारुड्याने त्याच्यापाशीं धर्म मागितला. त्यानें त्याला तिनदां झिडकारलें. पण तानीचा पत्ता नाहीं. शेवटीं खिन्न मननें तो मोटारींत जाऊन बसला. ज्या कागदांकरितां तो गांवांत आला होता ते कागद त्यानें धड पाहिलेंसुद्धां नाहींत. ड्रायव्हरच्या प्रश्नार्थक मुद्रेला त्यानं 'डोकें दुखत आहे' ही निरर्थक श्रीमंती थाप ठेवून वेळ मारून नेली मोटार कोपऱ्यावर वळेपर्यंत भिका दोन्ही बाजूला अधाशासारखा बांकवाकून पाहत होता. ज्या तानीला तो आज वर्षभर विसरला होता, त्या तानीची आतां त्याला आठवण विसरणें शक्य नव्हते. कांहीं कारणानें बुजालेल्या आठवणी जेव्हां पुनः ताज्यातवान्या होतात—त्या लवकर नाहींशा होत नाहींत. आणि त्यांत पुन्हा पश्चात्तापाची एक सूक्ष्म छटा त्याला सारखी डिवचीत होती. आजपर्यंतच्या भल्याबुऱ्या आयुष्यांत एखादी हवी असलेली गोष्ट न मिळाली म्हणजे मनाला कोण यातना होतात हें तो आज प्रथम शिकला. एवढी निराशा त्याची केव्हांहि झाली नव्हती.

सुमारें पंधरा दिवसांनंतरची गोष्ट. शेठजींच्याबरोबर गांवांतून भिका परत बंगल्यावर आला होता. संध्याकाळीं पांच साडे-पांचची वेळ असेल. आपल्या खोलींत जाऊन भिका

आरशासमोर उभा राहून कपडे उतरीत होता. वरच्या मजल्यावरच्या खोलींत शेठजींच्या बुटांचा होत असलेला टक्टक् आवाज ऐकूं येत होता. रामप्रसाद आणि विष्णुपंत यांच्यांत नेहमींप्रमाणें होणारा वाद हलक्या आवाजांत चाललेला त्याला मधून मधून ऐकूं येत होता. दूरवरच्या कोठल्या तरी बंगल्यांतून रेडियोचे सूर ऐकूं येत होतें. बंगल्याच्या फाटकाबाहेर एक मरतुकुडें कुत्रें कोणावर तरी जोरजोरानें भुंकत होतें. मध्येंच रामप्रसादचा चढा आवाज त्याच्या कानांवर आला.

" अरे हट, चल, यहांसे निकल जा. कुछ धरम नही जानते"–

भिकाला त्या स्थितींतहि हसूं आलें. मालकाला आपण कसेंहि ओरबाडलें तरी चालेल; पण एखाद्या भिकाऱ्यानें एक पैसा मागितलेला रामप्रसादला सहन होत नसे. या त्याच्या चमत्कारिक स्वार्थी वृत्तीचें त्याला हसूं आलें. देणारा कोण, घेणारा कोण आणि इतरे जनांच्या पोटांत कां मळमळावें हें त्याला समजणें शक्य नव्हतें. सहजच बाहेर कोण असावें हें पाहण्याकरतां त्यानें पायमोजा हातांत काढून घेत खिडकीबाहेर डोकावून पाहिलें. तानीचा चेहरा दृष्टीस पडतांच हातांतला पायमोजा केव्हां गळून पडला हें त्याला समजलें सुद्धां नाहीं. कसला तरी विचार करून त्यानें तानीचें लक्ष आपल्याकडे वेधावें या उद्देशानें विजारीच्या खिशांतली आणेली तिच्या अंगावर जोरानें भिरकावली. आणेली नेमकी तानीच्यापुढें पडली. तिनें समोर पाहिलें. भिका तिला कसल्या तरी खुणा करीत होता. बऱ्याच वेळानें तिच्या लक्षांत आलें, कीं मागच्या बाजूला येण्याविषयीं भिका हातानें खुणावीत होता. समोर पडलेली आणेली उचलून तिच्या साहाय्यानें जोरजोरानें डोकें खाजवीत तिनें भिकानें खुणावलेल्या दिशेकडे धूम ठोकली.

मोटारीच्या तबेल्याच्या मागच्या बाजूस भिका तिला भेटला. इतक्या दिवसांचें उट्टें काढण्यासाठींच कीं काय दोघांनीं प्रथम कोण धिंगामस्ती केली ! उभ्या वर्षांत गांठहि न पडणाऱ्या त्या भाबड्या जीवांनीं एकमेकांना कोण घट्ट कवटाळून धरलें प्रथम काय बोलावें हेंच त्यांना सुचेना. नंतर जी दोघांनीं टकळी सुरू केली ती आवरेना. कित्ती कित्ती गोष्टी त्यांना एकमेकांना सांगावयाच्या होत्या. भिकानें आपली बोली सर्वस्वीं टाकली नव्हती; परंतु मधून मधून तो एखादें वाक्य नागरी पद्धतीनें उच्चारी, आणि त्या वेळीं उरांत सुरी खुपसल्याप्रमाणें तानीला दुःख होई. या भेटींत एकच विचार तानीच्या डोक्यांत नवीनपणानें शिरूं लागला, आणि तो हा कीं, भिका आतां पूर्वीचा राहिला नव्हता. त्याच्यांत अंतर्बाह्य फरक झालेला

होता. आतां पूर्वीचा भिका पूर्ण बदलला होता, पण पुन्हा भिकाचें पूर्वीचें आडदांडपणाचें अवखळ वागणें पाहून तिला धीर येई. आशानिराशेचा झगडा तिच्या चेहऱ्यावर स्पष्ट दिसत होता.

" ताने, कवाधरनं तुझी वाट बगतुया परंतु—" हें त्याचें नेहमीचें वाक्य तो घोळून घोळून ह्मणत होता.

' व्हय, व्हय, माझी वाट पगतुयासा ! तूं राजा झालायासा आन् मी आपली हाय भीक मागनारी हडळसा ! तूं कशापायीं माझी वाट पगनार ! '' तानी त्याला खिजवण्याकरतां म्हणत होती.

"नाय ग नाय ताने, कसा तुला मी विसरंन ? आज पंधरा दीस माझा डोळा बी लागत नाय—" भिका कळवळून ह्मणाला.

इत्यादि प्रकारचीं प्रेमाचीं रुसणीं-फुगणीं झाल्यावर भिकानें तिला इतके दिवस कुठें होतीस आणि बंगल्याचा पत्ता कोणीं सांगितला हा जोडप्रश्न टाकला. तानीनें खरकन् चेहरा टाकला. जन्मदात्या आईजवळ ज्या विश्वासानें लेक आपलीं तुंबलेलीं गाऱ्हाणीं सांगतें त्याप्रमाणें तानीनें आपल्यावरच्या संकटाची पुसटती जाणीव भिकाला करून दिली.

" त्यो हाय बाटलीचा भगत. म्यां पैसं मिळवून आनावं आन् ह्यानं झाडाखालीं बसून शान त्ये आंबट ताक घशांत वतावं असं चाललं व्हतं बग. त्ये बी म्यां मानलं. पर जवाधरनं त्यो मला माराया लागला, आन् माजं पटकूर फाडाया लागला, तवाधरनं मला जिवाचा कटाळा आलाया, बग. आता तर त्यो माझ्यामागं खविसासारखा लागतुया आन् कुराडीनं तुकडं करीन म्हनतुया. तवा कटाळून मी गावाभाईर दीस काढूं लागल्यें. खाया शिळंपाकं बी मिळंना. तुमी बंगल्यांतली शिरमंत मानसं, तुमच्या कपड्यांत आन् मोटारींतच शिरीमंती हायसा. गरीबाला योक पैसा घेताल तर तुमचं बंगलं कसं रं जाग्यावर राहत्याल ? दोन-तीन दिवसामागं तुला मोटारींनं येतांना पायलं, आन् तवापासनं टिटवीवानी घिरट्या घालून राह्यलीया, बग ! " म्हणून म्हणत तानीनें आपलें डोकें पुन्हा एकवार जोरानें त्याच्या छातीवर घुसळलें.

भिका तिला काय धीर देणार ? त्याची श्रीमंती दुसऱ्याच्या लहरीवर अवलंबून होती हें त्याला पक्कें ठाऊक होतें. जर तो शेटजींना सांगून तानीलाहि जवळ करण्याचा प्रयत्न

करता तर त्यालाहि पुन्हा गटाराची वाट धरावी लागली असती हें तो जाणून होता. आणि आतां पुन्हा गटार ? त्याला परत फिरणें शक्य होतें का ? कांहीं तरी बोलून तिला तो समजावणार इतक्यांत विष्णुपंत आणि रामप्रसाद ही दुक्कल तबेल्याकडून पुढें आलेली त्यानें पाहिली. त्याचें धाबें दणाणलें.

" जा-जा, आतां रातची अंधार पडल्यावर ये. खुनेची शीळ दे, मी भाईर येईन " असें घाईघाईनें तो तिला म्हणाला. तानीच्या लक्षांत तो प्रकार केव्हांच येऊन चुकला. माराच्या भीतीनें ती मागल्या पावलींच हरणीप्रमाणें उड्या टाकीत पळून गेली जातांना तिनें उजव्या हाताचीं दोन बोटें तोंडांत घालून खुणेच्या शिटीचा साद काढून पाहिला.

" छान, छान ! रामप्रसाद, देखो, अरे बघो. बंगल्याच्या पुढच्या दारांतून हाकललेली ती हडळ इधर येऊन काय करीत होती, बघो ! " विष्णुपंत शेंडीला प्रेमानें कुरवाळीत म्हणाले.

" अरे इस्नुपंत, क्या गडबड–घोटाला हय राम प्रभु जानें !—" रामप्रसाद मिस्किल-पणें हसून म्हणाला.

" बाबा, शेणांतला किडा शेणांतल्या दोस्तिणीशींच रंग खेळायचा. आतां हें शेठजींच्या कानांवर गेलं तर काय होईल ? " विष्णुपंत काळजीच्या सुरांत म्हणाले.

भिकानें कांहींच उत्तर केलें नाहीं. खरी परिस्थिति त्यानें कितीहि जीव तोडून या लोकांना सांगण्याचा प्रयत्न केला असतां तरी त्याचा कांहीं उपयोग होणार नव्हता हें तो जाणून होता. उलट शब्दानें शब्द वाढावा आणि उंदराला मांजराची साक्ष काढतां यावी ह्याप्रमाणें होऊन शेठजीच्या घरचें आपलें अन्न-पाणीं तुटण्याला आपण होऊनच मदत करावी असला प्रकार घडणार होता. त्यानें आपलें मन आवरून धरलें. कांहीं एक न बोलतां तो जड पावलानें मागें परतला.

रात्रीं जेवणें-खाणें आटोपल्यावर जिकडेतिकडे सामसूम झालें होतें. पहाऱ्याच्या निमित्तानें रामप्रसाद देवडीवर पडून तुलसीदासाचें दोहरें मोठ्या प्रेमानें आळवीत होता. खालच्या बाजूला पथारीवर पडून झोपण्यापूर्वी ' भगवान्–भगवान ' म्हणून म्हणत विष्णुपंत देवाला आर्जवानें आळवीत होते. एवढाच काय तो शांततेचा भंग होत होता. आपल्या वीतभर उंचीच्या गादीवर लोळत पडलेला भिका स्वतःशींच हसत होता. इतक्या नीच अंतःकरणाच्रीं माणसें इतक्या प्रेमानें देवाशीं सलगी करूं तरी कशीं शकतात याचें त्याला हसूं येत होतें.

माणुसकी हा पदार्थ स्वप्नांतहि न जाणणारीं हीं माणसें ऐश्वर्यांत लोळतात आणि जिवाकरितां रात्रं-दिवस वणवण करीत हिंडणारी तानींसारखीं माणसें शिळेंपाकेंसुद्धां खायला मिळत नाहीं म्हणून तक्रार सुद्धां करीत नाहींत. यांत कोठें तरी जुलुमाचा, अन्यायाचा भाग असला पाहिजे एवढेंच भिकाला समजत होतें. त्यानें आपल्या डोक्याला झेपेल त्या तऱ्हेनें विचार करून पाहिला; पण हा अन्यायच असला पाहिजे याखेरीज दुसरें उत्तर त्याला देतां येईना.

मग आपण काय करावें ? तानीला आपली गरज आहे, शेठजींनाहि आपली गरज आहे. कोणाची गरज जास्त आहे ?

सबंध जन्म गटारागटारानें हिंडण्यांत गेलेल्या मुलाला विचार करणें किती जड जात असेल ! त्याला विचार करणेंसुद्धां धड जमेना. एवढेंच त्याला पक्के कळून चुकलें, कीं तानीची पाठसोबत आपण केली नाहीं तर तानीचा जीव धड राहाणार नाहीं. आणि समजा शेठजींना आपण सोडून गेलों तर त्या ज्योतिषींबुवाच्या म्हणण्याप्रमाणें कदाचित् शेठजींना मूलहि होणार नाहीं. नाहीं झालें तर त्यांत काय बिघडणार होतें ? तानीचा बळी देऊन, शेठजींना पुत्राची जोड होऊं द्यावी हें भिकाला पटेना आणि गरिबाचा मुलगा जगांत तोच कांहीं एकटा नव्हता. आपण गेलों तर शेठजींना दुसरा कोणी मिळेल. खरा मुद्दा निराळाच होता ! आणि तो स्वार्थाचा विचार होता. एक वर्षाच्यावर ज्या ऐश्वर्याला भिका सवकला होता तें ऐश्वर्य सोडून जाण्यास भिकाचें मन तयार नव्हतें. जावें तर पुन्हा मूळचें गलिच्छ जीवन ! पुन्हा खोटें बोलणें, मार खाणें, चोऱ्या करणें आणि पुन्हा ती पूर्वीची अन्नाकरितां धडपड ! आणि न जावें तर तानी—? तिचें काय करणार ?

विचारासरशीं त्यानें डोक्याखालची पराची उशी हातांत घेऊन कॉटच्या कठड्यावर आपटण्यास सुरुवात केली. विचारांचीं गर्दी जसजशी वाढूं लागली तसतशी उशी जास्त जोरांत कठड्यावर आपटूं लागली. तानीच्या संबंधींचा शेवटचा विचार मनांत येताक्षणीच उशी जोरांत आपटली गेली. शिवणीचा धरबंद सुटला आणि पराचीं पिसें खोलीभर पसरलीं गेलीं.

काय झालें हें दचकून पाहत असतांना समोर उभे असलेले शेठजी त्याच्या दृष्टीस पडले.

"अरे तमी वेड्यावाणी काय करते ? आतां तमे आपली पूर्वीची संगत धरला नाय पाहिजे. असा करेल तो कसा होएल ? " शेठजी अत्यंत प्रेमळपणानें म्हणाले.

भिका चटकन उठून उभा राहिला आणि त्यानें शेठजींचे पाय अश्रूंनीं भिजवून टाकले. त्याच्या समजुतीखातर त्याच्या पाठीवरून हात फिरवून शेठजी घटकाभरानें निघून गेले. भिका पुन्हा वीतभर उंचीच्या गादीवर तळमळत पडला.

*   *   *   *

मध्यरात्रीचा सुमार होता. खुणेची शीळ भिकानें स्पष्ट ऐकली. तो उठून उभा राहिला अन् ताडकन खिडकीशीं धावत गेला. दूर अंतरावर अंधारांत एक आकृति उभी असलेली त्याला दिसली. त्यानें अंधारांतच आपल्या खोलीकडे एकवार मोठ्या आशाळभूतपणानें डोळा भरून पाहून घेतलें. काय करावें हें त्याला सुचेना. त्याच्या मनाचा ठाम निश्चय होईना. पुन्हा दुसऱ्यांदा शीळ ऐकूं आली. त्याला भीति वाटूं लागली. तानीला फार वेळ शिळा घालूं देणें धोक्याचें होतें. त्यानें झटकन दिवा लावला. आपल्या मोडक्या-तोडक्या अक्षरांत त्यानें एक चिठी खरडली—त्यांत खालीलप्रमाणें त्यानें लिहून ठेवलें होतें—

" दंडवत. मी परत जातो. मला शोधू नये. माझा जीव लागत नाहीं. शेठजींना माझे दंडवत. माईना दंडवत. मी जातो—"

चिठी गादीवर ठेवून त्यानें एकवार खोलींतील सर्व वस्तूंकडे डोळा भरून पाहिलें, आणि घाईघाईनें दिवा मालवला. हलकेच आवाज न करतां तो खोलीच्या बाहेर पडला. समोरची खिडकी वाऱ्यानें हलली. काय पण तो दचकला ! धडधडणाऱ्या छातीवर एका हातानें भार देत तो खालीं उतरला. !

तानीनें त्याला घट्ट धरलें आणि जोरानें एकदम त्याच्या छातीवर आपलें डोकें घासलें.

---

# कारकून सहल काढतात !

फाटकांतून बाहेर पडणाऱ्या मोटारीचा आवाज कानावर पडतांक्षणींच त्या हपिसांतील कारकुनांच्या लेखण्या आपोआप थंड पडल्या. टेबलें पुढें सरकली आणि खुर्च्या भिंतीच्या दिशेनें कलंडल्या, आणि खुर्च्यांवर विराजमान झालेले जीव आतां 'हाशहुश्' करीत किंचित् आडवे झाले. इतका वेळ बाहेर उभा असलेला इस्माईल पट्टेवाला आपली रंगींबेरंगी चंची सोडून कोपऱ्यांतल्या स्टुलावर आरामांत बसला. लेबलें चिकटवणारा हुसेन तर त्याच लेबलांवर पालथा झोंपला. ऑफिसांत आतां स्वराज्य सुरू झालें होतें.

बाबुरावांनीं कानावर अडकावलेला टांक टेबलावर फेंकून दिला व आळस झाडीत शंकररावांच्या टेबलाकडे पाहिलें. शंकरराव आपल्या समोर बसलेल्या वामनरावांकडे कुतुहलपूर्ण नजरेनें पाहाण्यांत दंग होते.

"इस्माईल–" बाबूरावांनीं आपल्या पहाडी आवाजांत आरोळी दिली.

"गेले साहेब ! आलबेल" इस्माईलनें बाहेरूनच ओरडून म्हटलें.

"शंकरराव, या असे इकडे–" बाबूराव आपल्या शेजारच्या खुर्चीवरच्या फायली कोपऱ्यांत भिरकावून देत म्हणाले.

" शहाणे आहांत ! साहेब गेला म्हणून हीं रिटर्नस् कांहीं गेलीं नाहींत " शंकरराव पूर्ववत् फायलींत डोकं खुपसून म्हणाले.

" हें पहा शंकरराव, पुरे तुमची रिटर्नस् आतां. मीहि तुमच्या बरोबरीनें नोकरी करीत आहें. कारकुनानें कामाची सबब घरीं बायकोला सांगायची असते; आपल्या बरोबरीच्या लोकांना नाहीं. " बाबूराव कलंडलेल्या खुर्चीवर तोल संभाळीत म्हणाले.

" आणि अलिकडे बायकांना सुद्धां आपल्या सबबी सांगण्याची सोय उरली नाहीं. " वामनराव टांचणीनें दांत कोरीत म्हणाले.

" त्याला कारण तुमचा आचरटपणा. त्या दिवशीं पत्नीला हपीस दाखवावयाला कशाला आणलंत ? अगदीं "बने, हें बघ माझं टेबल" अशा थाटांत तिला इकडे घेऊन आलांत. आतां तिला तुमच्या सगळ्या भानगडी कळल्या. बावा रे, अजून तूं बच्चा आहेस. माणसानं आपली कर्मभूमि आपल्या पत्नीला कधींहि दाखवूं नये. बायका फार चतुर असतात." शंकरराव फायलीवर कोपर ठेवून उद्गारले.

" हे गेले नवमतवाद करायला. माणसानं तिसऱ्या पत्नीशीं इतका पाघळ दाखवणं म्हणजे आपल्या हातानं आपला मृत्युलेख लिहून देण्यासारखं आहे हें यांना कुठें माहित आहे ? " बाबुराव डोक्यावर टोपी ठेवीत म्हणाले.

" कुठें चाललांत ? कमाल आहे बुवा तुम्हा लोकांपुढें. अरे, तुमच्या दोन दोन बायका झाल्या तरी अजून स्टेशनवर गाडी पाहण्याची खुमखुमी आहेच का ? " शंकरराव स्वतः डोक्याभोवतीं रुमाल गुंडाळीत म्हणाले.

" शंकरराव, केस पांढरे झाले तरी अजून तुम्हाला येवढं साधं तत्व कसं हो कळत नाहीं ? दोन बायका झाल्या म्हणून माणसाची गाडी पहाण्याची हौस कशी कमी होईल ? गाडी पाहण्याची हौस आणि लग्नावर लग्नं करण्याची हौस माणसाच्या वयाबरोबर वाढतच जात असतात. पण मला तत्त्वज्ञान सांगतां आणि आपण तें फडकें कशाला डोक्याला गुंडाळलें आहे ?" बाबूराव हंसून म्हणाले.

' कोणाला तरी पोंहचवायला जात असतील ?' वामनराव शांतपणें भिंतीवरच्या घड्याळाकडे पाहून म्हणाले.

" बोलले ! बाळाच्या तोंडांत नेहमीं पोहचवापोहोंचवायची भाषा. गृहस्था, दोघींना

पोहोंचविलंस, आतां पुरे कीं ही इच्छा !" शंकरराव रुमालांतून बाहेर डोकावणाऱ्या शेडीला आंत दडपून म्हणाले.

"थांबा. उद्यां रमजानईदची सुटी आहे–" वामनराव टांचणी दौतीपाशीं ठेवून म्हणाले. शंकरराव व बाबूराव खालीं बसले.

"आज चार वर्षे आपण कुठें तरी सहलीला जायचा विचार करीत आहोंत एवढ्या मुदतींत आपल्या साहेबानें इंग्लंडला चार फेऱ्या मारल्या आहेत. इस्माईलनें गावांत तीनदां निक्के लावले आहेत. हुसेन सुद्धां एका लहंगेवाल्या पोरीला घेऊन रस्त्यांतून हिंडायला शिकला आहे. माझी द्वितीय पत्नी आणि बाबुरावांची प्रथम पत्नी शेवटीं सहलीला जाण्याच्या बेताला कंटाळून महायात्रेला निघून गेल्याला आज दोन वर्षे होत आलीं असतील. तव्हां मी म्हणतों–" वामनराव मोठ्या आशेनं दोघांकडे आळीपाळीनें पाहूं लागले.

"तें सगळं मान्य आहे. पण दर वर्षाला नियमानें माझे खांदे नवीन जबाबदारी धारण करीत आहेत त्याची काय वाट ?" शंकरराव म्हणाले.

"ही जबाबदारी सध्यां चार आकड्यांपर्यंत आहे तोंवर ही सहल घेऊं या. कारण ही जबाबदारी स्वीकारण्याचा तुमचा छंद लौकर मागें पडेलसें दिसत नाहीं. तुमच्या देहाला चाळीस वर्षे झालीं असलीं तरी तुमचें मन अलीकडे उलट्या क्रमानें वाढत आहे म्हणून मला भीती वाटते कीं आपल्या सहलीची कल्पना आपल्या नातवांना कदाचित् उपयोगी पडायची" वामनराव म्हणाले.

"वामनराव, पत्नीला बरोबर घेऊन सहलीला जायचें ही कल्पना आपल्याला एकदम असभ्य वाटते बुवा. अहो, एरव्ही चोवीस तास कैद पुरवली पण गंमत म्हणून बाहेर जायचें त्यावेळीं सुद्धां ही बेडी हातापायांत म्हणजे कसेंसेंच वाटतें. स्वतःची पत्नी आसपास असली, किंवा नुसती कल्पना जर केली, तर माणसाला जरा मोकळं ढाकळं वागण्याची सुद्धां चोरी होऊन बसते. बायका आणि मुलें हें आपलें खासगी जीवन आहे. ह्यांत कलेचा संपर्क सुद्धां नको बुवा !" बाबूराव म्हणाले.

"बाबूराव, इतका डरतोस का रे बायकोला !" शंकरराव फिदीफिदी हंसून म्हणाले.

"डरण्याचा काय प्रश्न आहे ? परंतु माझा हा एक तत्वाचा प्रश्न आहे. कोणत्याही महत्त्वाच्या कामांत पुरुषानें पत्नीला भागीदार करूं नये हें आमचें सरळ तत्व आहे. स्त्रिया आल्या कीं कामाचा चुथडा झालाच म्हणून समजावें. आनंदीनें राघो भरारीला राजकारणांतून

फरारी केला. या उलट नेपोलीअननें का दुसऱ्याच कोणीतरी आपल्या बायकोला स्वच्छ शब्दांत सांगितलें कीं बाईसाहेब, मी तुमच्याशीं विवाह केला तो कांहीं तुमचा सल्ला ऐकून घेण्याकरितां नाहीं." बाबूराव आवेशानें म्हणाला.

" उपटसुंभासारखे एकटेच जायचें असेल तर मग आपण येणार नाहीं. " वामनराव कडवट तोंड करून म्हणाले.

" येणार नाहीं ? तुम्ही खूप याल पण तुम्हाला येऊं देईल कोण ? तिसरी पत्नी ही मुंगळ्यासारखी असते. एकदां चिकटून बसली कीं दोन तुकडे केले तरी माघार म्हणून माहीत नाहीं " शंकरराव म्हणाले.

" आणि तुमची पहिली तरी काय कमी आहे ? उलट फार दिवस टिकलेली बायको पुढें पुढें आजीप्रमाणें आपल्याला खेळवूं पहाते. " वामनराव उद्वेगानें म्हणाले. एकमेकांच्या उखाळ्या पाखाळ्या थांबल्यावर तिघांच्याही मतानें सहकुटुंब, सहपरिवार दुसरे दिवशीं सुटीच्या निमित्त जवळच असलेल्या खडकवासल्याच्या डाक बंगल्यांत मुक्काम ठोकण्याचें ठरलें.

परंतु पुरुषांच्या कोणत्याही बेताला सुखासुखी अनुमति देणें हें कोणत्या स्त्रीला आजवर पटलेलें आहे ? त्यांतल्या त्यांत शंकररावांच्या पार्वतीबाईनीं तर चार चिरंजीवांचे मुटकुळे त्यांच्या पुढें आणून ठेवले आणि बजावून ठेवलें कीं " जर यापैकीं एकाला थंडीताप आला तर निस्तरावा लागेल तुम्हाला. पावसाच्या निमित्ताची पोरं आहेत हीं. जर कांहीं कमी-जास्त झालं तर पहा आपला विचार. " शंकररावांनी पोरांच्याकडे एकवार पाहून सखेदाश्चर्य प्रकट करीत म्हटलें,—" काय ग तुम्ही बायका ! वीस वीस मुलांच्या आया होऊन सुद्धां प्रकृति कशी गोटीसारखी राहिली पाहिजे. काय आमच्या सारखं हपिसांत जाऊन तुम्हाला रक्त ओकावं लागतं आहे ? चांगली अकरा वाजल्यापासून जी ताणून देतां ती संध्याकाळच्या स्वयंपाकापर्यंत. " पार्वतीबाईंना असलें ऐकून घेण्याची संवय नव्हती. त्या ताडकन उसळून म्हणाल्या " तर–तर ! माझी दुपारची झोंप दिसते. पण रात्रीं नवरात्रांतल्या समयांसारखी तेवत उभी असतें ती. "

" पण ह्यांत माझा काय अपराध–? " शंकरराव आश्चर्यानें म्हणाले. पार्वतीबाईनीं एकवार मानेला हिसका देऊन त्यांच्याकडे तिरव्या नजरेनें हंसत पाहिल्यासारखें केलें. शंकरराव आपल्याच विचारांत गर्क होते. ते म्हणाले, " काय विचित्र तुम्ही बायका असतां ! चांगलं नवीन पद्धतीनें तुम्हाला बरोबर न्यावं म्हणून म्हटलं तर तुम्हाला हौसच

नाहीं. त्या समोरच्या प्रोफेसराची बायको बघ कशी चवळीच्या शेंगेसारखी लवत मुरकत नवऱ्याबरोबर गांवांतील गल्ली बोळांतून हमेशा हिंडत असते. वादविवाद कसे करतात, अन् कपडे कसे बदलतात अन् प्रेमानं एकमेकांच्या खांद्यावर हात काय टाकतात ! अन् आमच्या नशीबीं हा सुताडा होता—!"

" नका त्यांचं सांगूं. पाठीवर शेपटा सोडून हिंडायला मी कांहीं त्यांच्यासारखी नगर-नार नाहीं बरं का ! अन् जिला इतका नवऱ्याचा संशय असेल ती हिंडेल सारा दिवस त्याच्या हातांत हात घालून. माझं कांहीं तिच्यासारखं रजिष्टर झालेलं नाहीं. " पार्वती-बाई म्हणाल्या.

" मग तूं काय येणार कीं नाहीं ? " आणीबाणीच्या सुरांत शंकरराव म्हणाले.

" न यायला काय झालं ! पण मुलांना संभाळलं पाहिजे. "

शंकररावांनीं भीतभीत आश्वासन देतांच पार्वतीबाईनीं मोठ्या कौतुकानें मान डोलावीत उद्याची तयारी करण्यास प्रारंभ केला.

बाबूरावांना मोठी आशा होती कीं नेहमींच्या पद्धतीप्रमाणें आपण 'चल' म्हणतांच पत्नी मोठ्या अवसानानें नकार देईल. परंतु आयुष्य इतकें सरळ नसतें याचा त्यांना त्या दिवशीं चांगलाच अनुभव यायचा होता. बाबूरावांची ही द्वितीय पत्नी होती. प्रथम प्रथम तिनें त्यांच्या म्हणण्याप्रमाणें वागण्यांत धन्यता मानली होती. पण पुढें त्यांच्या विरुद्ध वागण्यांतच तिला समाधान वाटूं लागलें. बाबूरावांनीं इतर पतिराजांप्रमाणें रागावणें, रुसणें किंवा हिंडावयास घराबाहेर जाणें इत्यादि शिक्षेचे प्रकार अंमलांत आणून पाहिलें परंतु पुढें बायकोचें हृदय हे वस्तरा साफ करण्याच्या चामडी पट्ट्यासारखें लवचीक नसतें हा अनुभव येतांक्षणींच त्यांनीं उदासीनता पत्करली. पत्नीनें आपल्या इच्छेस येईल त्या रीतीनें चालावें आणि आपण आपल्या मर्जीप्रमाणें वागावें असा मनाशींच त्यांनीं ठराव करून टाकला होता. परंतु आज हपिसां-तल्या मंडळीच्या आग्रहाखातर त्यांनीं एकवार पत्नीस उडत उडत विचारण्याचें ठरविलें होतें. आलीच बरोबर तर इतक्या माणसांत चारदोन वाक्यांच्या देवघेवीपेक्षां जास्त कांहीं होणार नाहीं. नाहींच आली तर उत्तम !

परंतु आश्चर्याची गोष्ट ही कीं बाबुरावांना प्रत्येक गोष्टींत विरोध करणारी त्यांची पत्नी आज अचानक त्यांच्याशीं सहमत झालीं. " अन् मेलं शहरांत राहून जीव कसा अगदीं उबगल्यासारखा होतो. जरा थोडी हवा मोकळी मिळेल तर शपथ. घराशीं घर लागल्यावर

त्या वाऱ्यानं तरी काय रडावं ? उद्या केव्हां निघायचं ? '' तिनें मोठ्या औत्सुक्यानें म्हटलें. बाबूराव जरा जपून बोलूं लागले. पत्नीचा विरोध एकवेळ समजण्यासारखा असतो. परंतु ही अपूर्व सलगी पाहून त्यांच्या मेंदूच्या ठिकऱ्या उडण्याच्या बेतांत होत्या.

" हो, उद्यां सकाळीं निघूं या. पण मी म्हणतों हें साहस तर नाहींना होणार ?" ते काळजीच्या सुरांत म्हणाले.

" त्यांत कसलं आलं आहे डोंबलाचं साहस ? मोटारींतून जायचं नी यायचं. त्यांतून पुरुष मंडळी बरोबर असल्यावर तर कसलीच काळजी नाहीं." सौभाग्यवती निष्काळ-जीच्या सुरांत म्हणाल्या.

" तें बरोबर आहे. काळजी तुम्हांला कसली आली आहे म्हणा. पण आमचीच थोडी विचार करण्यासारखी स्थिति आहे-" ते म्हणाले. परंतु बाबुरावांच्या स्थितीचा विचार करण्याच्या मनस्थितींत त्यांची पत्नी त्यावेळीं नव्हती. बाबुराव स्वतःशींच चडफडत बाहेरच्या बाजूस बसून राहिले. मनुष्यस्वभावाचा हा एक मासला त्यांना आज नवीनच वाटला.

वामनरावांच्या सौ. नलिनीनें या सहलीची वार्ता ऐकून आनंद तर प्रगट केलाच परंतु त्याच बरोबर थोडेसें चिडूनहि घेतलें. जगांत कांहीं कांहीं माणसें सुखाच्या गादीवर लोळत असतांना सुद्धां कुरकूर करण्यास सोडीत नाहींत. त्याचाच एक नमुना म्हणजे वामनरावांची ही तृतीय पत्नी होय. तिनें आपली तक्रार अगदीं निर्भिडपणें पुढें मांडली—"उगाच आपली मी माणसाची गंमत पहात होतें. लोक म्हणतात तिसरी बायको म्हणजे यजमान अगदीं मुठींत वागत असतील. अगदीं राणीसारखी मी एखाद्या महालांत वावरत असेन अशी लोकांची कल्पना, आणि प्रत्यक्ष पहावं तं मेलं घटकाभर जरा चांगलं चुंगलं नेसून एकाद्या सिनेमाला जावं म्हटलं तर तुमची हौस असेल तर नं ! कांहीं नाहीं. आईबापांनीं मुलींना विहिरींत ढकलावं पण तिसऱ्यापणीं चुकूनसुद्धां देऊं नये म्हणून म्हणतात तेंच खरं—"

" ए, तुझं झालं का ? आतां मी काय सांगतों ते ऐकतेस का ? '' वामनराव जीव मुठींत घेऊन म्हणाले.

" जन्मभर तेंच करायला तुमच्या घरांत धडपडलें आहें. नवीन नवीन खूप घेऊन हिंडलात. आतां तुमची हौस कुठें गेली ? का पहिल्या दोघीना हिंडवून हिंडवून दमलांत ? '' सौ. नलिनीबाई हातवारे करीत म्हणाल्या.

" ए तूं असलं पहारीनं भोसकल्यासारखं नको बुवा बोलूंस. झालं तें गेलं. आतां काय त्याचं—! " वामनराव आपल्याशींच अर्धवट पुटपुटले.

बाबूराव इतके हिशेबी गृहस्थ पण एक चूक त्यांनीं केलीच. डाक बंगला आपल्याकरतां राखून ठेवण्याची परवानगी मागण्यास जाण्याचें अजिबात राहून गेलें. मुलें माणसें घेऊन गेलेली मोटर फाटकापाशीं उभी राहतांच त्यांना एकदम आठवण झाली. परंतु आतां उपयोग नव्हता. मोटारींतील बोजा अर्थात पुरुषवर्गानें कपाळावर सांचलेला घाम पुशीत बंगल्याच्या बागेंत कसाबसा नेऊन ठेवला आणि माळ्यानें त्यांना बंगल्यांत कोणीतरी आधींच येऊन उतरल्याचें नम्रपणानें कळविलें.

शंकररावांनीं आपल्या डोकीचा रुमाल काखेंत दाबून धरला, खिशांतून एक फर्मास लालधागेवाली विडी बाहेर काढली व शांतपणें ते ती पेटवायला काड्याची पेटी हुडकूं लागले. बाबुरावांकडे न पाहूनच त्यांना खिजवण्याचा शंकररावांचा बेत होता कीं काय न कळे. वामनरावांनीं एकदां बगळ्यासारखें माळ्याचें आपादमस्तक निरीक्षण केलें व कोटाच्या कॉलरला आंतल्या बाजूनें खोंवलेल्या टांचण्यापैकीं एक उपसून तिनें दांत उकरायला सुरवात केली. या पेक्षां जास्त ते तरी काय करूं शकणार ?

बाबूरावांना इतका वेळ पत्नीची काळजी होती; तींत आणखी जागेची भर पडली. सुन्न डोक्यानें त्यांनीं बंगल्याच्या आवारांत नजर टाकली. नुकतेंच पाणी दिल्यानें लहान मोठीं रोपटीं तरारल्या सारखीं होऊन वाऱ्याच्या झुळकी सरशी आनंदानें डोलत होतीं. उंच उंच वृक्ष स्थितप्रज्ञाप्रमाणें आकाशाकडे डोळे लावून उभे होते. उन्हाचा चटका भासूं लागला होता. मधूनच एकादी वाऱ्याची उबदार लहर अंगाला स्पर्श करून जाई:—आणि मुलां-माणसांसह आतां कुठें वस्ती करायची—?

बंगल्याच्या दिशेनें—' चल रानांत जाऊं या दूर—ऽऽ ' ह्या पद्यखंडाची ललकारी बाहेरच्या मंडळीच्या कानावर पडली. पद्याचे सूर वातावरणांत विलीन होत आहेत तोंच हशा, टाळ्या आणि ओरडा यांचा संमिश्र ध्वनी सगळ्यांना ऐकूं आला.

" कॉलेजांत शिकणारे साहेब आहेत—" माळ्यानें हळूच सुचविलें.

" मग निकालच लागला म्हणावयचा. कॉलेजांतल्या पोरांचा शेजार म्हणजे अंगणांत वारूळ ठेवल्यासारखेंच असतें. " वामनराव कुरकुरत म्हणाले.—

" त्यापेक्षां आपण मद्रासच्या दिशेनें सरकलों असतों तरी चाललें असतें " विडीचा एक दमदार झुरका ओढीत शंकरराव म्हणाले.

बाबूराव अपराधी होते. त्यांना बोलायचं होतं खूप पण बोलणें शक्य नव्हतें. हा वेळपर्यंत लटांबर आणि तीन सौभाग्यवती हळूहळू जवळ येत चालल्या होत्या. कांहींतरी निश्चित ठरवणें आणि तेंसुद्धां एकदम ठरवणें भाग होतें. बाबुराव झोपेंतून जागे झाल्याप्रमाणें सर्व मंडळीकडे पाहून म्हणाले—"मला वाटतं आणि सर्वांनाही तेंच वाटेल अशी माझी खात्री आहे कीं सहलीला म्हणून यायचं तें बंगल्यात उतरण्यापेक्षां एकाद्या विस्तीर्ण अशा वडाच्या झाडाखालीं उतरलेलें चांगलें. त्यांतून वड आपल्या पुराणांत ख्यातनाम म्हणून गाजलेला वृक्ष आहे. पौराणिक कल्पना जरी बाजूस ठेवली आणि आधुनिक पद्धतीनें विचार केला तरी सर्वांच्या ध्यानांत येईल कीं, निसर्गाचें सानिध्य ही एक बहुमोल देणगी आहे—"

भगिनीवर्ग आणि बच्चेलोक ' आ ' करून बाबुरावांच्या या व्याख्यानाकडे पहात होते.

" म्हणजे—!" त्यांची पत्नी थोडीशी साशंक होऊन म्हणाली.

" म्हणजे, बाबूराव गाढव आहेत आणि आम्हालाही गाढव बनवण्याचा त्यांचा विचार आहे. वहिनी—,तुमचे पतिराज स्मरणाचे फार धड आहेत. काल त्यांनी इंजिनिअरच्या ऑफिसांत जाऊन परवानगी काढण्याचें कबूल केलें. आणि विसरले. हा त्यांच्या व्याख्यानाचा थोडक्यांत गोषवारा आहे-" शंकरराव काखेंतला रुमाल झटकून स्पष्टपणें उद्गारले.

" पण मग आपल्याला थोडीशीसुद्धां जागा मिळणार नाहीं ? " सौ. नलीनीबाई वामनरावांकडे पाहून म्हणाल्या.

" आतां जरा गप्प बसायला काय घेशील ? मनुष्य एक आपल्या काळजींत असतं आणि तुझं कांहीं तिसरंच " वामनराव चवताळून म्हणाले—.

" बरं-बरं समजलं. इतकं ओरडून सांगायला मी कांहीं बहिरी नाहीं. अशी शोभा करायची होती माझी म्हणून मला आणलीत होय ? पुन्हां कुठें तुमच्याबरोबर येईन तर तुळजापुरच्या अंबाबाईची शपथ. " सौ. नलिनी फणकारून म्हणाली. ही देववाणी की शापवाणी याचा निर्णय न लागल्याकारणानें वामनराव कांहींच बोलले नाहींत.

याच सुमारास सजण्याच्या बरोबर रानांत दूर जाण्याची इच्छा करणारे एक पायजम्यांतले कॉलेज वीर व्हरांड्यांत येऊन उभे राहिले. बिनतारी संदेश आंतल्या बाजूस गेले आणि थोड्याच वेळांत तीन कॉलेज कुमार बंगल्याच्या पडवींत आणि बाहेर बागेंत तीन कारकून आणि त्यांचा पसारा असा देखावा दिसूं लागला.

एकानें दुसऱ्याच्या पाठींत बोट रोवून हलकेंच म्हटलें,–" अनील, विस्तवावर चुकून पाय पडला तरी पोळल्यावाचून राहात नाहीं हा आपल्या वाडवडिलांचा उपदेश ध्यानांत असूं दे.—"

अनीलनें पुस्तकाआड तोंड नेऊन हलकेंच उत्तर केलें " पण इथें विस्तव विझलेला दिसतो आहे. इतकीं मुलं झाल्यावर कितीही उंची पातळं लेपाटून घेतलीं तरी काय होणार आहे? पण कायरे सुहास, आपल्याकडे हे लोक असे कां पहात आहेत?"

" आपल्यावर मोहनी अस्त्र सोडून गारद करण्याचा विचार करीत असावेत बहुतेक. ती लहानखुरी बाई पाहिलीस का—बघ कशी स्मशानांतल्या भटजीसारखं हंसून पहात आहे—" तिसरा कुमार पुटपुटला.

" विजय, सांभाळ रे—" सुहास त्याच्या पाठीवर थाप मारून म्हणाला.

बागेंत उभी राहिलेली मंडळी अनिश्चितपणें किती वेळ तशीच उभी राहणार याला सुमार नव्हतेसें दिसलें. परंतु बाबुरावांच्या पत्नीनें पुढें होऊन मोठ्या धीटपणें आपली सर्वांची सोय लावून घेतली. ती त्या मुलांशीं बोलत असतांना बाबुरावाची मोठी चमत्कारिक परिस्थिति झाली होती. इतक्या गोडाव्यानें पत्नीला दुसऱ्याशीं बोलतां येते हा शोध त्यांना नवीन होता. मत्सराच्या बारीक लहरीनें त्यांच्या हृदयांत सुईसारखें टोंचलें. आपल्याशी बोलतांना हा स्वर पत्नीनें कां वापरूं नये? आणि त्या नेभळ्या पोरांशीं असें पायाचा इंद्रधनुष्य करून बोलायचें म्हणजे काय! खरोखरीच तो कोण शेक्सपिअर का कोण बायकांच्या विषयीं म्हणाला तें खरें असेल काय हा विचार बाबुरावांना अस्वस्थ करून सोडीत होता.

कांहीं का असेना त्यांच्या पत्नीनें पांच मिनिटांत बंगला आपल्या ताब्यांत घेतला. कॉलेजांतील त्रयमूर्तींनीं त्यांच्यांतच जेवणाचें कबूल केलें आणि त्याबद्दल बंगाल्यांतील एक खोली सोडून बाकीची जागा देण्यास ते उदार मनानें तयार झाले.—

जागेचा प्रश्न समाधानकारक रीतीनें सुटल्याचा निश्वास पुरुषवर्ग सोडीत होता खरा; परंतु लगेच त्यांना आपण हा गाढवपणा केला नसता तर बरें झालें असतें असें राहून राहून वाटण्यासारखे एकामागून एक प्रसंग घडून येऊं लागले. विजयनें आपल्या प्रशस्त विजारीची काडी एका हातानें सावरीत जेव्हां बंगल्याच्या पुढील बागेंतील माळ्याची नजर चुकवून तोडलेलीं फुलें सौ. नलिनी पुढें आणून हंसतमुखानें ठेवलीं तेव्हां वामनरावांचा जमदग्नी खवळून उठला.–

आणि जेव्हां सौ. नलीनीनें ती फुलें हंसतमुखानें उचलून घेतली तेव्हां तर त्या जमदग्नीनें संतापाच्या भरांत स्वतःच्याच तोंडांत लगावून घेतली. बाबूरावांनीं आश्चर्यानें वामनरावांच्या नरड्याकडे टक लावून पाहिलें. पण त्यांनाही, वामनरावांच्या प्रमाणेंच आश्चर्याचा आणि उद्वेगाचा झटका लवकरच बसला. अनीलनें फुलचेंडूच्या बॅटी काढतांक्षणीच जेव्हां कडेवरच्या चिरंजिवांना पतिराजांपाशीं घाईघाईनें देऊन बाबुरावांच्या पत्नी मागच्या अंगणांत उतरल्या तेव्हां बाबुरावांचा स्त्रीवर्गावरचा विश्वास साफ उडाला. 'न स्त्री स्वातंत्र्यमर्हति' म्हणून निकाल देणाऱ्या मुनीराजाविषयीं त्यांना अचानक आदर वाटूं लागला. शंकरराव हा वेळपर्यंत चाल-लेला मूर्खपणा पहात आणि विड्या फुंकीत एका खुर्चीवर पडून होते. त्यांना आपल्या पत्नीची पूर्ण खात्री असल्यामुळेंच ते थोडेसे बेफिकीर होते—चार चिरंजिवाना विसरून अनंतकालाची माता क्षणापुरती सुद्धां दुसऱ्या पुरुषाकडे पाहण्याइतकी उत्सुक असणार नाहीं या कल्पनेनें ते बिनघोर होते. परंतु स्टोव्ह पेटवण्याकरितां म्हणून सौ. पार्वतीबाईनीं सुहासला विनंती करून बोलावलें तेव्हां शंकरराव थक्कच झाले. गाडी पहाण्याची हौस पुरुषांना असते हें ठीक आहे पण बायकांनीही असला फाजीलपणा करायचा म्हणजे काय जुलूम आहे या विचारानं तें संतापून पत्नीकडे पाहूं लागले. परंतु अंगाखांद्यावर मुलांची ओझीं असल्यामुळें कोणाही पतिराजाला जागा सोडणें शक्य नव्हतें.

सुहासनें स्टोव्ह पेटवून दिला. पार्वतीबाई त्याच्याशीं चहा होईपर्यंत बोलत होत्या शंकरराव बाहेर तळपणाऱ्या सूर्याकडे संतापून पहात होते. मागच्या अंगणांत बाबुरावांची पत्नी चक्क उड्या मारीत अनीलबरोबर खेळत होती. आणि मध्येंच आपण फूल कसें लगावलें याची माहिती विस्तारानें बाबूरावांना करून देत होती. बाबुराव वरकरणी हंसत ' चालूं द्या ' म्हणून गुरकावतच होते.

विजयनें दिलेली फुलें कसल्या जातीचीं आहेत,—त्यांना काय म्हणतात, हीं फुलं माळी कां घेऊं देत नाहीं इत्यादि महत्त्वाच्या घटनांचा ऊहापोह त्याच्याशीं करण्यांत सौ. नलिनीबाई गुंग होत्या. वामनराव स्वतःशींच पुटपुटत अस्वस्थ मनानें निसर्गाची शोभा पहाण्याकरतां बागेंत शतपावली करीत होते.

सुहासनें पार्वतीबाईच्या विनंतीवरून हंसत मुखानें कपबशा विसळून दिल्या. बाबूरावाच्या पत्नीनें अनीलकडून नळाचें पाणी भरून घेतलें. आणि सौ. नलिनीबाईनीं स्वयंपाकाकरतां वाळलेल्या काटक्या गोळा करण्यास विजयला पिटाळला.

दुपारीं जेवणें झाल्यावर स्त्रीवर्ग सतरंजीवर बसून पत्ते कुटण्यांत गर्क झाला. अनील आदि करून स्त्रीदाक्षिण्याच्या भ्रामक कल्पनेनें इतका वेळ भारलेले कॉलेजवीर बंगल्यापासून दूर असलेल्या एका पडक्या झाडाखालीं बसून विचारविनिमय करीत होते. दुसऱ्या अंगाला एका झोपडीच्या आश्रयाला सावलीखालीं कारकुनांच्या कारवाया सुरू झाल्या होत्या.

''असा चोपला पाहिजे त्या चोंबड्याला! स्टोव्हला पिन करायला मागतो आहे'' शंकरराव राणा भीमदेवाच्या अवसानानें गरजले.

"लव्ह गेमच्या भाषा माझ्या देखत! अरे अगदीं बेवारशी माल उचलल्यासारखं करतां! unclaimed पार्सलसुद्धां स्टेशनावर इतक्या आधाशीपणानं कुणी उचलणार नाहीं—''बाबूराव लाथेसरशीं त्या झोपडीला नवी खिडकी पाडीत म्हणाले.

"मी म्हणतों इतरांनीं वाटेल त्या खुणा केल्या पण या गधडीला अक्कल नसावी का! पत्नीधर्म म्हणजे महाराजा, काय फुकटचा लागला आहे. महानंदेसारखी कलंकित स्त्रीसुद्धां स्वतःला जाळून ध्यायला तयार होते त्याच देशांत आमच्या पत्नीसारख्या अवदसा दिवसाढवळ्या फुलांचा इतिहास दुसऱ्या पुरुषांना नवऱ्यादेखत विचारतात. देशाला आग लागली आहे, देश पेटला आहे, देश बुद्धिभ्रष्ट झाला आहे. मला तोंडसुद्धां दाखवण्याची लाज वाटते आहे–'' वामनरावांचा रागाचा पारा खूपच चढलेला होता.

तिघेजण सूडाच्या भावनेनें एकमेकांकडे पहात उभे होते.

त्याचवेळीं अनील म्हणत होता–" ए विजय तुझ्या या पांचट स्त्रीदाक्षिण्यानें आपला जीव अगदीं नकोसा झाला आहे बुवा. नळाचं पाणी भरून आपले दंड तुटून पडण्याची वेळ आली. एका खरबुजाकरतां इतका गोंडा घोळणं आपल्याला साफ पसंत नाहीं. आजवरच्या कविराजांनीं वर्णन केलेल्या मखमली हाताऐवजीं लोखंडाच्या झाऱ्यासारखे हात पाहून आपल्याला तर शिसारी आली.''

"आणि ते एक एक बृहस्पती पाहिलेस का कसे मल्लिकार्जुनासारखे आपल्याकडे संतापून पहात होते! मला तो नलिनीचा नवरा पाहून तिच्याविषयीं कींव आली पण" विजय हलकेच गंभीरपणानें म्हणाला.

" नका, नका विजयराज, पुढचा भाग नका आम्हाला ऐकवूं. स्त्री वर्गाविषयीं कळवळा बाळगण्याचे दिवस हल्लीं उरलेले नाहींत. कोणत्याही स्त्रीची कींव करण्याचे दिवस मागच्या पिढीच्या सुदैवांत होते. आतां आपण कींव करायला जाऊं तर आपली कींव करायला

मेलेलं कुत्रंसुद्धां पुढं यायचं नाहीं. म्हणून म्हणतों, मित्रहो आपण येथून गुपचुप पलायन करूं या—" अनील सावधगिरीनें म्हणाला.

" हो. पण आपले कपडे—? " सुहासने शंका प्रदर्शित केली.

त्याच वेळीं बंगल्यांत सतरंजीवर बसलेल्या तिघीजणी पत्ते खेळण्याचें ढोंग करीत होत्या. त्यांचीं गृहरत्नें त्यांना पत्ते खेळूं देत नव्हतीं. पार्वतीबाई सुपारीचा वोकाणा चघळीत म्हणाल्या—

" कायहो नलीनीबाई, यजमान तुमच्यावर खूप घुस्सा झाले आहेत वाटतं—! अगदीं तावातावानें मगाशीं तुमच्याशीं बोलत होते." नलीनीनें आपल्या गांठलेल्या मंगलसूत्राचें टोंक बाहेर काढून हंसल्यासारखें केलें.

" आणि कुणाचे यजमान रागवले नाहींत ? आमचेसुद्धां सारखा घसा साफ करीत होते. आणि शंकररावांनीं तर शंभर एक विड्या जाळून टाकल्या असतील सकाळपासून. खुश्शाल रागवा म्हणावं—" बाबूरावांची पत्नी मानेला हिसडा देऊन म्हणाली.

" बाकी त्या पोरांचा फारच आपण उपयोग करून घेतला हं. मी म्हणतें आमच्या घरच्यांना एवढं रागावण्यासारखं त्यांत काय होतं ? अठरा अठरा वर्षांचीं ही पोरं–यांना का आम्हीं लाजणार आहोंत ? पण बाई पुरुषांची पहावी तों ही तऱ्हा––! " पार्वतीबाई म्हणाल्या.

" कांहीं भ्यायचं कारण नाहीं. पुरुष म्हणवतात आणि सकाळपासून इकडची काडी तिकडे कांहीं करवली नाहीं. त्या बिचाऱ्या मुलांनीं सगळी जमवाजमव करून दिली म्हणून आत्तां टेकायला तरी मिळालं. अगदीं स्वयंपाक करायलाच आम्हांला घेऊन आले असावेत हे,—कांहीं नाहीं पुन्हां आपण म्हणून यांच्याबरोबर असं बाहेर यायचं नाहीं." नलीनीबाई निश्चयाच्या सुरांत म्हणाल्या.

वामनराव तिकडे याच वेळीं हेंच वाक्य स्वतःशींच पुटपुटत होते आणि अनीलसुद्धां हेंच वाक्य आपल्या दोस्तांना ऐकवीत होता. आणि ही सगळी मंडळी चार घटका मौज म्हणून सहलीला आलेली होती !

" डोक्यांत धोंडा घालावा त्या कार्ट्यांच्या असं वाटतं— " वामनराव एक लहानसा खडा झेलीत म्हणाले.

" त्यापेक्षां असे करूं या. त्यांना आपण दम देऊन पिटाळून लावूं या. मग आपण आहोंत आणि आपली मंडळी आहेत–" बाबूराव विचार करीत म्हणाला.

" आपली मंडळी ? हुंः ! " शंकरराव तिरस्कारानें पुटपुटले. परंतु हा बेत मात्र अंमलांत आणण्याचें ठरलें. बाबूराव त्यांतले त्यांत विचारी होता. त्यानें आपला रास्त संताप थोडा वेळ दाबून धरावा व त्या मुलांना पिटाळून लावावे ही कल्पना सर्वांस पसंत पडली. त्याप्रमाणें बाबूराव ओंठ आवळून, मुठी घट्ट धरून निघाला.

—आणि अनील याच वेळीं आपले कपडे आपल्याला मुकाटयानें देण्याची विनंती करण्याकरतां त्याच्याकडेच येण्यास निघाला होता. दोघांची वाटेतच गांठ पडली !

" झाला कां तुमचा रोमान्स ! कॉलेजांत पाणी भरायला शिकवतात वाटतं ! " बाबूराव शक्यतोंवर शांतपणें म्हणाला.

" मेहेरबान, कां उगाच जखमेवर मीठ चोळतां ! कॉलेजांत आम्ही काय शिकतों हें आमचं आम्हाला सुद्धां कळत नाहीं. तिथें तुम्हाला आम्ही काय सांगणार कपाळ ! झाली एवढी शिलेदारी बस्स् झाली. मुकाट्यानें आमच्या भगिनींना नकळत आमच्या बॅगा आमच्या हातांत फेका, आम्ही तडक पुणें गांठतो. " अनील हंसत म्हणाला.

" दुसऱ्याच्या दुधांत मीठ कालवणारे दुष्ट आहांत तुम्ही—" बाबूराव थोडासा शांत होऊन म्हणाला.

" तुमचं दूध तुम्हाला लखलाभ होवो. आमचं मीठ आम्ही परत घेतों. तुम्ही आपली घमेलं भर साखर ओता त्या दुधांत. आमची कांहीं ना नाहीं. आणि विनंती करतों आपल्याला कीं सहलीला पुन्हां जाल ते एकटेच जात जा–" अनील म्हणाला.

बाबूरावानी जास्त ताणण्यांत अर्थ नाहीं असें पाहून त्यांच्या कपड्यांची व्यवस्था करण्याचें आश्वासन दिलें.—

चार वाजतां चहा झाला. परंतु तिघा मुलांचा पत्ता नव्हता. एक एक गृहिणी जशी कौतुकानें आपसा आपसांत पृच्छा करूं लागलीं तशी वामनराव मिस्किलपणानें शंकररावांकडे पाहूं लागले व बाबूराव ज्ञानप्रकाशांत डोकें खुपसून वांचू लागले. शेवटीं पत्नीनें त्यांनाच विचारतांच ते ज्ञानप्रकाश ताडकन फेकून देत उठले आणि म्हणाले.—" कोण पाहिजे आहे तुला ग ? तो कॉलेजांतला पठ्ठ्या केव्हांच पुण्याला जाऊन ओंकारेश्वरीं पोहोंचला आहे. तुला त्याचं सुतक धरण्याचं कांहीं कारण नाहीं समजलीस—"

" समजलें आणि तुमची अक्कलही समजलें. कांहीं वाटत नाहीं कांहो असली भाषा आपल्या धर्मपत्नीला ऐकवायला ? पुन्हां बोललांत तर खबरदार-! आणि सांगून ठेवतें मला पुन्हां बाहेर पडण्याचा असा आग्रह करूं नका-" त्यांची पत्नी ठसक्यांत उत्तरली.

" हं-मग तेवढ्या कपबशा तुम्हीच विसळून द्या-" पार्वतीबाई शंकररावांकडे पाहून म्हणाली.

नळावर कपबशा विसळतांना पुरुषवर्गानें एकमतानें ठरवलें कीं यापुढें जीव द्यायला निघालों तरीं पुन्हां पत्नी म्हणून बरोबर न्यावयाची नाहीं. काय सहल आहे कीं चेष्टा आहे!

व्हरांड्यांत उभ्या राहून तिघीजणी त्यांच्याकडे पाहून आपल्याशींच हंसत होत्या-!

---

# धुतलेला सदरा !

प्रत्यक्ष दुर्गुणांपेक्षां सद्‌गुणांच्या अतिरेकामुळें कांहीं थोड्या थोडक्या आयुष्यांची, वाताहात झालेली नाहीं ! आत्मारामपंत गोसेवकानें गोठ्यांत बांधलेल्या गाईची नित्याची पूजा न केल्याच्या महाभयंकर गुन्ह्याकरतां स्वयंपाकगृहांत चुलवैलाशीं बांधून ठेवलेल्या पत्नीला, बाहेरच्या गाईच्या मागच्या व पुढच्या बेचाळीस पिढ्यांनीं कधींही ऐकले नसतील असल्या शब्दांनीं गौरविण्यास मागेंपुढें पाहिलें नाहीं.

ह्याच आत्मारामपंतांनीं राजाला एके दिवशीं बेदम पिटलें होतें. राजाकडे दाणावैरण, तीन तासांनीं पाणी दाखवणें, शिंगांचीं बुडें खाजवणें, गोमातेला आवडते म्हणून तिच्या पोवळ्याला मधून मधून गुदगुल्या करणें इत्यादि किरकोळ कामें सोपवलीं गेलीं होतीं. एके दिवशीं दाण्यामध्यें सरकीचा मागमूससुद्धां न दिसल्या कारणानें ‘ घरांतलीं माणसें मस्तवाल झालीं कीं काय’ अशी आत्मारामपंतांना साधार भीति वाटूं लागली. आणि अशा तऱ्हेनें जर आपल्या ‘ आईचें ’ ऋण फिटणार असेल तर जळो हें जिणें आणि आग लागो त्या संसाराला अशा प्रकारचा वैताग त्यांच्या डोक्यांत थैमान घालूं लागला. इतक्यांत गोमातेचें शिंग खाजविणारा राजा दिसला. हाच तो हरामखोर आपल्या उपास्यदेवतेची अशी विटंबना करीत असला पाहिजे असें त्यांच्या मनानें घेतलें. इतक्यांत

गोमातेनें आपली मुंडी प्रेमानें म्हणा अगर कशामुळेंही म्हणा पण थोडीशी घुसळली. राजाच्या दंडाला खरचटल्यासारखें झालें, म्हणून त्यानें किंचित् रागानें तिच्या जबड्यावर एक चापट ठेवून दिली. वास्तविक या क्रोधप्रदर्शनाच्या पद्धतीमुळें त्याचाच हात चांगला झिणझिणला होता. परंतु आत्मारामपंतांची तिडीक डोक्यापर्यंत जाऊन पोहोंचली.

'माजोऱ्या, मस्तवाल कारट्या, अरे आईवर हात टाकतोस ? कुठं हीं पापं फेडशील ? घरोघरीं गाई पाळा, हेंचि आवडे गोपाळा—म्हणून प्रभु कृष्णजींनीं मोठ्या प्रेमानें जगाला संदेश दिला, त्याची अशी चेष्टा करतां काय ? मरणोन्मुख माय झाली म्हणून पुत्रानं तिचा धिःकार न करतां औषधपाणी केलंच पाहिजे, हें तुम्हींच शिकतां न पुस्तकांतून ? आणि बेशरमपणानें तिच्या अंगावर हात टाकतां ? अरे गाय ही आपली माता आहे—' आत्मारामबुवा अवसानानें म्हणाले.

आणि जी गोष्ट कोणत्याही सुपुत्रानें अशा वेळीं करावयास नको तीच गोष्ट नेमकी राजाचे हातून घडून आली. घरोघरीं प्रत्येक वडील माणसांचे कांहीं लाडके छंद असतात. ते खुळेपणाचे असोत वा अगदीं मूर्खपणाचे असोत, त्या माणसावर अवलंबून असणाऱ्या घरांतील प्रत्येक व्यक्तीनें त्याची तळी आरती केली पाहिजे. त्या छंदांचा नेहमीं उदयोस्तु उदयोस्तु केला पाहिजे. नाहीं तर परिणाम कसे भडकतील याला धरबंद उरत नाहीं. 'हो माता आली आहे ! पावशेर दूध वेळेला न का मिळेना ! आणि ही म्हणे माता. एक रुपयाचें खात असेल अन् दोन आण्याचं दूध कांहीं देत नाहीं. आणखी वर हुंदाडणं आणि लाथा झाडणं— !' राजा बोलून गेला.

आत्मारामपंतांना आतां मात्र राग आवरणें अशक्य होतें. प्रत्यक्ष पोटच्या पोरानें हें असलें उद्दामपणाचें भाषण करून त्यांच्या उपास्यदेवतेवर घाला घालावा त्यापेक्षां—! ते खवळून ओरडले, 'बंद कर तुझी जीभ. हिच्या लाडानं तूं फार शेफारून गेला आहेस. थांब, तुला दाखवतोंच. वडिलांचा उपमर्द करतोस !' आणि सबंध पंधरा वर्षांच्या आयुष्यांत राजानें त्या दिवशीं प्रथम वडीलकी म्हणजे केवढें जबरदस्त वजनदार वतन असते याचा अनुभव प्रत्यक्ष घेतला.

आत्मारामपंताच्या या बेहद्द चिडण्याचें कारण फार मनरंजक होतें. त्यांच्या या गोभक्तीचा इतिहास कांहीं पिढ्यान् पिढ्या चालत आलेला नव्हता. सहासात वर्षांमागें ज्या यजमानगृहीं ते उपाध्येपण करीत असत त्यांच्या येथें एक कार्य निघालें होतें.

यजमानांच्या द्वितीय पुत्राचें लग्न होतें. त्या लग्नाला आत्मारामपंत गेले असतां तेथें एका महान् गोसेवकानें त्यांना हिंदुधर्मांतील या कलियुगांत विस्मृतप्राय होत जाणाऱ्या गोसेवेचें महत्त्व पटवून दिलें. आणि तें महत्त्व एरव्हीं त्यांना पटलें असतें कीं नाहीं हें नक्की सांगतां आलें नसतें; परंतु त्या वेळीं मात्र मुलांना गाईच्या दुधाप्रीत्यर्थ सुमारे दहा रुपयांची रक्कम दरमहा काढून देणें त्यांना अत्यंत जड जात असल्याकारणानें त्यांनीं एक दुभती गाय पाळण्याचें चटकन् कबूल केलें. स्वार्थ आणि परमार्थ ह्यांची बेमालूम जोड घालण्याचें त्यांच्या व्यवहारी मनानें मान्य केलें. त्याप्रमाणें नुकतीच एका खाटकानें पंचवीस रुपयांच्या मोबदल्यांत अत्यंत संतोषानें जाऊं दिलेल्या एका गाईची त्यांच्या घरीं रवानगी करण्यांत आली. वेळेला दोन शेर दुधाला एक टाक कमी नाहीं अशा खात्रीची गाय विना मोबदला घरांत येते, एका सुप्रसिद्ध गोसेवकाशीं आपली दाट ओळख होते आणि आपल्या भिक्षुकीच्या वृत्तीला ही एक चांगली जोड अनायासें होते, हें ओळखून आत्मारामपंत एकदम गाईचे अभिमानी झाले.

एकदम अचानक श्रीमंत होणारा मनुष्य, स्वार्थाकरतां धर्मांतर करणारा मनुष्य आणि ढोंगाकरतां कोणतेंही तत्त्व सोईस्करपणें पटवून घेणारा मनुष्य आंधळा बनतो म्हणून म्हणतात तें कांहीं खोटें नाहीं. आजपर्यंत गाईकडे एक आडदांड पशु म्हणून पाहणाऱ्या पंतांनीं आतां रस्त्यांत उधळलेली गाय पाहिली कीं भीतभीत डोळे किलकिले करून ' गोमातेकी जय–गोमातेकी जय ' हा मंत्र पुटपुटण्यास सुरवात केली. एका गाईचे शरीरांत तेहतीस कोटी देव डांबून ठेवणाऱ्या हिंदुधर्माचे ते प्रचारक होते. परंतु आजपर्यंत त्यांनीं या गोष्टीला विशेष प्राधान्य दिलें नव्हतें. वसू बारशाच्या दिवशीं त्यांचा स्त्रीवर्गातर्फे गाईशीं जो काय संबंध येईल तेवढाच. परंतु आतां मात्र ते अंतर्बाह्य गोभक्त झाले. ज्या दिवशीं ती पिंगट, चिपाडलेल्या डोळ्यांची गाय दारांत आली त्या दिवशीं ' परब्रह्म भेटी आले गा ' ची त्यांना आठवण होऊन ते सद्गदित झाले आणि शेजाऱ्यापाजाऱ्यांच्या कुत्सितपणाकडे पूर्ण दुर्लक्ष करून त्यांनीं सौभाग्यवतीकडून तिच्या पायांवर दारांतच ऊन पाणी घालून घेतलें, हळद कुंकूं वाहून घेतलें, आणि राजाला हाताशीं धरून तिची आरती करून घेतली. गोठ्यांत बांधल्यावर ते प्रेमानें तिच्या पाठीवर हात फिरवूं लागले. हा नवीन प्रकार पाहून आधींच बुजलेल्या त्या जनावरानें एकदम बिथरून जोरानें मान घुसळली आणि लाथा झाडायला प्रारंभ केला. पण आत्मारामपंतांचें हृदय आतां भक्तिरसानें

नुसतें ओसंडून राहिलें होतें. त्यांच्या हृदयांत प्रेमगंगेला पावसाळी पूर आलेला होता. त्यांनीं जरा दूर उभा राहून आपल्या कुटुंबांतील मंडळींना उद्देशून गाईच्या या अजब वर्तनाचें समर्थन करण्यास सुरवात केली—'ह्या आईचा प्रेमा बरं का! फारा दिवसांनीं भेटलेल्या चुकलेल्या बाळाला माता अशीच गोंजारते. धन्य धन्य माउली!' असें म्हणून त्यांनीं दुरूनच भीतभीत गाईचें शेपूट धरून डोळयाला लावलें.

त्या दिवसापासून सकाळ, संध्याकाळ घरांतील देवांप्रमाणें गोठ्यांतल्या या तेहतीस कोटी देवांच्या गांठोड्याचें भजन पूजन होऊं लागलें. प्रथम प्रथम नाविन्य म्हणून घरांतील माणसांनीं या परमार्थ साधनाला मनोभावानें सहाय्य केलें. शेजापाजाऱ्यांनीं कौतुक केलें. पाखंडी मताच्या लोकांनीं दुरून दुरून उपहासाची शेलकीं वचनें उच्चारलेली ऐकूनसुद्धां आत्मारामपंतांनीं आपल्या व्रतामध्यें यत्किंचितही खंड पडूं दिला नाहीं—धेनुमाता आतां त्यांच्या कुटुंबांतील एक घटक होऊन बसला. आणि सगळें कसें रामराज्याप्रमाणें चालले असतें—

परंतु राजा इंग्रजी शाळेंत जाऊन शिकूं लागला. मुलानें आपल्या पश्चात् वडिलोपार्जित भिक्षुकी चालवावी या सदिच्छेनें त्यांनीं त्याला रोज संहिता द्यायला सुरवातसुद्धां केली होती. परंतु पत्नीच्या अट्टाहासापुढें त्यांना हार खावी लागली. आणि आयुष्यांतील एका गोड स्वप्नाचा झालला भंग त्यांना उघड्या डोळ्यांनीं पहावा लागला. कालाचा महिमा म्हणून त्यांनीं हेंहि सहन केलें.

धेनूची आरती यथासांग करावयाची म्हटली म्हणजे दोही सांजा सुमारें दोन तासांचा अवधि लागे. त्या वेळीं सोवळें नेसून उघड्या अंगानें पंत हातांत ताम्हन घेऊन सुरक्षित अंतरावर आरत्यांची आवृत्ति उच्च स्वरानें करीत उभा राहात. राजाकडे तास वाजविण्याचें काम होतें. दोन वर्षांनीं लहान असलेल्या ठकूकडे झांजा वाजविण्याचें काम असे. दिवसभर गांवातल्या पोळया लाटण्याचे काम करून रात्रीं निवाऱ्याला दीड रुपये दरमहा भाड्याच्या बोळकंडींत पसरणाऱ्या शेजारच्या चिंगूताईकडे टाळया वाजविण्याचें काम होतें. ठकूच्या पाठीवरचा बंडू देवांतली घंटा वाजवीत असे व सौभाग्यवतीच्या कडेवरचा तान्हा भोकांड पसरीत असे. अशा या सगुणात्मक भक्तीमुळें शेजारच्या उठवळ लोकांचें पुढें पुढें पित्त खवळूं लागलें. त्यांनीं पंतांच्या घरमालकाकडे तक्रारी केल्या. जेव्हां मालकांनीं पंतांना खासगी रीतीनें जागा सोडण्याविषयीं सुचविलें तेव्हां पंतांचा राग अनावर झाला.

जागेच्या शोधांत आपण असल्याची शेखी मिरवून पंतांनीं तडजोडीची भाषा पूर्णपणें धिःकारून लावली खरी, परंतु विचारान्तीं त्यांना थोडीशी पड खाणेंच श्रेयस्कर वाटूं लागलें. त्यापुढें राजाचा तास अडगळीचे खोलींत जाऊन पडला आणि त्या ऐवजीं त्यानें मनांतल्या मनांत मूर्तीचें ध्यान करीत उभें रहावें असें ठरलें. राजाला हें काम पूर्णपणें मान्य होतें. परंतु एकंदर प्रकारावरून आत्मारामपंतांना जगाचा तिरस्कारच वाटूं लागला.

सर्वांत महत्त्वाची आणि आश्चर्याची गोष्ट म्हणजे पंतांना ह्या धेनूविषयींच एक प्रकारें पूर्वी इतकें कौतुक वाटेनासें झालें. वेळेला दोन शेराला एक टांकभर सुद्धां कमी दूध न देण्याची हमी असलेली गाय जेव्हां दोन दिवसानंतर एक टांकभरच दूध देण्यांत कृतकृत्य झाल्याचें समाधान दर्शवूं लागली तेव्हां आपलें कुठें तरी चुकत असावें अशी साधार भीति त्यांना वाटूं लागली. महिना पंधरावीस रुपये खर्चून सुद्धां अडगळीपलीकडे तिची फारशी किंमत दिसेना, तेव्हां त्यांचें धावें दणाणलें. घालावें तेवढें खाऊन फस्त व्हावें, आणि अमृतधारा मात्र थेंबानें सुद्धां वाढेनात असा हा पुच्छप्रगतीचा मार्ग किंवा व्यस्त त्रैराशिकाचा प्रकार जेव्हां अनुभवास येऊं लागला, तेव्हां हें पूजास्थान तितकेसें भरंवशाचें नसावें असा त्यांना दाट संशय येऊं लागला. सरकीचें प्रमाण वाढवून पाहिलें, दाण्याऐवजीं बाजरी शिजवून गूळ मिसळून घालण्याचाही उपद्व्याप त्यांनीं करून पाहिला; परंतु त्यांना अनुभव आला कीं, पुण्याची म्युनिसिपालिटी आणि मोफत मिळालेली गाय या दोन चिजा नामशेष होतील—पण गुण सोडायच्या नाहींत.

आणि स्वतःचा पराभव डोळ्यांनीं एक वेळ पहावेल पण तो कबूल करणें फार जड जातें. मनाला खूप फसविण्याचा त्यांनीं प्रयत्न करून पाहिला, परंतु मख्खपणें उभें राहून त्यांना खिजविण्याची निर्लज्ज वृत्ति त्या मातामाउलीनें असिधाराव्रताप्रमाणें आजतागायत पाळली होती. पुढें पुढें गाईचा प्रश्न हा त्यांचा एक नाजुक कोपरा होऊन बसला होता. कोणीही त्यांच्या गाईचा चुकून उल्लेख केला कीं ते खवळून प्रतिपक्षाला हिंदुधर्मांतील गाईच्या स्थानाबद्दल ऐसे सुनावीत कीं हीं गाय आवरा, वाटेल तो भूर्दंड द्यायला तयार आहोंत असें त्याला वाटावयास लावीत. कारण पराभव कबूल करणें म्हणजे आज त्यांची केवढी नाचक्की झाली असती. नाटकांत अंगावर घेतलेलें सोंग तात्पुरतें असलें तरी त्यांत गलथानपणा यत्किंचित्ही क्षम्य नसतो. इथें तर ही सोंगाची कायमची ब्याद मागें लागलेली. त्यांतून ब्राह्मणाच्या भिक्षुकी वृत्तीला धोका पोहोंचण्याचा जबरदस्त संभव

होता. धेनूमुळें जें कांहीं चार बायाबापड्यामध्यें त्यांचें नांव झालें होतें तें गमावायला त तयार नव्हते. आचार धर्मांप्रमाणें वागत असल्याचा जो बहाणा करावयास सांपडे त्याला अनुचित असे त्यांना कांहींही करतां येणें शक्य नव्हतें. या सर्व प्रकारामुळें मनाविरुद्ध गोष्ट करीत असतां जर थोडासा प्रतिकार झाला तर मनुष्याचा तोल सुटतो तसला प्रकार आत्मारामपंतांचा झाला होता.

अलिकडे, अलिकडे त्यांना घरांतच शत्रु निर्माण झाला आहे कीं काय अशी भीती वाटूं लागली होती. तो शत्रु दुसरा तिसरा कोणी नसून त्यांचा थोरला मुलगा राजाच होता. अजून उघडउघड बंड पुकारण्याइतकें राजास धैर्य झालें नव्हतें; परंतु वडिलांच्या पश्चात् किंवा त्यांना कळू न येईल अशा बेतानें त्यानें त्या गोमातेला तिची योग्य जागा दाखवून देण्यास हळुहळू सुरवात केली होती. एका एकादशीला वडील आळंदी मुक्कामीं दोन दिवस जाऊन राहिले असतां नुसत्या कडब्यावर त्या पवित्र धेनूला गुजराण करून घ्यावी लागली. हा प्रकार गुपचूप राहिला असता, परंतु लष्कराच्या भाकऱ्या भाजणारी चिंगूताई जणुं काय गाईचा अपमान म्हणजे प्रत्यक्ष आपलाच या आत्मौपम्य बुद्धीनें पंतांच्या परतीची वाट पहात होती. राजाच्या द्विपाद आईनें नवऱ्याच्या मुर्वतीखातर त्याला थोडेसें बोलून पाहिलें. परंतु तिलाही या प्रकाराचा कमालीचा तिरस्कार आलेला असल्यामुळें तिनें डोळ्यांवर कांतडें ओढून घेण्याचें व्रत पत्करलें.

परत आल्यावर थोडेसे अतिशयोक्तिपूर्ण असें त्या हालाचें वर्णन कानीं पडतांच आत्माराम-पंतांनीं जानवें तोडण्यापर्यंत आकस्ताळेपणा केला. पुण्याच्या पर्वतीएवढेंसें उंच व मागच्या परसाइतकें लांब कैलास शिखर असतें तर त्यांनीं तें चटकन् गांठलें असतें. राजाच्या इंग्रजी शिक्षणाचा उद्धार तोंड दुखून आल्यावर बंद पडला. पत्नीलाही त्यांनीं नाहीं नाहीं तें बोलून घेतलें आणि त्या वेळीं आजारी पडलेल्या ठकूला डॉक्टरकडे नेण्याऐवजीं गोठ्यांत जाऊन धेनूमातेच्या पाया पड आणि औषधाऐवजीं गंगेचे चार थेंब तोंडांत टाक असा सडेतोड हुकूम फर्मावला. आठ दिवस ते घरांत न जेवतां एक पैसा दक्षणेवर दूरदूरच्या पेठांतून जेवून आले. आणि शेवटीं जेव्हां घरांतील सर्व मंडळींनीं त्यांच्या समजुतीखातर एके दिवशीं ' धेनुदिन ' साजरा केला तेव्हां त्यांनीं आपला क्रोध आवरल्याचें जाहीर केलें. त्या दिवशींचा पूजेचा आणि आरतीचा अपूर्व सोहळा पाहून आसपास जमलेल्या चार चटोर मंडळींची पुढें एक महिनाभर करमणूक झाली, परंतु भक्तांच्या डोळ्यांचें पारणें फिटलें.

राजाचें मन मात्र असमाधानी राहिलें. त्याचा ह्या गोष्टीवर मुळींच विश्वास नव्हता. गाईची योग्य ती जोपासना व्हावी यांत त्याला कांहींच गैर वाटलें नाहीं; परंतु मनुष्याला लाथाडून पशूंना जवळ करावें हा न्याय कोठला ? आधीं मनुष्यधर्म कीं, पशु-धर्म ? सोळा सोमवारच्या कहाणींतल्या म्हाताऱ्या बाईनें आधीं नातवा लेकरांना भरपूर खाऊं-पिऊं घातलें आणि नंतर उरलेलें दूध घेऊन ती महादेवाच्या गाभाऱ्यांत टाकण्यास गेली असतां देवाला समाधान होऊन गाभारा भरल्याचें त्यानें ऐकलें होतें, वाचलें होतें. देवाला मनुष्याचा जीव कळतो आणि माणसाला माणुसकी कळत नाहीं, हा काय न्याय आहे ? ज्या धर्माचे प्रचारक म्हणून हे लोक मिरवतात त्याच धर्मात जीवावर दया करा म्हणून शिकवलें जातें ना ? मग आजूबाजूच्या माणसांचीं मनें मारून पशूला डोक्यावर घेऊन नाचण्यांत हे लोक कोणत्या धर्माचें पालन करीत असावेत ? रुपयाचें खाऊन पावशेर दूध देणारा हा ऐतखाऊ प्राणी जर उपयुक्त म्हणून वंदनीय समजावयाचा, तर चार पैशाचें खाऊन अर्धाशेर दूध देणाऱ्या शेळीला कां तसें मानूं नये ? वादविवाद शेवटीं अंगावर येतो असें दिसलें कीं आपले वडील 'धर्मात असें सांगितलें आहे' अशी पळवाट काढतांना त्यानें पाहिलें होतें. त्याच्या इवल्याशा डोक्याला झेपेल अशा तऱ्हेचा युक्तिवाद त्यानें दोन्हीं बाजूंकडून मनाशींच करून पाहिला. परंतु त्याची तरीही ठाम समजूत कायम राहिली कीं, हा एक ढोंगाचा प्रयत्न आहे ! जगां-तील इतर ढोंगें ज्याप्रमाणें सामुदायिक रीत्या यशस्वी करून दाखविलीं जातात त्याच प्रकारचें परंतु थोडेसें धार्मिक स्वरूपाचें व कमी घातुक असें हेंही एक ढोंग आहे.

या ढोंगावर त्याचा मनापासूनचा राग होता. कारण त्या गाईप्रीत्यर्थ त्याला घरांत राहणें नकोसें झालें होतें, आणि बाहेरही त्याच्या चिमण्या शालेय जगांत ' धेनुवल्लभांचे चिरंजीव ' म्हणून त्याला हरहमेश संबोधण्यात येई. तो अगदीं वैतागला होता. दर खेपेस शिक्षकांच्या सहाय्यार्थ धांवणें त्याच्या मानी मनाला तितकेंसें रुचेना; आणि शिक्षक तरी त्याला कशी मदत करणार ? एकदोनदां त्यांनीं त्याचा कैवार घेतला होता; पण त्याचा अर्थ विद्यार्थ्यांनीं निराळाच लावला आणि राजा ' चहाडखोर ' ठरला. त्या दिवसाच्या धेनुदिनाबाबत त्यानें आईला खूप सांगून पाहिलें; परंतु ' बायकोनें नवऱ्याचा कड घेऊं नये ' असलें सुशिक्षित स्त्रियांचें सोईस्कर तत्त्वज्ञान त्या आर्यस्त्रीला अजून कोणी शिकवलें नसल्याकारणानें तिनें राजालाच उलट दोष दिला होता. त्यामुळें तो चिडल्यासारखा झाला होता. त्यांत ही आणखी नवी भर—

रविवार असल्यामुळें राजानें आपले कपडे धुऊन पाटाखालीं दाबून दोरीवर बाहेरच्या बाजूस वाळत टाकले होते. आत्मारामपंतांच्या घरांत परीट, इस्त्री असल्या शब्दांचा अजून शिरकाव झालेला नसल्यामुळें राजाला हीं कामें स्वावलंबनानें भागवून घ्यावीं लागत. मानवधर्म आणि बंधुधर्म या दुहेरी नात्यानें त्यानें आज बंडूचेही कपडे धुतले असल्यामुळें त्याची पाठ भरून आल्यासारखी झाली होती. संध्याकाळीं तो ग्राउंडवरून नित्याप्रमाणें घरीं आला असतां त्याला आज नवीनच प्रकार पुढें वाढून ठेवलेला दिसला. जुनें दावें तुटल्यामुळें त्यांची उपास्य देवता आज वाड्यांतल्या लहानथोर मंडळींशीं आट्यापाट्या खेळत असल्याचें त्याच्या दृष्टोत्पत्तीस आलें. आत्मारामपंत रामेश्वरीं देवदर्शनाला गेले असल्यामुळें गाईला आंवरायला त्यांच्या पत्नीशिवाय कोणीही वीर धजावत नव्हता. पॅरॅशूट सैनिक उतरलेल्या प्रांतांत जेवढा गोंधळ उडणार नाहीं तेवढा गोंधळ एका गाईनें उडवून दिला होता. काठ्या आपटण्याचा आवाज 'धरा—पकडा—अरे इकडे आली—' इत्यादि रणगर्जनेला मधूनमधून सांथ देत होता; मधूनच दारं उघडलीं जात होतीं व धाडकन् लावलीं जात होतीं. एकच हांहाःकार उडून राहिला होता. राजा जो दिंडींतून आंत आला तों श्रीमती गो—सेविका चिंगूताई पुढें, गाय मागाहून आणि आई पाठीमागें असला पळापळीचा मामला त्याच्या दृष्टीस पडला.

राजानें प्रसंगावधान राखून गाईचं अर्धवट लोंबणारें दोरखंड पकडलें व तिला ठाणबंद करून टाकलें. आणि धापा टाकीत घरांत शिरणार इतक्यांत कपडे वाळत घातलेल्या दोरीकडे त्याचें अभावितपणें लक्ष गेलें. त्याला आश्चर्याचा धक्काच बसला. दोरी तुटलेली होती आणि सगळे कपडे एक ढीग होऊन खालच्या खातेऱ्यांत लोळत पडले होते. घाईघाईनें त्यानें कपडे उचलून घेतले. आणि त्याच क्षणीं उद्वेगानें तें त्यानें पुन्हां खालीं टाकले. त्याचा एकुलता एक शर्ट फाटून त्याच्या चिंध्या चिंध्या झाल्या होत्या ! गाईच्या आजच्या अवखळपणामुळें त्याचा राग आधींच मर्यादा ओलांडू पहात होता. त्यांत ही नवी भर. मागें पुढें न पाहतां घरांत जाऊन सरळ धुणें वाळत घालण्याची भरीव काठी त्यानें दोन्हीं हातांत घट्ट आवळून धरली आणि आईच्या 'अरे—अरे'कडे बिलकुल लक्ष न देतां जनावरांना त्यांचें देवपण विसरून ज्याप्रमाणें एखादा आडदांड शेतकरी बेदम पिटतो त्याप्रमाणें त्यानें हात दुखून येईतों पर्यंत त्या गाईवर प्रहार केले.

शेवटच्या वळाची खूण उठण्याआधींच दारांतून आत्मारामपंत आंत शिरले. हा देखावा

पाहून त्यांचा डोळ्यावर विश्वास बसेना. राजा खालीं पडलेला आहे आणि गाय त्याला शिंगानें भोसकते आहे असा देखावा एक वेळ शक्य कोटींतला त्यांनीं मानला असता, पण हें काय ?

' कार्ट्या, अरे नरकाची रे धन करतो आहेस—सोड सोड ती काठी—माझ्या टाळक्यांत घाल ती वाटल्यास '—असें म्हणत ते त्याच्या अंगावर धांवून गेले—आणि त्याच काठीनें त्यांनीं राजावर बाजू उलटविली.

दोघातिघांनीं मध्यें पडण्याचा गुळमुळीत प्रयत्न करून पाहिला परंतु गोसेविका गं. भा. चिंगूताईनी त्यांना स्वतः पुढें उभे राहून मध्यस्थी करूं दिली नाहीं.

' या हाताचे झाडे त्या हातानें द्यावे लागतात. एक गाय म्हणजे काय सामान्य रूप आहे होय ? या नतद्रष्टानं तेहतीस कोटी देवांच्यावर काठी उगारली. देव स्वस्थ बसेल म्हणतां ? ' चिंगूताईची शापवाणी चालू होती. शेवटीं घरमालक मध्यें पडले आणि पुन्हां शांतता नांदूं लागली.

पण ही शांतता भयाण होती. राजानें हूं कीं चूं न करतां वडिलांचा रोष सहन केला. शारीरिक वेदना सहन करीत असतां त्याचें मन त्याला आंतून शतशः फटके मारीत होतें. त्यानें मनांतल्या मनांत प्रतिज्ञा केली. ती कोणालाच कळणें शक्य नव्हतें.

—पहांटेच्या गारव्यांत एक व्यक्ती त्या गोभक्ताच्या घरांतून बाहेर पडली. अजून आकाशांतल्या चांदण्यांचा लपंडाव चालूच होता. समोरच्या पिंपळाचीं पानें मधूनच वाऱ्याच्या झुळकीसरसी त्यांच्या प्रमाणेंच खेळत होतीं. जिकडे तिकडे सामसूम होतें. गोठ्यांत बांधलेल्या जनावरांचे हालचालीमुळें आडोशाचा पत्रा मध्येंच खडखड वाजे या परता दुसरा कोणताही आवाज ऐकूं येत नव्हता. समोरच्या खिडकींत एक राकेल तेलाचा दिवा मिणमिण उजेड देत होता. ती व्यक्ति अंगणांतून गोठ्यापाशीं येऊन थोडा वेळ थांबली. परंतु विचार पालटून कीं काय ती व्यक्ति पुन्हां दरवाज्याकडे वळली. हलक्या हातानें दिंडीची कडी काढण्यांत आली, आवाज थोडासा झालाच. कोण ती व्यक्ति दचकली ! कोणी ऐकलें नाहीं, अशी खात्री झाल्यावर ती व्यक्ति दिंडी उघडून घराबाहेर पडली— !

राजानें घरदार सोडून आपलें आयुष्य वाऱ्यावर सोडण्याचा निश्चय केला होता !—

दुसऱ्या दिवशीं सकाळीं त्यानें अंथरुणाच्या उशाशीं ठेवलेली चिठ्ठी वाचून आत्मारामपंत दचकले. गोष्टी इतक्या थराला जातील ही त्यांची कल्पना नव्हती. पत्नीनें घाबऱ्याघाबऱ्या प्रश्न करतांच ते डोक्याला हात लावून मटकन् खालीं बसले.

—आणि खरी माता पोराकरतां कसा जिवाचा त्रागा करते याचा त्यांना त्या दिवशीं पुरता अनुभव आला !

---

# वासरूं-प्रेम

आजतागायतचा मानवजातीचा एकंदर इतिहास लक्षपूर्वक पाहिला, तर मनुष्यांनीं प्रामाणिकपणानें निश्चित केलेले अचाट साहसी बेत आणि त्या बेतांना नामोहरम करून टाकणारे देवादिकांचे लुच्चेगिरीचे डाव, यांनीं भरगच्च भरलेला असा तो दिसून येईल; असा एकही धर्म या जगाच्या पाठीवर दिसून येत नाहीं कीं, त्यांत असल्या लबाड देवांच्या करामती बिलकूल नाहींत. आम्हां क्षुद्रमानवांचा मत्सर करण्यांत या थोर देवादिकांना कोणतें महत्कृत्य केल्यासारखें वाटत असेल तें त्यांचे तेच जाणोत! इंद्रपदाची बिलकूल इच्छा मनांत न धरतां तपश्चर्येचें पुण्य गाठीं बांधूं पाहणारे धर्मवीर आपल्याकडे थोडेथोडके झाले नाहींत. आणि दर खेपेला लबाडीच्या मार्गाचा अवलंब करून त्या तपश्चर्येची धूळदाण उडवून टाकणारे नतद्रष्ट देवही पण थोडेथोडके झाले नाहींत. आणि देवांचें एक अमोलिक शस्त्र म्हणजे एखादी सौंदर्यखनी अप्सरा. या शस्त्रानें त्यांनीं कितीएक मानवांचे साहसी बेत नेस्तनाबूद करून टाकले आहेत. या शस्त्राचा उपयोग खरोखरीच केंसानें गळा कापण्या इतका सफाईदार आहे. गुदगुल्या करीत हंसवून ठार मारणारे हे स्त्रीरूपी अस्वल निर्माण करण्यांत विधात्यानें आधुनिक संहारशस्त्रें निर्माण करणाऱ्या मोठ्या मोठ्या शस्त्रवेत्त्यांना सहज लीलेनें माना खालीं घालावयास लावलें आहे.

## वासरूं प्रेम

आमच्या विनूचे केवढे महत्त्वाकांक्षी बेत ! तपश्चर्या करण्याचा त्याचा केवढा दांडगा जबरदस्त आत्मविश्वास–जमदग्नीच्या कुळांत जन्म घेवून त्यानें आपल्या मनोनिग्रहानें प्रत्यक्ष त्या मूळ पुरुषाला लाजविण्याचा बेत केला होता. काय वाटेल तें होवो. शेंडी तुटली तरी बेहत्तर ( नव्हतीच ती मुळीं जाग्यावर ) एका वर्षांत १०६ पौंडांचें ९६ पौंडावर वजन आलें तरी कुछ फिकीर नाहीं, जान गेली तरी हरकत नाहीं—पण या वर्षी इंग्रजी ६ वीच्या वार्षिक परिक्षेंत सहा तुकड्यांतल्या अडीचशें मुलांत पहिला नंबर आलाच पाहिजे. ही त्याची भीष्म प्रतिज्ञा त्यानें आपल्या मनांतल्यामनांत उच्चारली होती. गतवर्षी चौथींतून पांचवींत त्याला केवळ वडिलांच्या वशिल्याच्या जोरावर ढकलण्यांत आलें होते आणि त्याबद्दल त्यानें घरीं वडिलांचें नाहीं नाहीं ते शब्द मुकाटपणें ऐकून घेतले होते. मुंबईतल्या मुलांना क्रिकेट–मॅच–सारख्या पवित्र समारंभास वारंवार उपस्थित राहाण्याचें कर्तव्य बजावणें जरूर असतें. यांत त्या बिचाऱ्या मुलांचा काय दोष ? पण अशावेळीं आईबाप न बोलतील तर ती आईबापें कसली ? विनूच्या वडिलांनीं त्याला वारंवार क्रिकेटच्या नादाबद्दल छेडावें. आणि विनूनें आपल्या कर्तव्यांत मोठ्या सहनशीलतेनें खंड पडूं देवूं नये. असा प्रकार गतवर्षी चालू होता. शेवटीं परिणाम व्हायचा तोच झाला. संस्कृतांत स्वारी बसली. कसातरी त्याला वरच्या वर्गांत ढकलावा लागला आणि त्या दिवशीं रात्रीं " पुन्हां तूं ग्राउंडवर तर जा तंगडी तोडून टाकतो " ही वडिलांची प्रतिज्ञा ऐकावी लागली.

त्यानें आतां मात्र ठरवून टाकलें कीं मॅच असो नाहींतर महामॅच असो. सुटीच्या दिवशीं " इष् ( इच्छ् ) इच्छती, षठगण. इच्छा करतो हा ताज्या लावायचा. इतकेंच नव्हे तर वडिलांना पुढच्यावर्षी आश्चर्यचकित करून सोडायचें; त्यांनी मनांत म्हणावे कीं ' अरे, हा आपला विनू ! विनूच का हा ? पहिला नंबर याचा ? अडिचशें मुलांत पहिला ! हं ऽऽऽ ' अगदीं हेच शब्द त्यांना उच्चारायला लावीन, तरच नांवाचा विनू.

दुसऱ्या दिवशीं संध्याकाळीं 'लॉट उठावे, घडीघडी न आवे' म्हणून मानवजातीच्या छोकरे लोकांवर उपकार करण्याचा चंग बांधणाऱ्या गुजराती फेरीवाल्या जवळून आण्याला एक या दरानें सोळा आण्याच्या सोळा वह्या त्यानें विकत घेतल्या, प्रत्येक विषयाला एक स्वतंत्र वही, त्यावर सुवाच्य अक्षरांत ' विनायक मनोहर साठे ' हे नामलेखन, चतुर्थांश मार्जिन तांबड्यालाल शाईनें मारलेलें, सफाईदार टोकें केलेल्या एक डझन पेन्सिली इत्यादि साधन-सामुग्रीवर विनूनें पहिला नंबर पटकाविण्याचा निश्चय केला होता.

आसपास वडील नाहींत हे पाहून या बालतपस्व्यानें आईला सहजच कौतुकानें प्रश्न केला. " आई-समज, उद्या जर माझा पहिला नंबर आला, तर तुला काय वाटेल ? "

परंतु स्त्रियांना विशेषतः आयांना तितकेसें व्यवहार ज्ञान नसतें-हातांतल्या लोण्याच्या गोळ्याला एक थप्पड लगावीत विनूची मातामाउली किंचित उपरोधिक स्वरानें म्हणाली— "तुझा पहिला नंबर-? उगीच मला हर्षवायु होईल कदाचित्. आपल्या आईला जप बाबा-! अन्-सोन्या-तुझें तें ग्राऊंड नाहीं कारे ओसाड दिसायाचं तुझ्या शिवाय ? "

विनूने हातांतलें सबंध बिस्किट तोंडांत कोंबीत आणि तें बाहेर येऊं नये म्हणून डाव्या हातानें तोंड दाबीत म्हटलें " ऊं हुं,-यापुढें किकेत बिकते शगल बं—"

"तुला शंभरदां सांगितलें कीं, तोंडांत बोकाणा भरून बोलत जाऊं नकोस, तरी तूं ऐकायचा म्हणून नाहींस ! चल, ऊठ ! आईच्या पुढें नुसता वाघोबा, आणि बाहेरून नुसता पाय वाजला कीं रडूबाई-अन् ऊठ जा ! तुझं संस्कुत्र का काय तें जरा वाच जा ! " माउली म्हणाली. शिवाजीला अशी ही जिजाबाई मिळायला पाहिजे होती. परंतु विनू डगमगला नाहीं, बावचळला नाहीं-गोंधळला नाहीं. उलट दुप्पट हुरुपानें त्यानें आपल्या निश्चित बेतास अमलांत आणण्याचें ठरविलें. संस्कृतचें पुस्तक त्यानें हातांत घेतलें. उजव्या हाताच्या करंगळीनें दाढेंत अडकलेल्या बिस्किटाच्या अवशेषाला चक्राकार गती देऊन घशांत ढकलले. संस्कृतचें पुस्तक हातांत घेतांच त्याच्या अंगावर शाहारे आले. परंतु त्यानें नेटानें पुस्तकाचीं पानें चाळण्यास सुरुवात केली. आणि मानस शास्त्राच्या एका गूढ प्रमेयाला नकळत त्यानें चालना दिली. ओढून आणून आणलेलें अवसान कितीवेळ टिकणार ? ज्या गोष्टींत मन रमत नाहीं त्या गोष्टी करण्याकडे मनाची प्रवृत्ति कशी होणार ! त्याला नकळत त्याचें लक्ष पुस्तकावरून उडून समोरच्या छपरावर बसलेल्या काकराजाकडे गेलें;क्षणभरच त्याला त्या पक्षांचा हेवा वाटूं लागला. कावळ्याचें जीवन किती स्वछंदी. संस्कृताचे शद्ब घोकण्याची त्याला जरूरी नाहीं. " उडाण-टप्पू मुलगा " म्हणून संतापणारा बाप त्याच्या पाठीमागें उभा नाहीं, नेहमीं नेहमीं उत्साह भंग करणारी मातामाउली नाहीं—वाटेल त्या ठिकाणीं बसावं, वाटेल त्या ठिकाणीं हिंडायला जावं. वाटल्यास झाडाच्या वरच्या टोंकाला म्युसोलिनीच्या दिमाखानें बसून एखादी ' सिक्सर ' पहावी— !

धांवत्या मनाला त्यानें लगाम घातला. कर्तव्याकर्तव्याची जाणीव झाल्यासारखें करून

त्यानें पुन्हां पुस्तकांत डोकें खुपसलें. आणि लबाडी करणें हाच ज्यांचा धंदा, असे हे तुमचे देव यावेळीं त्याच्या बेताच्या आड येऊं पहात होते. खरोखरी विनू कांहीं त्यांचा स्वर्ग-पादाक्रांत करण्याची इच्छा करीत नव्हता, किंवा इंद्राच्या शचीचा त्यानें अभिलाष धरला नव्हता; कांहीं नाहीं; परंतु असें मानवांना छळण्याचें सोडून देतील तर या देवांचें देवपण तें कुठें उरलें—? विनूनें सहजच खिडकीवाटें समोरच्या खिडकीकडे पाहिलें ! सुमारें त्याच्याच वयाची एक तरुण मुलगी त्याला खिडकींत उभी राहिलेली दिसली आणि आश्चर्याची गोष्ट ही कीं, ती त्याजकडे टक लावून पहात होती. देवांनीं दावा साधला. विनूचें पुस्तक हातांतून गळून पडलें ! एका यःकश्चित चौदा वर्षांच्या पोरीपुढें आज शेंकडों वर्षें चालत आलेल्या प्रौढ गिर्वाण सुंदरीनें लोळण घेतली होती. विद्येवर सौंदर्यानें जय मिळविला. हा विनूचा दोष नव्हता. विद्येचा दोष नव्हता किंवा त्या सौंदर्याचाही पण नव्हता. तें एक त्रिकालाबाधित सत्य होतें. सौंदर्य कां विद्या, या प्रश्नाचा निकाल एका चुटकी सारखा लागतो. आणि म्हणूनच कीं काय विद्याविहीन स्त्रिया सौंदर्यभूषित दिसून येतात; आणि विद्येनें विभूषिलेल्या स्त्रीवर सौंदर्याची सावली क्वचितच पडलेली दिसून येते. पदवीधर स्त्रिया क्वचितच सुंदर असतात. आणि सौंदर्यखनी म्हणून प्रसिद्ध असलेल्या स्त्रिया क्वचितच पदवीच्या मागें लागतात. अर्थात हें तत्त्वज्ञान डोक्यांत येण्या इतकें विनूचें डोकें पक्क नव्हतें. त्याच्या डोळ्यांनीं त्याच्या मेंदूला तार केली—समोरच्या खिडकींत फारच गोड पोरगी आहे. हिरवें—नाहीं, नाहीं...पारवें पातळ नेसलेली आहे. गोरीपान आहे, सरळ नाक, इवलेसे लालजाल ओठ, लहान पोराच्या बोंडल्यासारखें लहान कान, केस मोठे मजेदार अन् भूरभूर उडत आहेत; डोळे याच दिशेकडे आहेत; पुढें काय करावें तें उलट टपालीं कळवावें. मेंदूनेंही पण कार्याचें महत्त्व ओळखून ताबडतोब उलट टपाली उत्तर केलें, सध्यां नुसतें पहात राहा. सविस्तर उत्तर मागावून येत आहे. विनूची दृष्टि आपणांकडे आहे हें पाहून त्या मुलीनें खिडकी बंद केली. विनूला थोडासा तिचा राग आला. जरावेळानें "हें कोण बुवा नवीन? माधवरावांच्या घरीं ही कोण मुलगी ?" इत्यादि पुटपुटत पुन्हां तो खुर्चीवर बसला. हातातलें पुस्तक मिटून किती शब्द पाठ झाले आहेत याची तो स्वतः परीक्षा घेऊं लागला. सुमारें वीस शब्दांपैकीं एकोणीस शब्द चुकले. आणि कुमारी म्हणजे लग्न न झालेली मुलगी हा शब्द मात्र पाठ झाला होता.

दहा वाजतां वडिलांच्या पंक्तीला बसून जेवण्याचा तो प्रयत्न करीत होता. "विनू, शुद्धीवर आहेस कां तूं ? भाजी मिठांत काय घालतो आहेस ? सदा कार्ट्यांचें लक्ष बावरलेलं !

मॅच वाट पाहात असेल त्याची एखादी. हो ! विनू, तुझ्या शाळेत मुली घेतात कां?" वडिलांनी पृच्छा केली. विनूची पोळी आमटींतच पडून राहिली "हो–कां?" एवढेंच तो म्हणाला. "ते समोरचे माधवराव आहेतना. त्यांची पुतणी आली आहे शिकायला. पुण्याला होती इतके दिवस. ते म्हणत होते–सकाळीं तुझ्या बरोबर जाईल ती. म्हणजे त्रास नाहीं. इंग्रजी चौथींत आहे वाटतं कां तिसरींत म्हणाले कुणास ठाऊक–जेवण झाल्यावर त्यांचे-कडे जा आन् काय दाखला फी असते तें सांग." इतकें म्हणून आपल्या अंगावरची जबाब-दारी बरी टळली या मुद्रेनें मनोहरपंत उठून गेले. विनूचें मन म्हणजें एक भावनांचें जाळें झालें होतें. जेवण उरकून मोठ्या लगबगीनें कपडे चढवून "आई जातो ग" म्हणून म्हणत स्वारी जिना उतरून पळाली सुद्धां !

विनूला अक्कल नव्हती असें प्रत्यक्ष त्याच्या आईबापाला सुद्धां म्हणतां येणें शक्य नव्हतें. उलट पक्षी त्याचा अती शहाणपणाच त्याच्या उडाणटप्पूपणाला कारण असावा असें त्यांचें स्पष्ट मत होतें. वर्गावरचे शिक्षकसुद्धां 'फार शहाणा आहेस बैस खालीं' म्हणून म्हणत. त्याच्या शहाणपणाला मर्यादेचे लगाम घालण्याचा प्रयत्न करीत असत. आणि हेंही खरेंच कीं, वर्गातील इतर मुलांच्या मानानें यालाच एक-त्याला शंका फार. आणि त्या शंकांचें निरसन कधींच होत नसें, "एक शिक्षक वारले तर एक दिवस सुट्टी आणि सगळे?" ही सुद्धां एक त्याची त्रैराशिकांतली शंका आज चार-पांच वर्षें तशीच राहून गेली होती. सर्वच वडीलधाऱ्या मंडळींची त्याच्यापाशीं एक मुखानें मागणी होती कीं, "तुझी अक्कल आणि शंकाकुशंका फार आहेत. त्या जरा कमी कर. विशेषतः तुझी अक्कल तर ट्रॅमगाडीच्या पुढें धावणारी आहे; ती जरा ताब्यांत ठेव"— विनूचा अगदीं कोंडमारा झाला होता. परंतु इंदूच्या पुढें तो भरमसाट धांवत असे. आणि ज्याप्रमाणें अफूचें व्यसन सुटण्यासाठीं म्हणून एखाद्यानें दारूचें व्यसन जडवून घ्यावें, तद्वत् क्रिकेटचा नाद थोडा थंडावला; परंतु रोज संध्याकाळीं चौपाटीवरची निसर्गरम्य शोभा इंदूला पटवून देण्यांत त्याचा बराचसा वेळ खर्च होऊं लागला. चौपाटीवर आपण आपल्या दोस्तांच्या थट्टेचा विषय झालों आहोत, हें त्याला पूर्णपणें कळून आलें होतें, परंतु त्याला त्यांतच एक विशेष प्रकारचा आनंद वाटत होता ! तिचें सांनिध्य बव्हंशीं दुसऱ्यांना खिजविण्याकरतांच त्याला पाहिजें होतें, असें सुद्धां म्हणायला हरकत नाहीं. एखाद्या मुलीची मैत्री असणें हें विद्यार्थ्यांमध्यें एकप्रकारचें प्रशस्तीपत्रच समजण्यांत येतें. त्याच्या-

जवळ थोड्या मित्रांनीं कां लगट करण्याचा प्रयत्न केला होता. परंतु त्यानें सर्वांना आपला जाहीरनामा वांचून दाखविला होता कीं " नाहीं रे बुवां, तिला माझ्याशिवाय कोणाशीं बोलावंसं वाटत नाहीं. मी तिला हज्जारदां सांगितलं, पण ती मुळी ऐकायलाच तयार नाहीं. जाऊंदे झालं. तुम्ही तरी काय उगीच तिच्या नादीं लागतां ? चौपाटीवर हिंडणाऱ्या इतर मुली काय थोड्या आहेत ? पहा तिकडे कुणीकडे वशिला लागला तर—" जन्मल्यापासून आजपर्यंत विनू चौपाटीवर आला असेल तर तो नुसता कांहीं तरी खाण्याकरतां, परंतु अलिकडे इंदूबरोबर तो येऊं लागल्यापासून त्याला सृष्टीचें कौतुक करण्यांत घटकान-घटका अपुऱ्या पडूं लागल्या ! आणि साऱ्या सृष्टीचें प्रतिबिंब जणु काय इंदूच्या चेहऱ्यावरच पडलें होतें, अशा भावनेनें तो प्रहरनूप्रहर तिच्याकडे टक लावून वाळूवर बसूं लागला. विनू जन्मतःच बोलणारा मोठा दांडगा. तशांत इंदूचा चेहरा मुक्यालासुद्धां वाचा फुटायला लावण्यासारखा होता; तेव्हां त्याची स्फूर्ति दुथड्या वाहून जावूं लागली यांत नवल तें काय ? या ठिकाणीं प्रश्न येण्याचा संभव आहे कीं विनूचे आई-बाप आणि इंदूचे काका-काकू यांना काय वाटत असावें. वयानें मुलं जरी कितीही मोठीं झालीं तरी वडीलधाऱ्या माणसांना तीं लहानच वाटत असतात. आणि मुलांची मनें अशीं कांहीं इतक्या लवकर बहकून जाणार नाहींत अशी त्यांची स्वानुभवावरून खात्री असते. मानस शास्त्राच्या नवीन शोधांवर त्यांचा मुळींच विश्वास नसतो असें म्हणण्यापेक्षां असें एखादें मनाचें शास्त्र असेल हें त्यांना माहितच नसतें असें म्हणणें जास्त सत्याला धरून होईल. पोरांना सुद्धां प्रेमाचे शब्द उच्चारतां येतात हें त्यांना मुळीच पटणार नाहीं. अलीकडे सुधारणेच्या वावटळींत सांपडलेल्या मानवजातीच्या मुलांमध्यें किती झपाट्यानें फरक घडून येत आहेत, याची कल्पनासुद्धां वडीलधाऱ्यांना नसते असेंच म्हणावें लागेल. त्यामुळें विनूचें प्रेम अबाधित चाललें होतें.

रोज दोघेहीजण बरोबर शाळेंत जात. एके दिवशीं एका मित्रानें स्पष्टपणें ऐकूं येईल अशा नेटानें स्वगत भाषण केलें " अरे गड्याचा खर्च वांचवते आहे ती. " दुसऱ्या एका रसिक दोस्तानें म्हटलें ' पायांतल्या चपलेवरचा गोंडा म्हणून राहायला सुद्धां आपण एकदम कबूल आहोंत. ' सर्वजण कोणत्याना कोणत्यातरी रूपानें, कोणीं तिच्या पुस्तकांतल्या बुकमार्कच्या रूपानें, कोणी तिच्या बांगड्याला अडकवलेल्या बारीक पिनूच्या रूपानें इंदूच्या सहवासास अधीर झाले होते. परंतु विनू हा एकटाच प्राणी तिच्या मर्जीतला होता असें स्पष्ट दिसत होतें.

## मांडवावरील वेली

अभ्यासांत वेळोवेळीं शंकास्थानें उपस्थित होत असतात. इंदूचीं हीं शंकास्थानें सोडविण्याची विनूनें हमी घेतली होती. शंकेला उत्तर देतांना मात्र तो तिच्याकडे पहात असे. श्वासोच्छ्वासाबरोबर खालींवर होणारी छातीवरची तिची मोहनमाळ कितीतरी सुंदर होती. बोलण्याच्या भरांत पदराची चाळवाचाळव चालली असतां, मध्येंच चुकून तिचा पदर थोडासा मागच्या बाजूस सरके, त्यावेळीं विनूच्या हृदयाचे ठोके दुप्पट वेगानें पडत असावे, असें त्याच्या चर्येवरून उघड दिसत होतें. तिच्या संभाषणप्रसंगीं तो इतका तिच्याशीं एकरूप होऊन जात असे कीं, तिच्या शंकाकुशंका बाजूस राहून, हाच आपल्या मनाशीं नसत्या शंकांना जन्म देत असे. बोलतांना मध्येंच, 'इश्श'चें सारण भरून ती जेव्हां तोंडाची करंजी करीत असे, त्या वेळीं विनू समाजाचे नियम मोडून अटकेपार होणार कीं काय, अशी साधार भीति पडल्यास नवल तें कसलें ? ' आऽऽऽ हाऽऽ हा ' म्हणून म्हणतांना तिनें वेळविलेली मान विनूच्या स्मरणांत कायमची जाऊन बसली होती.

विनूला कादंबऱ्या वाचण्याचा दुष्ट नाद होता. कलाविलास या नांवाखालीं लिहिल्या जाणाऱ्या एकूण एक मराठी कादंबऱ्या त्यानें वडिलांच्या नकळत वाचून काढल्या होत्या. केवळ कलेकरितां म्हणून लेखक गोष्टी-कादंबऱ्या लिहितात, परंतु या गोष्टी आपण वाचूं नयेत एवढा पोक्त विचार मुलांना कोठून असणार ? कादंबरींत वर्णिलेल्या अद्‌भूतरम्य गोष्टींचा विनूला विसर पडणें शक्य नव्हतें. इंदूच्या मैत्रीचें स्वरूप त्याला कादंबऱ्यांत दिसून येत होतें, असें म्हणण्यापेक्षां कादंबऱ्यांतून वर्णिलेल्या पुरुष-स्त्री-मैत्रीचें स्वरूप तो इंदूमध्यें पाहाण्याचा प्रयत्न करीत होता, असें म्हणणें सत्याला धरून होईल.

सुमारें दोनतीन महिन्यांच्या सहवासानंतर विनूच्या डोक्यानें भलताच विचार अमलांत आणण्याचें ठरविलें. प्रथम तो विचार डोक्यांत आल्याबरोबर त्याला एकदम कसेसेंच वाटलें. अगदीं चक्क शरमल्यासारखें झालें. बाबा, आई यांची भीति त्याच्यापुढें उभी राहिली. सर्वांत महत्वाची गोष्ट म्हणजे त्याची स्वतःचीच त्याला भीति वाटूं लागली. परंतु सहवासानें त्याची बरीच भीड चेपली गेली होती, मनाशीं त्यानें बरीच उलटसुलट, साधकबाधक प्रमेयें मांडून ' काय हरकत आहे ? एकदां पाहूंच ' हा बेत कायम केला होता. अनुकूल संधि आणि अनुकूल जागा यांची तो वाट पाहत होता.

त्यादिवशीं त्याचे वडील दादरला कुठल्याशा एका खुराड्यांत राहाणाऱ्या मित्राकडे गेले होते. रविवार होता, त्यामुळें विनू मोकळाच होता. संध्याकाळीं पांचचा सुमार असेल

कदाचित्, नेहमींच्या संवयींप्रमाणें कांहींही उद्योग नसला, कीं आईला सतावून सोडून तिला चिडवून स्वतःची करमणूक करून घेण्याचा विनूचा कार्यक्रम व्यवस्थितपणें पार पडत होता.

"आई आम्हाला भूक लागली—" लहान पोराप्रमाणें तोंड करून विनू म्हणाला. "पोळी न् भाजी खा—" "कां, बाबांनी आणलेलीं बिस्किटें दे"—म्हणून म्हणत विनूनें आईच्या डोळ्यांस न जुमानतां कपाटें, फळ्या, बरण्या तपासण्यास प्रारंभ केला. मध्यंतरी एका मांजराला बरणीचें झांकण फेकून मारिलें. आणि बिस्किटांच्या शोधार्थ असतांना वाटेंत शेंगदाणे, काजूच्या बिया, खारका, काय जें सांपडेल तें स्वाहा करण्याचा त्याचा सपाटा चालूंच होता. शेवटीं त्रासून त्याच्या आईनें मुकाट्यानें ट्रंकेंत ठेवलेला डबा त्याच्यापुढें आणून आदळला! विनूनें शांतपणें खाण्याचें काम सुरू केलें.

"तूं बाहेर जाणार आहेस का—? 'कां?' म्हणून विचारूं नकोस. मला आतां जरा धसवाडींत त्या गोडबोल्यांच्या माईकडे जायचें आहे. तुला जायचें असेल, तर किल्ल्या मी घेवून जातें. माझ्याबरोबरच तूंही बाहेर पड नाहीं तर मी संध्याकाळीं येईन, तों पर्यंत तुला घरांत बसलें पाहिजे. तो डबा जरा बाजूला ठेव पाहूं." आईनें म्हटलें. विनू कांहीतरी उत्तर करणार इतक्यांत इंदू दारांत येऊन उभी असलेली त्यानें पाहिली. डबा बाजूला सारून तो चटकन उठला! 'इंदूताई, चोपाटीवर जायचं आहे का आपल्याला आज—?' विनूनें प्रश्न केला.

"नको गडे आज चौपाटी. कोण आज गर्दी असेल तिथें? तिथं जावून समोर उभं राहणाऱ्या लंगड्या-पांगळ्या भिकाऱ्याच्या आंगावरून येणारा वारा खाण्यापेक्षां आज आपण इथंच कांहींतरी कॅरम वगैरे खेळूंया–" इंदू म्हणाली. अर्थात विनूचा बाहेर जाण्याचा त्या दिवशींचा बेत रहित झाला.

आई घराबाहेर पडेपर्यंत विनूच्या मनामध्यें कोणत्याही तऱ्हेचे वावटळी वारे फिरत नव्हते परंतु– "बरण्या, कपाटं धुंडाळूं नकोस–मी चाललें अं–" म्हणून माउली घराबाहेर पडतां क्षणींच विनूच्या डोक्यांत प्रकाश पडला, की इंदूशिवाय घरांत कोणीच नव्हतें. मोठ्या कष्टानें त्यानें तो विचार दाबून टाकण्याचा प्रयत्न केला. त्यानें इंदूकडे पाहिलें. इंदू समोरच्या आरशांत पाहून दोन्ही हातांनीं पुढें येणारे केस मागें सारीत होती. कॅरम खेळण्याचा विनूचा मुळींच बेत नव्हता. चोरट्या मनानें तो इंदूच्या सौंदर्याकडे निरखून पाहत होता. विनूचा काय बेत होता—? छेः! चौदा वर्षांच्या मुलाचा तो असा काय भयंकर बेत असणार?

त्याला इंदूची मोहनी पडली होती, हें निर्विवाद होतें. इंदूकडे तो निरखून पहात असे हेंही सत्य होतें. परंतु चौदा वर्षांच्या मुलाच्या मनांत विषयाचें भूत नाचणें शक्य नाहीं. त्या मार्गावर तो पुढें मागें गेला असता—नाहीं कुणी म्हणावें ? परंतु आज त्याचा तो विचार खास नव्हता. ज्याला इंग्रजीमध्यें Calf Love म्हणून म्हणतात, त्यांतलाच हा एक प्रकार होता. तें एका अननुभवी पोराचें पोरकट प्रेम होतें; यापलीकडे त्याला फारशी किंमत देणें रास्त होणार नाहीं.

" इंदू— " म्हणून खालच्या मानेनें तो म्हणाला. इंदूनें त्याच्याकडे चमकून पाहिलें. त्याचा बदलेला आवाज तिनें तेव्हांच ओळखला. विनू दोन पावलें जवळ आला. आणि—त्यानें डोळे मिटून इंदूच्या ओठांचें—! जिभेला कसलीशीच चव लागली म्हणून त्यानें डाव्या हातानें तोंड पुसून टाकण्याचा प्रयत्न केला. त्याच्या डाव्या हाताला लालसर रंग लागलेला दिसला. त्यानें लाजून इंदूकडे हळूंच चोरून पाहिलें. इंदू त्याच्याकडे पाहून हसत होती. परंतु त्या हास्यांत समाधानाचा पुरावा दिसत नसून एकाद्या मूर्खाकडे आपण ज्या तुच्छतेनें पाहतों ती तुच्छता पूर्णपणें व्यक्त झालेली त्याला दिसली. " विनू, कसा रे तूं इतका मूर्ख ?" इंदू त्याच्या खांद्यावर हात ठेवून म्हणाली. विनूनें झटक्यासरशीं तिचा हात झिडकारून टाकला.

" तूं आपल्या घरीं जा—उद्यां सकाळपर्यंत मी तुला भेटणार नाहीं. मला काय होतें आहे तें सांगतां येत नाहीं. पण मला एकदम कसेसेंच वाटायला लागलें आहे, जा तूं—" विनू तिला दरवाजाच्या दिशेकडे लोटीत म्हणाला. " जाऊं ? अगदीं जाऊंच ? अ ऽऽऽ हा ऽऽऽ हा ! काय पण ? " म्हणून फणकाऱ्यांत वेणीच्या शेपटीचा त्याच्या तोंडावर एक नाजूक प्रहार करून ती हसत निघून गेली.

विनूनें ती गेल्यावर धाडकन दार लावून घेतलें. धांवत जावून नळावर स्वच्छ तोंड धुतलें आणि तो झाल्या प्रकाराचा विचार करीत वडिलांच्या कॉटवर पडून राहिला. एकदम त्याला असें कां वाटायला लागावें ? वास्तविक इंदूला प्रथम खिडकींतून पाहिल्या क्षणापासून तिच्या लाल ओठांचें चुंबन घेण्याचा त्याचा विचार कांहीं नवीन नव्हता. ज्या संधीकरितां तो जिवापाड मेहनत करण्याकरितां मागें सरला नसता, ती संधि त्याला आज विनामूल्य प्राप्त झाली होती. त्या संधीचा त्यानें फायदा घेतला. परंतु त्याला 'कसेसेंच' वाटलें. कल्पनेमध्यें ज्या आनंदाची तो अपेक्षा करीत होता, तो आनंद त्याला सत्यसृष्टींत मुळींच मिळाला नाहीं; तर उलट त्या गोष्टीचा एक प्रकारचा तिरस्कार वाटला. आपण या मुलीच्या नादाला लागलोंच कां, या कोड्याचा आतां त्याला उलगडा पडेना. काय तिच्यांत आप-

णाला दिसून आलें—? लाल ओंठ—! ते तर रंगवलेले होते. नकळत त्याचा हात तोंडापाशीं गेला. जणूं काय त्याची स्मृतिसुद्धां पुसून टाकण्याचा त्याचा निश्चय झाला होता. तिचें चाफेकळीसारखें नाक—? त्यावर चारपांच मुरमाचे फोड त्याला आज स्पष्ट दिसले होते. तिचे भूरभूर उडणारे केस—? सात आठ दिवस पाण्याचा स्पर्श देखील न झाल्यामुळें तेलाचीं पुटेंच्यापुटें चढून त्यांना कसलासा उबट वास आलेला त्याला सहन झाला नाहीं. मग कशामुळें त्याला तिच्याविषयीं ओढ लागली होती—? तिचे दांत मोठे कमानदार होते—परंतु जवळून पाहणाऱ्यांना ते तितकेसे शोभिवंत मुळींच दिसले नसते. दांतांवर पिवळी पुटें चढून हिरवट पिवळसर बनलेल्या दांतांना कोण शहाणा मनुष्य सुंदर म्हणून म्हणणार—? विशेषतः विनूनें आज एक विशेषच गोष्ट पाहिली. ती ही कीं, इंदूच्या डाव्या गालफडाच्या बाजूस एका दांतावर दुसरा एक दांत आलेला त्यानें पाहिला. आणि त्या ठिकाणीं त्याची सौंदर्याची कल्पना थोडीशी बिथरली. सगळ्यांत विशेष तिरस्काराची गोष्ट म्हणजे दुपारीं खाल्लेल्या कच्च्या कांद्यांचा उग्र दर्प इंदूच्या तोंडाला गपकन येत होता! साधारणपणें विनूची कल्पना होती कीं, असा कांहीं वास येणें शक्य नाहीं. परंतु त्याच्या सौंदर्याच्या भावनेला आज इंदूनें जबरदस्त धक्का दिला होता यांत शंका नाहीं! लांबून दिसणारें इंदूचें झगझगीत रूप जवळून पाहिल्यावर विनूच्या मनांत एकदम किळस उत्पन्न झाली. सौंदर्याच्या दर्शनीं देखाव्याआड इतका गलिच्छपणा असूं शकेल, याची त्या अजाण पोराला काय कल्पना असणार—? विनू विचार करूं लागला, कीं असें असतांना हे गोष्टी न् कादंबऱ्या लिहिणारे असें खोटें खोटें कां लिहितात—? अजून त्याला बऱ्याच गोष्टी शिकावयाच्या होत्या.

जगामध्यें सौंदर्याच्या नावांखालीं कसले किळसवाणें प्रकार खपूं शकतात याची त्याला कशी कल्पना येणार—? सौंदर्याचा उदो उदो करणारे कविराज स्वतः कितीसे सुंदर असतात? अन् जगामध्यें अगदीं शंभर नंबरी अस्सल सौंदर्य दिसणार तरी कसें? रमणीच्या मुखांतून केवड्याचा सुवास कसा येणार? तेव्हां, आहे त्या साधन सामुग्रीवरच तुष्ट होऊन, लांबूनच 'अहो रूपम् अहो ध्वनि' अशा रितीनें सौंदर्याची जाहीरातबाजी चाललेली असते, हें एका चौदा वर्षांच्या पोराला कोठून कळणार—? विचार करतां करतां झोपीं गेलेल्या विनूला त्याच्या वडिलांनीं जागें केलें. दुसऱ्या दिवशीं विनू इन्दूच्याबरोबर शाळेंत गेला नाहीं. तो एकटाच शाळेंत गेला. संध्याकाळीं तो मुकाट्यानें हिंदुजिमखान्याच्या बाजूला एकटाच निघून गेला.

चारपांच दिवसांनंतर सहजच वडिलांनीं त्याला प्रश्न केला—" अरे विनू, तूं त्या माधवरावांच्या इन्दूशीं भांडलास कीं काय ? अगदीं फिरकत सुद्धां नाहीं ती आपल्याकडे चार-दोन दिवस. "

" हो. तरी बरें माहिती आहे आपलं बाळ. तेरड्याचे रंग तीन दिवस ! म्हटलं बरं झालं, त्या पोरीच्या नादानं का होईना, करतो आहे अभ्यास–पण बाळ काय— ? अभ्यास करील तर उगीच पासबीस होईल न् मग उगीच आईबापांना वाईट वाटेल.— " त्याची आई म्हणाली. विनूनें मुकाट्यानें ते वाग्बाण ऐकून घेतले. त्याला उत्तर देणें शक्यच नव्हतें. त्यानें एकवार केवळ तुच्छतेच्या दृष्टीनें आईकडे पाहिलें आणि रागानें सपाटून जोरानें समोरच्या वाटींतील कढीचा भुरका मारला.

आज विनूच्या मनाची ही स्थिति आहे, उद्यां कदाचित् ती पालटेल. पालटलीच पाहिजे. कारण आज त्यानें शुद्ध डोळ्यानें सौंदर्याची चिरफाड केली होती. उद्यां त्या दृष्टीवर निराळीच एकादी झांपड येईल—आणि त्या झांपडीच्या योगानें तो आंधळा बनून पुन्हां दुसऱ्या अनेक मुलींच्या मागें लागण्याचा संभव आहे. मुलांचें मन फार कठोर असतें. परंतु पुरुषांच्या मनाला नेहमीं " निर्वाहः प्रतिपन्न वस्तुषु " हा नियम डोळ्या-पुढें ठेवावा लागतो. विनूच्या सध्यांच्या या दृष्टीनें जगांतल्या स्त्रीसौंदर्याची छाननी करूं गेलें, तर एक स्त्री तरी त्याच्या कसोटीला उतरेल कीं नाहीं याची शंकाच आहे ! आणि इंदूच्याही दृष्टीनें एक पुरुष तरी ती कसोटी पास होईल कीं नाहीं, याची शंकाच आहे. परंतु जग चाललें आहे. प्रत्येक रमणीला आपला वल्लभ सुंदर, निर्दोषच दिसतो आणि प्रत्येक वल्लभाला आपली रमणी नेहमींच परमेश्वराच्या अलौकिक बुद्धिमत्तेचें एक जिवंत चालतें बोलतें चित्र अशीच ती दिसत असते.

मात्र या साऱ्या गडबडींत विनूच्या संस्कृत शिक्षणांत देवांनीं असा हा गोंधळ माजवून टाकला होता.

विनूनें दुसऱ्या दिवशीं संस्कृतचें पुस्तक उघडलें. सहजच समोरच्या खिडकींत पाहिलें. पुन्हां इन्दू त्याच्याकडे टक लावून पहात असलेली त्यानें पाहिली. परंतु आज त्यानें तिच्याकडे पूर्णपणें दुर्लक्ष केलें—!

आतां तो बराच शहाणा झाला होता !

---

# देव कीं दैत्य ?

कैक वेळीं मनुष्याच्या आयुष्यांत असे कांहीं चमत्कारिक उद्वेगजनक प्रसंग उद्भवतात, कीं त्या वेळीं एरवीं जीवश्चकंठश्च वाटणारा मित्रसुद्धां शत्रु वाटूं लागतो ! नव्हे शत्रु पुरवला; शत्रु निदान वेळीं-अवेळीं आपल्या दारापाशीं, येऊन ऋणकऱ्यासारखा ठाण मांडून तरी बसत नाहीं. परंतु मित्र– ? नको त्या वेळेला घरीं येईल, बोलण्याची आपली बिलकुल इच्छा नसतांना उगीच कांहीं तरी बाष्कळ विनोद करून तोंडाचा १८० अंशांचा अघळपघळ कोन करील, 'वहिनी, वहिनी' करून लुब्रेपणा करून दोन–चार बशा शंकरपाळे अन् किटलीभर चहा उकळील, कुटलेल्या सुपारीनें बकाणा भरील, अन् वर पुन्हा कोणता सिनेमा पाहण्यालायक आहे, कोणत्या सिनेमांत कोणत्या नटीनें कोणतें काम कसें सुंदर केलें आहे इत्यादि अनावश्यक माहिती मोठ्या उदारपणानें देत सुटेल. काय म्हणावें अशा मित्रांना ! मला वाटतें, अलीकडे कोषांतील 'मित्र' शब्दाची व्याख्या जरा बदलली तर कांहीं बिघडणार नाहीं.

म्हणजे पहा, रविवारचा दिवस. चिरंजीव सौभाग्यवतीला संध्याकाळचा सिनेमा कबूल केल्याकारणानें घरांत अनुकूल वातावरण. दुपारची वेळ. जेवणहि जरा विशेषच झालेलें. माणसानें रविवारीं दुपारींसुद्धां आपल्या बायकोवर थोडेंसें निर्हेतुक प्रेम करूं नये ? त्यालासुद्धां मित्रांची आडकाठी ?

असेंच कांहीं तरी आम्ही बडबडत जरा लवंडलेले होतों. काय बडबडत होतों तें कांहीं आतां मला तितकेंसें आठवत नाहीं. आणि आठवून तरी काय करायचें आहे म्हणा ! नवरा–बायकोचे प्रेमामधले संवाद, हे हवेमधें अलगद सोडून देण्याच्याच योग्यतेचे असतात. त्यांचे त्यांना तरी ते कुठें सुसंबद्धपणें सांगतां येतात ? असाच, कांहीं तरी विवक्षित अटींवर एक जरीचें पातळ कबूल करीत होतों. पुढल्या महिन्याला पंचवीस रुपयांवर उदक सोडण्याच्या विचारांत होतों इतक्यांत—

" अहो बापुसाहेऽऽब ! " म्हणून मन्याची पल्लेदार आरोळी कानांवर येऊन आदळली. आणि एकटा तरी होता का ? बरोबर सौभाग्यवती मंदाकिनीबाईसाहेब अन् त्यांची भगिनी सुनंदा. सहकुटुंब सहपरिवार मन्या आज मला छळायला आला होता !

" ऊठ ! तो राक्षस, दैत्य आला आहे ! आधीं स्टोवर पांच-पंचवीस कप पाणी ठेवून दे !" मी म्हणालों.

" काय मेला त्रास आहे !" अशा मुद्रेनें ती उठून बसली.

" कपाळाला आंठ्या घालून काय होणार ? त्या समाजस्वास्थ्य-विध्वंसकाला त्या दिसतील तर ना ! फौजफाटासुद्धां बरोबर घेऊन आला आहे—" मी खिडकींतून बाहेर पहात म्हणालों.

मोठ्या हार्दिकपणानें मी मन्याचें स्वागत केलें.

" आलों बुवा एकदांचा. शीरसलामत, सुखरूप येऊन पोंहोचलों !" मन्या तक्क्याला टेकून उद्गारला.

" बरं झालं !" म्हणून मींहि किंचित् हसून उत्तर केलें.

" थट्टा नाहीं, बापू ! सद्‌गृहस्था, रविवारीं भर दुपारीं उन्हाच्या वेळेला, बरोबर बायकोचं लचांड अन् भरीला भर तिची बहीण या सगळ्यांना घेऊन दीड मैल रस्ता तुडवीत येणं, अन् तेंहि डोकं ठिकाणावर ठेवून— ! "

" खरंच, धाडसच आहे बुवा हें—" मी हसत म्हणालों.

मन्यानें माझें बोलणें ऐकलें न ऐकल्यासारखें केलें. ' हुश्श ' करीत तो सुपारी कातरूं लागला. " मन्या, आज रविवारींच तुझी संक्रान्त इकडे कोणीकडे ? रविवारीं तूं बहुतेक

दुपारींच मच्छरदाणीचे पडदे सोडून या वेळेस घोरत पडलेला सांपडायचा, अन् हें एवढं बाहेर पडण्याचं धाडस तुझ्याच्यानं कसं करवलं ? '' मी म्हणालों.

" अरे, तें कांहीं विचारूं नकोस— " मन्या म्हणाला.

" वाः ! खासा न्याय ! बहाद्दरा, एकाद्या दावेदारासारखा दुपारीं येऊन दुसऱ्याला छळ-तोस, अन् पुन्हां कां आला होतास ही चौकशीसुद्धां करण्याची चोरी ! '' मी हसत म्हणालों.

" माफ कीजिये ! आज तुझ्या प्रेमसमाधीचा जर माझ्या हातून भंग झाला असेल तर माफ कर. पण असं पहा—सोमवारपासून शनिवारीं संध्याकाळीं ६ वाजेपर्यंत दोन अन् सतरा एकोणीस, अन् पांच चोवीस, तीन सत्तावीस इतक्या रम्य तऱ्हेनं आयुष्य कंठणाऱ्या प्राण्याला रविवारीं तरी जरा विसांवा नको कां मिळायला ? नुसतं मी सकाळीं सहज म्हणालों, कीं मनुष्य श्रीमंत असो वा गरीब असो, तो आपलं मनुष्यत्व कधींहि विसरणार नाहीं. तशी संधि मिळाली पाहिजे, कीं आपोआप मनुष्याचं मनुष्यत्व प्रकट होतं. मनुष्य एरवीं कितीहि कठोर दिसला तरी त्यालाहि हृदय म्हणून कांहीं तरी परमेश्वरानं दिलेलंच आहे कीं नाहीं—? " मन्या म्हणाला.

" तुझ्या बाबतींत मात्र तो करुणाघन प्रभु विसरलेला दिसतो आहे—" मी म्हणालों.

इतक्यांत माजघराच्या दारांत निशाणें फडफडूं लागलीं आणि अस्फुटशा हास्यलहरी बाहेर येऊन आदळूं लागल्या. मी सहज मागें पाहिलें. सौ. मंदाकिनी दरवाजांत उभी होती." भाउजी, आज सकाळपासून हें वेड डोक्यांत शिरलं आहे. म्हणे मनुष्याचं मनु-ष्यत्त्व ! कसलं डोंबलाचं मनुष्यत्त्व घेऊन बसलेत कुणास ठाऊक ! जो कांहीं त्या गरि-बांचा पुळका आला आहे विचारूं नका. काल दुकानांतून कपबशा आणल्या, त्यांत चार आणे खोटे घेऊन आले. आपण फसल्याचं कबूल मात्र करणं नाहीं; तर म्हणायचं कसं तर 'जाऊं दे ! चुकून बिचाऱ्यानं खोटं दिलं असेल नाणं ! त्याच्याजवळ तरी तें नाणं कसं आलं ? त्याला तरी आपल्यासारख्यानंच दिलं असेल ना ?' मोठे धर्माचे अवतार पडले कीं नाहीं ! परत नेऊन द्यावं म्हटलं तर नाहीं ! अन् सकाळपासून हृदयाच्या गप्पा चालल्या आहेत. " पतिराजावर जणूं काय सूड उगविण्याच्या ईर्षेनेंच मंदाकिनीनें हा हल्ला चढवला होता.

" बघ बापू, आतां आलं का लक्षांत मी इकडे कां आलों तें ? " मन्यानें खिन्नपणें हसून म्हटलें. मीं ताबडतोब ओळखलें. मन्याचा गाफीलपणा अन् मंदाकिनीचा व्यवहारी

चोखपणा. मन्या म्हणजे साऱ्या मुलखाचा गाफील, आणि मौज ही, कीं आपण मोठे व्यवहारी आहोंत हें अट्टाहासानें दुसऱ्यास पटवून देण्याचा त्याचा हव्यास दांडगा होता. मंदाकिनीला आपल्या यजमानाच्या या दुर्बलतेची पूर्ण जाणीव होती. मनुष्याचा खरा मित्र कोण असेल तो असो; परंतु त्याच्या नाजुक जागा पद्धतशीरपणें हेरून काढून त्यांवर वेळोवेळीं टोचे मारणारी त्याची सहचरी मात्र तो खास नाहीं. किंवा कदाचित् केसानें गळा कापणारा म्हणून म्हणतात तो मित्राचा प्रकार म्हणजे स्वतःची सहचरीच तर नसेल ना ? कांहीं का असेना. मीं विचार केला, ऐनवेळीं आपण आपल्या दोस्ताला मदत केली पाहिजे. मी पटकन् उठलों.

" अहो कमलाबाई, चहा काय म्हणतो आहे ? "

आम्ही सर्वजण चहाची किटली मध्यें ठेवून बसलों. चहापान सुरू होतें. मन्या एखाद्या गरीब गाईसारखा मान खालीं घालून मुकाट्यानें वशींतल्या चहाचें निरीक्षण करीत होता. मंदाकिनी एखाद्या मारक्या गाईसारखी मध्येंच खांकरून त्याला डिवचूं पहात होती. सुनंदा आपल्या मेव्हण्याची आणखी काय मौज होणार याचा बहुशः विचार करीत असावी. कमल मात्र एखाद्या सुगृहिणीप्रमाणें मधून मधून शंकरपाळे पुरविण्याचें काम करीत होती. बराच वेळ कोणी कांहींच बोललें नाहीं. आणि आतां मध्यें कोणीच बोलणार नाहीं अशी आशाहि पण वाटूं लागली होती. मन्यावर मी प्रथम रागावलों होतों, तरी आतां मात्र त्याची मला दया वाटूं लागली. लहानपणापासून मन्याची हीच स्थिति होती. शाळेंत असतांना एक दिवस कांहीं असा गेला नाहीं, कीं त्या दिवशीं मन्याच्या डोक्यावरची टोपी कोणी उडवली नव्हती. लहानपणीं 'आपडी थापडी गुळाची पापडी' करतांना मीच त्याचे कान कितीतरी जोरानें खेचीत असे; परंतु हा स्थितप्रज्ञाप्रमाणें सर्व कांहीं मुकाट सहन करीत असे. मोठेपणीं युनिव्हर्सिटीनें निर्दयपणानें त्याला तीनदां परत येण्यास सांगितलें आणि हें बाळ तितक्यांदा परत गेलें, परंतु तोंडांतून 'ब्र' नाहीं ! ऑफिसमध्यें मन्या हा आदर्श कारकून समजला जात असे. दोन कानांवर जितके टांक अन् पेन्सिली ठेवतां येणें शक्य आहे तितके ठेवून तो काम करीत असे. साहेबापासून तों पट्टेवाल्यापर्यंत सर्वजण त्याची थट्टा करण्याची संधि सहसा वाया घालवीत नसत. परंतु त्यानें उलट उत्तर कधींच केलें नाहीं. आतां त्याच्या लग्नाला पांच वर्षें झालीं असतील. घरांत बायको आणि वर मेहुणी—दोघीहि मिळून बिच्याऱ्याला रविवारीं सुद्धां शांतपणें पडूं देत नाहींत म्हणजे काय

जुलूम आहे ! मन्याचें तत्त्वज्ञान काय चुकलें होतें ? मनुष्यप्राणी चुकीस पात्र आहे. एकादे वेळेस सकृद्दर्शनीं अप्रामाणिकपणासारखी एकादी कृति मनुष्याच्या हातून यदृच्छेनें घडून आली म्हणून कांहीं सारी मनुष्यजात बिलंदर ठरत नाहीं. फार लांब कशाला, आमच्या ऑफिस-मधल्या पट्टेवाल्याचीच गोष्ट घ्या ना ! मला एकदम ती गोष्ट आठवली. मीं समोर पाहिलें. मंदाकिनी गालांतल्या गालांत मन्याकडे पाहून हसत होती. मीं बोलण्यास प्रारंभ केला—

" मंदाकिनीवहिनी, मन्याच्या म्हणण्यांत पुष्कळच तथ्य आहे—" मी म्हणालों. आश्चर्यानें मंदाकिनीनें भुवया वर चढवून माझ्याकडे पाहिलें. मन्या जरा सावरून बसला.

" त्याचं असं पहा, मन्या जें म्हणाला त्यांत पुष्कळच सत्यतेचा भाग आहे. मनुष्यप्राणी तुम्ही समजतां तितका 'डाकू मन्सूर' नाहीं. त्यालाहि सहृदयता, प्रामाणिकपणा इत्यादि गोष्टी माहीत असतातच. आमच्या ऑफिसांतल्या पट्टेवाल्याचीच एक गोष्ट मी तुम्हांला सांगतों—

त्याचं नांव हमीदखान. निदान तूर्त तरी आम्ही त्याला तसं म्हणतों. "

" दादर भागांतल्या कुठल्यातरी फिल्म कंपनींतला विनोदी नट असावा हा बहुतेक. " मंदाकिनी मध्येंच हसत म्हणाली.

" नाहीं. इतकी नव्हती बिचाऱ्याची हलाखीची स्थिति ! तो एक अब्रुदार मेहेतर होता. " मी म्हणालों.

" इश्श " म्हणून म्हणत स्त्रीवर्गानें नाकास पदर लावले. मन्यानें 'आ' पसरला.

" झालं ! गोष्टीमध्यें सुद्धां मेहेतर येतां कामा नये ? आणि इकडे व्याख्यान देतांना मात्र अस्पृश्यता घालवा, खेड्यांत चला, अन् खेडीं सुधारा म्हणून गप्पा मारायच्या ! गोष्टींत मेहेतर आला, कीं मात्र नाकाला पदर ! सदान्‌कदा तुम्हांला सेकंड क्लासांत हिंडणाऱ्या नायिका अन् त्यांचे मनोहारी विलास कुठले आणायचे ? अन् ललित कथांमधून तेंहि शक्य आहे; पण खऱ्या घडलेल्या गोष्टींत त्या कोठून येणार ? " मी म्हणालों.

" हो ! पण बाबा, हा तुझा कोण हळीदखान का हमीरखान याची काय तुला माहिती ? " मन्या आश्चर्यानें म्हणाला.

" त्यानंच मला एके दिवशीं ही कहाणी सांगितली. आमच्या हपिसांत तो हल्लीं पट्टेवाला म्हणून आहे. पूर्वी तो मेहेतर होता इतकंच नव्हे तर फावल्या वेळांत जोडधंदा म्हणून

घरफोडीचाहि धंदा तो करीत असे—सुदैवानें तो पोलिसांना कधींच सांपडला नाहीं. आणि एका गोष्टीनंतर त्याचं त्यालाच काय वाटलं कुणास ठाऊक तो चांगल्या मार्गाला लागला अन् हल्लीं तो आमच्या हपिसांत आहे—”

“ म्हणजे मधून मधून कागदपत्र घेऊन आपल्याकडे येतो तोच का ? ” कमलनें आश्चर्यानें प्रश्न केला. मी होकारार्थी मान करतांच कमलनें एकदमच, कां कोण जाणे, ‘ अस्सं ’ म्हणून म्हटलें.

“ आतां तो अस्पृश्य नाहीं. आमच्या ऑफिसमध्यें आल्यापासून त्यानें लाल पट्टा चढवला, दाढी वाढवली अन् हमीदखान म्हणून नांव धारण केलें. तेव्हांपासून त्याला जातच उरली नाहीं. तर त्याची पहिली हकीकत अशी. प्रथम तो त्याच्या गांवीं म्हणजे जळगांवला मेहेतरचें काम करीत असे. घरांत चार लहान लहान मुलें आणि बायको. प्रथम प्रथम त्याला बायकोची चांगली मदत होत असे. त्याला स्वतःला १३ रुपये व बायकोला ९ रुपये मिळून बावीस रुपयांत संसार करून तो अब्रूनें दिवस ढकलीत असे. इतकेंच नव्हे तर सणासुदीला लाल आलवाणचें कापड पोराबाळांकरितां खरेदी करून-सुद्धां चार पैसे त्यानें गांठीं पाडले होते. रोज पहांटे चार तुकड्यांवर सुखानें न्याहारी करून पोराबाळांची व्यवस्था लावून नवरा-बायको कामाला जात. बायको १०-११ ला घरीं परत येई. घर कसलें ? राकेल तेलाच्या गंजलेल्या पत्र्यांचे तुकडे—त्यांचें छप्पर. त्यावर चारदोन वजनदार दगड अन् आंतल्या बाजूला चार माणसांना दाटीनें निजतां येईल येवढी जागा. तीन दगडांची चूल, पण ती खोपटाबाहेरच. लहान पोराला दोरीचा झोका. तो निंबाच्या झाडाला टांगलेला. नवरा मात्र गाडी शहराबाहेर मुद्दाम खोदलेल्या खळग्यांत रिकामी करून दुपारीं १-१॥ ला परत येई. अन् मग मात्र हें कुटुंब सुखानें चार घांस खाई. पोराबाळांशीं थट्टामस्करी करीत दिवस कसा बुडे हें त्यांचें त्यांनाच कळत नसे. कांठतुटक्या अल्युमिनीअमच्या भांड्यांत थोडीशी खिचडी करायची, मातीच्या भांड्यांत कसलें तरी कोरड्यास करायचें, आणि एकुलत्या एक वाटीने साऱ्यांनीं पाणी प्यायचें. परंतु असल्या आयुष्यांतसुद्धां त्यांना भरपूर सुख होत होतें.

परंतु सर्व दिवस सारखे नसतात. हळूहळू हमीदच्या बायकोला बारीक ताप येऊं लागला. कामांत तिचे खाडे पडूं लागले. आणि तिच्या आजारीपणामुळें हमीदच्या कामांत खाडे पडूं लागले. दोघांच्याहि उत्पन्नांत खोट येऊं लागली. परंतु त्यांचेंहि

त्यांनीं कांहीं मानलें नाहीं. हमीद जरी मेहेतर होता तरी गांवांतल्या एका बामन वैद्यावर त्याची फार श्रद्धा बसली होती. बायकोच्या आजारांत त्यानें त्या बामनाचें औषध सुरू केलें. परंतु नाडीपरीक्षा किंवा रोगचिकित्सा होण्याकरितां इतर प्रकारची कोणतीहि परीक्षा करण्यास वैद्यबुवा तयार नसत. ते तिला दुरूनच दवाखान्याबाहेरूनच पाहत अन् कसलें तरी चूर्ण देत. अर्थात् व्हायचा तोच प्रकार झाला. हळूहळू त्याच्या बायकोनें पूर्णपणें अंथरूण धरण्यास सुरुवात केली. सैंपाक करतां येईना, अन्न गोड लागेना, शक्ति जायला लागली, अन् पायहि आतां लटपटूं लागले. बिचारा हमीद ! दोन वर्षें त्यानें अशींच काढलीं. पोराबाळांचा आई-बाप दोन्हीहि तोच होता. तोच आतां अन्न शिजवूं लागला. तोच बाहेरचा कामधंदा करी, तोच घरांतील गाडगीमडकीं धुई, अन् तोच गांवच्या नाल्यांतलें पाणी अन् मीठ मिरची विकत आणी. कंटाळून गेला बिचारा. मेहेतर झाला म्हणून काय झालें ? त्यालाहि तारुण्याच्या उसळी जाणवणारच ! घरांत बायको असून नसून सारखीच उलट तिचा त्याला उघड उघड त्रास होत असे. परंतु एका शब्दानें त्यानें तिला दुखवलें नाहीं, कीं कधींहि त्यानें तिच्याशीं कोणत्याहि तऱ्हेची प्रतारणा केली नाहीं. त्याच्याच जातीच्या इतर तरुणी तारुण्यानें मुसमुसलेल्या पाहून त्याचें मन किंचित् हेलकावे खाई, नाहीं असें नाहीं; परंतु यापलीकडे त्यानें आपल्या मनास उच्छृंखल होऊं दिलें नाहीं. पूर्ववत् तो आपलीं सर्व कामें करी. आतां आदा रक्कम कमी असून खर्चाचें प्रमाण जास्त होतें. क्वचित् प्रसंगीं त्याला अगदीं नको हा जीव असें होऊन जात असे; परंतु मुलांच्याकडे पाहून तो काळ कंठीत असे.

दुर्दैवाची परमावधि यापुढेंच होणार होती. मेहेतर लोकांचे वरचे साहेब म्हणजे सॅनिटरी इन्स्पेक्टर लोक. पूर्वींचा त्याचा साहेब बदलून आतां नवीन साहेब त्याच्या जागेवर आला होता व येथूनच हमीदचें दुर्दैव पुरतें ओढवलें. पूर्वींचा साहेब त्याला कमी त्रास देत असे असें मुळींच नव्हतें. आईमाई उद्धरल्याशिवाय एक दिवस जात नसे. परंतु एवढेंच कीं, जरी त्यानें हमीदला वाटेल तितकें बोलून घेतलें तरी त्यानें त्याचा खाडा फारसा मांडला नाहीं. हमीदच्याच शब्दांत सांगायचें म्हणजे तो 'पाठीवर मारी, पोटावर मारीत नसे.' नवीन आलेला साहेब नुकताच मर्मईहून आला होता. परीक्षा पास झालेला, त्यांत पुन्हां पांच रुपये पगार जास्त असलेला. त्यानें हमीदच्या कामाची पद्धति पाहिली आणि तेव्हांपासून हमीदची व त्याची चांगलीच जुंपली.

हमीदला रोज ताकीद मिळूं लागली. हमीदचे खाडे पडूं लागले. व शेवटीं महिनाअखेर नोकरी बंद झाल्याचा हुकूम त्याच्या हातांत आला.

घरांत बायको आजारी, धड मरतहि नाहीं अन् धड जगतहि नाहीं अशी तिची स्थिति. सर्वांत थोरला मुलगा ८ वर्षांचा आणि दहापंधरा दिवसांनीं नोकरीहि सुटलेली. काय करणार मनुष्य ? आणि अगदीं याच वेळेला हमीदच्या डोक्यांत एक भयंकर विचार आला. इतके दिवस अब्रूनें तो राहात असे, आतां त्यानें बेअब्रूनें दिवस काढायचें ठरविलें.

रोज सकाळीं तो आपल्या ८ व ६ वर्षांच्या दोन मुलांना उचलेगिरी व खिसेकापू या दोन धंद्यांचें यथायोग्य ज्ञान मिळविण्यासाठीं दुसऱ्या एका प्रसिद्ध मेहतराकडे पाठवूं लागला. व त्यानेंहि लहान सहान चोऱ्या कशा कराव्यात व पचवाव्यात हें शिकविण्यास आरंभ केला. प्रथम त्यानें आपल्या बायकोस आपली नोकरी सुटल्याचें सांगितले नाहीं व आपल्या नवीन धंद्याबद्दल तो कांहीं बोलला नाहीं परंतु पंधरावीस दिवसांत गुरूच्या हाताखालीं तयार झालेल्या त्या बालशिष्यांनीं जेव्हां हातरुमाल, चाकू, दोन आणे किंमतीचें फौंटनपेन इत्यादि वस्तु आणण्यास सुरवात केली तेव्हां मात्र तिला संशय आला. एके दिवशीं हमीद रात्रीचा बाहेर गेला व बरोबर एक वाजतां परत आला. घामानें थबथबलेला त्याचा चेहरा तिनें मिणमिणत्या दिव्याच्या प्रकाशांत पाहिला. त्याचा तो भेदरलेला चेहरा पाहून तिचा संशय दृढ झाला. त्यानें तिच्या खोदखोदून विचारलेल्या प्रश्नांस प्रथम उडवाउडवीचीं उत्तरें देऊन पाहिलीं. पुढें नाइलाज म्हणून त्यानें सर्व कांहीं तिला सांगितलें. केवळ आपल्यामुळें पोरांना व नवऱ्याला जीव धोक्यांत घालावा लागतो ! न जाणो, कदाचित् पोलिसाचे धक्केहि व फटकेहि खावे लागतील; अन् साऱ्या जातींत छीः थू होईल ती निराळीच. या विचारानें बिचारीला जास्तच वाईट वाटलें. बरें, चोरी करूं नका म्हणून तरी कोणत्या तोंडानें सांगायचें ? नाहीं चोरी करायची तर काय माती खायची ?

तिला हें पूर्णपणें समजत होतें कीं प्रामाणिकपणानें रहावें हा उत्तम मार्ग. आणि हें कोणास समजत नाहीं ? परंतु जीव जातो आहे, सारें जग निर्दयपणानें हंसतें आहे, तरीसुद्धां आपण केवळ प्रामाणिकपणा हा गुण आहे म्हणूनच प्रामाणिक राहायचें हेंहि तिला पसंत नव्हतें. तिच्यावर जर पाळी आली असती तर तिनेंहि चोरी करायला मागेंपुढें पाहिलें नसतें. परंतु त्यांत धोका आहे हें तिला समजत होतें. आणि रोज रात्रीं आपण आपली शेवटचीच भेट या दृष्टीनें धंद्यानिमित्त बाहेर पडणाऱ्या नवऱ्याकडे पहायचें आणि तो परत

येईपर्यंत रात्र अंथरुणावर तळमळत काढायची हा विचार तिला चैन पडूं देत नसे. ती कांहींच बोलत नसे. परंतु परत आलेल्या नवऱ्याचे बाहु आपल्या अस्थिपंजर हातानें ती चांचपून पाही आणि जणुं काय मनाची खात्री करून घेई कीं हा खरोखरीच परत आला आहे.

रोज रात्रीं अर्थातच हा धंदा चालत नसे. आणि प्राप्तीहि कांहीं विशेष होत नसे. आतांपर्यंत सुमारें २५ रुपये रोख हमीदनें पळविले होते व मुलांनीं सुमारें ५–१० रुपये किंमतीचा माल आणला होता. परंतु ती रक्कम अशी किती दिवस पुरणार ?

हमीदच्या गुरूनें एके दिवशीं त्याला मुद्दाम बोलवून घेतलें. हमीद त्या दिवशीं घरीं आला तेव्हां हातोडी, गिरमीट व एक लांब सुरा इत्यादि वस्तु त्यानें धोतरांत लपवून आणलेल्या त्याच्या बायकोस दिसल्या. तिच्या छातींत धस्स् झालें.

दुसऱ्या दिवशीं हमीद सकाळींच घराबाहेर पडला, तो संध्याकाळीं घरीं आला. नेहमीं-प्रमाणें त्यानें जोंधळ्याच्या पिठाच्या भाकऱ्या थापल्या. काय जोंधळे होते ते पण ! कुत्र्या-लासुद्धां घालण्याच्या लायकीचें तें पीठ नव्हतें. पोरकिडे तर नुसते बुजबुजाट करून सैरावैरा धांवत होते. परंतु हमीद दुसऱ्याच कसल्या तरी विवंचनेंत गर्क असल्यामुळें त्याकडे त्याचें लक्षच नव्हतें. पाण्याच्या घोटाबरोबर भाकरीचे तुकडे सर्वांनीं गिळले. मुलें निजलीं. एरंडेल तेलाची पणती विझून गेली. हमीद हत्यारें अंधारांत चांचपूं लागला. बाहेर अंधार मी म्हणत होता.

हत्यारें गोळा करून तो बाहेर पडणार इतक्यांत त्याला बायकोचा हुंदका ऐकूं आला. तो तिच्याजवळ गेला. केसांच्या जटांवरून त्यानें हात फिरवला व डोळ्याचें पाणी त्यानें हातानें पुसून टाकलें. दोघांपैकीं कोणीच कांहीं बोललें नाहीं. विषयच एवढा गंभीर होता कीं न बोलतांहि त्याची गंभीरता स्पष्टपणें दोघांनाहि जाणवत होती. दोघांनाहि येणाऱ्या प्रसंगाची तीव्र जाणीव होती. बोलणार कोण आणि काय बोलणार ? मुकाट्यानें हमीद खालीं वांकला आणि तिच्या गालाशीं गाल लावून कांहीं वेळ तसाच ओणवा उभा राहिला. तिनेंहि त्याचें डोकें आपल्या निःसत्त्व हातानें दाबून धरलें. नंतर तो ' अच्छा मा ' म्हणून म्हणत जड अंतःकरणानें त्या खोपटाबाहेर पडला.

आजचें त्याचें काम जोखमीचें होतें. ज्या साहेबानें त्याला बडतर्फीचा हुकूम दाखवून घरीं बसवलें होतें त्याच्याच घरावर आज तो हल्ला करणार होता. साहेबमजकूर कामानिमित्त सहकुटुंब सकाळींच मुंबईला रवाना झाले होते. सबंध दिवसभर हमीद घराची टेहेळणी करीत होता. त्याच्या गुरूनें त्याला आज हें काम एकट्यानेंच करण्यास सांगितलें होतें.

हमीद लपत छपत, दबा धरीत, किंवा कांहीं वेळ सामान्य माणसाप्रमाणें चालत त्या *बंगल्यापासून सुमारें शंभर यार्ड अंतरावर येऊन पोहोंचला. त्याचें हृदय धडधड उडूं लागलें. पुन्हां नीट विचार करून परत फिरावें हाहि एक विचार त्याच्या मनांत डोकावूं लागला. परंतु तो भ्याड नव्हता. त्यानें आपल्या थरथर कांपणाऱ्या हातानें छाती दाबून धरली. जणुं काय तो आपल्या हृदयाची धडधड बंद करीत होता !

मागच्या बाजूनें त्यानें आसपास कोणी नाहीं असें पाहून फाटकावरून उडी मारली. तीरासारखा धांवत जाऊन तो एका छपराखालीं दडला. नंतर त्यानें मागील दरवाजाला गिरमिट चालवून भोकें पाडलीं, व आंतील कडी मोकळी करून घेतली. साहेबांच्या बंगल्यावर तो यापूर्वी पुष्कळदां त्यांच्या पायां पडण्याकरतां आला होता. आणि आतां—? तशा स्थितींतहि त्याला एक प्रकारचा आसुरी आनंद झाला. बैठकीच्या रोखानें त्यानें पाऊल टाकलें, आणि—

चक्क घोरण्याचा आवाज त्यानें ऐकला !

तो थक्कच झाला ! बंगल्यांत कोणीहि असणार नाहीं ही त्याची खात्री होती. आणि हें कोण ? त्यानें कानोसा घेतला ! हातांतल्या बॅटरीच्या साहाय्यानें त्यानें आसपास पाहिलें. ती निजावयाची खोली होती हें तेथें असणाऱ्या खाटांवरून त्यानें ताडलें. व कोपऱ्यांतल्या एका खाटेवर एक तरुण मराठा बाई शान्तपणें झोपली होती. मोलकरणीच्या ताब्यांत घर देऊन मालक गेले असावेत हें स्पष्टच दिसत होतें. आतां काय करणार ?

विचार करण्यास वेळ नव्हता. डोक्याला गुंडाळलेलें फडकें त्यानें झटकन तिच्या तोंडावर टाकलें. दुर्दैवानें फडकें टाकतांना त्याचा पाय तिच्या पायाला लागला, ती बाई जागी झाली. त्यानें तिच्यापुढें मुकाट्यानें सुरी दाखवली. इतक्या झटपट या गोष्टी घडून आल्या कीं त्या दोघांनाहि विचार करण्यास वेळ मिळेना.

" भाई, तूं माझ्या भावासारखा हैस ! कोन रे बाबा तूं ? मला कशापाई दटावतुस ?—" तिनें धीर करून त्याच्याकडे पाहात म्हटलें.

" मी तुला दटावत नाहीं अन् कांहीं नाहीं. तूं त्या खोलीत जा. तुझं तोंड मीं बांधतों, अन् खोलीचं दार लावून घेतों. तूं मला माझ्या बहिणीसारखी आहेस—तुला मी कांहीं करीत नाहीं. " हमीद म्हणाला.

एकाएकीं ती ताडकन् उठून म्हणाली—

" बाबा—नग रे नग. घरीं माझा म्हातारा हैे—अक्शी तापानं बीमार है. त्याच्या पायीं तर या नटवीच्या घरीं राबाया आले. आतां तूं घर समद शाप निर्मळ करशील तर त्यो साहेब आन् नटवी दोघंबी मला डगलेवाल्याकड देत्याल; अन् माझा म्हातारा अन् माझीं चार लेकरें—कुणाच्या मुड्यावर घालूं ?—नग र बाप्पा ! तुझ्या पाया पडत्ये. कोन बी हैस; माझा बापच हैस. लेकीला सुखानं दीस काढूंद्ये ! " म्हणून म्हणत खरोखरीच तिनें त्याच्या पायांवर लोळण घेतली.

संस्कृतीचा प्रभाव किती विलक्षण. एक मराठ्याची बाई आपल्या मेहतराच्या—पाया पडते हें पाहिल्याबरोबर त्याला कसेंसेंच झालें. तो चटकन मागें सरला. हातांतली सुरी त्यानें आपल्या कमरेला पुन्हां खोवून ठेवली. त्याचें मन द्विधा झालें. काय करावें ?

" नग रे बाबा ! तुझ्यापाशीं जीभ हंसडून परान देत्ये पन हतली एक जिनसबी घेऊं नकोस ! त्यो खवीस लई दोड है. अन् ती सटवी पन अक्षी त्योच फर्मा ! बाबा रे ! मला भाजून खात्याल. अन् म्या अन् माझ्या म्हाताऱ्यानंच ह्ये समदं कयेलं म्हनत्याल. अन् नग र मानसांना असा मानसांतनं उठवूस ! तूं तर काय मरद हैस ! कुठं बी चार पाट्या टाकशील तर लेकरांच प्वाट भरशील ! कशाला नरकांत हात डुबवतोस दे डावानो ? ह्ये बघ ! तुझीबी अस्तुरी घरी असल ना ! माझा परान या दोडांनीं घ्येतला तर तिला ग्वाड लागंल ? " तिच्या स्वरांत मूर्तिमंत कारुण्य होतें,

हमीद खरोखरीच विचारांत पडला ! काय करावें ? मनुष्याचें मनुष्यत्व हळूहळू जागृत होऊं लागलें. एका दुष्ट माणसाचा सूड उगवण्याकरतां दुसऱ्याच गरीब गाईची व तिच्यावर अवलंबून असणाऱ्या आणखी कांहीं जीवांची होळी पेटवूं का ? बराच वेळ तो विचार करीत उभा राहिला—!

आणि तो रिक्त हस्तानेंच त्या रात्रीं आपल्या मकाणांत शिरला. झालेला प्रकार त्यानें बायकोस सांगितला ! त्यांच्या गरीबीमुळें त्यांच्या खोपटांत त्या रात्रीं दिवा नव्हता म्हणून, नाहीं तर त्यांच्या डोळ्यांतील एक प्रकारची समाधानाची चमक खात्रीनें दिसून आली असती—" मी आपली लांबलचक कहाणी संपवून श्रोत्यांच्यावर काय परिणाम झाला तें पाहूं लागलों. मन्या खुषींत दिसला, हमीदखाननें सांगितलेली कहाणी मी शक्य तितक्या रीतीनें खुलवून सांगितली होती. सर्वत्रांवर योग्य तोच परिणाम दिसून येत होता.

फक्त कमलच्या डोळ्यांत मात्र निराळेंच तेज चमकत होतें. माझी गोष्ट कुठें चुकली कीं काय असा भ्रम मला पडला. मी घाईघाईनें कहाणी पुरी केली—

" पुढें दुसऱ्याच दिवशीं रात्रीं हमीदनें तेथून चंबुगबाळें उचललें आणि आतां तो येथें पुण्यांत अब्रूनें दिवस काढीत आहे. त्याची बायको बिचारी वारली; परंतु आतां लवकरच तो— "

" पुढचं काय करायचं आहे म्हणा ! " कमल हंसून म्हणाली.

" म्हणजे ? " मी जरा साशंकपणें म्हणालों.

" म्हणजे काय ? आपण म्हणायचं त्याप्रमाणं त्यानं नीट सुधारण्याचा प्रयत्न केला असेल. परंतु चट लागलेलं मन त्याला स्वस्थ बसूं देणार नाहीं ! " कमल म्हणाली.

" तुझं आपलं कांहीं तरी ! " मी म्हणालों.

" कांहीं तरीच कसं ? मी त्याला डोळ्यांनीं पाहिलं आहे. आपण खालीं कुणाशीं तरी बोलत असायचं होतं. कसला तरी लखोटा घेऊन तो वरतीं आला. मी आंतच होतें. आंतूनच मी त्याला टेबलावर ठेवण्यास सांगितलं ! इतक्यांत मला काय बुद्धि झाली कुणास ठाऊक ! सहज मी बाहेर आलें अन् पाहतें तों आपल्या टेबलावरचं पैशाचं पाकीट तो स्वतःच्या खिशांत घालीत होता ! मला पाहिल्यावर दचकला अन् पाया पडला ! मलाहि त्याची दया आली अन् आपल्याला मी सांगितलं नाहीं—" कमल म्हणाली.

" म्हणजे पुन्हा माझंच म्हणणं खरं ! त्याला हृदय कुठं आहे ? प्रामाणिकपणा कुठं आहे ? " मंदाकिनी मन्याकडे पाहून म्हणाली.

" नाहीं—! मंदाताई, तसं नाहीं. भाउजींचंही खरं आहे. अन् तुमचंहि खरं आहे. मनुष्यप्राणी सर्वगुणसंपन्न असा कधींच नाहीं. आणि त्याचप्रमाणें सर्व दुर्गुणांचा मूर्तिमंत पुतळाहि पण तो नाहीं. मनुष्यप्राणी म्हणजे गुणावगुणांचं एक चमत्कारिक कडबोळं आहे. त्यांत श्रीमंत व गरीब हा भेदच नाहीं. मनुष्यप्राणी हा सरळमार्गी प्राणी आहे. कैक वेळेला भावनाप्रधान होऊन देवदूतांच्या प्रकाशांत चमकतो तर कैक वेळीं दैत्यांचा दास बनतो. मूलतः मनुष्यप्राणी दुर्जनहि नाहीं अन् सज्जनहि नाहीं ! मी म्हणतें तें पटतंय का ?" शेवटचें वाक्य कमलनें मला उद्देशून म्हटलें होतें. मला त्या वेळीं कांहींच उत्तर न सुचल्यामुळें मी गप्पच बसलों.

---

# बायकांचा क्लब

ज्याप्रमाणें मथुरेच्या चोऱ्यांनीं यमुनेच्या वाळवंटांत हक्कानें मस्ती करावी त्याप्रमाणें मुंबईच्या कॉलेजांतून पदवी धारण केलेला सुशिक्षित गुंड मुंबईतल्या हायस्कुलांच्या वाळवंटांतून मास्तरकीचा धांगडधिंगा घालूं लागतो—एक प्रकारें हा आपला हक्कच आहे ही त्याची बालंबाल खात्री असते. मुंबईत शिकून मुंबईतच शिकवावयाचें नाहीं, तर काय चौपाटीवर गंडेऱ्या विकावयाच्या ? हा त्याचा सिधा सिधा सवाल असतो. मुंबईतील मास्तरकी ही त्याची मिरासदारी असते. बहुतकरून पुण्याचा—पदवीधर त्याच्या या अलिखित हक्कावर गदा आणीत नाहीं. परंतु—सदाशिवानें, पुण्यांतील एका भटजी कॉलेजांतील शेपूटवाल्यानें, मुंबईच्या एका हायस्कुलांत चक्क अर्ज टाकलान् ! आणि मौज ही कीं जूनच्या ७ तारखेपासून ४५ रुपये पगारावर तो नेमलासुद्धां गेला !

सदाशिवाचे आईवडील जुन्या बालबोध घराण्यांतील आणि त्यांतून पुण्यापासून अक्षरशः छपन्न मैलांवर वसलेल्या जुन्नर मुक्कामीं जन्म घालवलेलीं. त्यांना एकच तत्व माहीत होतें आणि तें हें कीं मुंबई शहर हें सदाशिवसारख्या नुकतीच मिसरूड फुटणाऱ्या तरुणाला एकट्यानें हिंडण्यास केव्हांही सुरक्षित नाहीं आणि म्हणूनच सदाशिवबरोबर त्याची तरूण पत्नी मंदा दुकटी म्हणून पाठविण्यात आली. अर्थात सदाशिवाच्या

नीतिमत्तेचें गाठोडें घट्ट आवळण्याचें काम मंदावर येऊन पडलें होतें. परंतु वडिलांच्या मनांत कांहीं जरी असलें तरी सदाशिवाला हेंच पाहिजे होतें आणि मंदालाही पण तेंच पाहिजे होतें. मात्र वरकरणी मुंबईस निघण्याच्या दिवसापर्यंत जबाबदारीच्या कल्पनेनं अगदीं कंबरडें मोडून गेल्याप्रमाणें वागण्याचें पतिपत्नींनी आपसांत ठरवून टाकलें.

त्या दिवशीं गाडी स्टेशनवरून हालली न हालली तोंच सदाशिवानें मंदाकडे अर्थपूर्ण नजरेनें पाहिलें. मंदानेंही त्याचवेळीं त्याच नजरेनें त्याच्याकडे पाहिलें आणि डब्यांत कांहीं नाहीं तरी एक तान्हें मूल धरून ७॥ माणसें हजर असतांनासुद्धां दोघेंहीजण अगदीं मोकळ्या मनानें हंसलीं. परिस्थितीचा उमज स्त्रियांना चटकन् येतो. मंदा लाजून 'इश्श' असें पुटपटत कपाळावर न आलेल्या बटा सावरूं लागली. आतां मात्र आपलें संभाषण दुसऱ्या कोणी ऐकूं नये या उद्देशानें कोपऱ्यांतल्या खिडकींतून तोंड बाहेर काढून दोघेंहीजण बोलूं लागलीं. आपलें गुपित भाषण दुसऱ्यांनीं ऐकूं नये म्हणून तरुणांची कोण धडपड चालू असते, परंतु त्या मांडवाखालून गेलेल्या पोक्त्या पुरवत्या लोकांना त्यांत ऐकण्यासारखें असें कांहींच नसतें. नुकताच शिवाजी, संभाजी, घोकणारा छोकरा आपल्या विद्याभ्यास-जडित पित्याला ज्याप्रमाणें भासतो त्याप्रमाणेंच हा प्रकार नव्हे काय ?

"खरेंच मी म्हणतें, मामंजींनी आणि सासुबाईंनी मला आपल्याबरोबर कसं सोडलं ? आपण कांही बोललां होतां त्यांना—?" मंदा त्याच्याकडे पहात म्हणाली.

"मी ? काय बोलणार ? खानावळींतील अर्ध्या कच्च्या अन्नाच्या थापा आतां फार शिळ्या झाल्या आहेत. त्यांतून मुंबई म्हणजे कांहीं बेलवंडी, बेलापूर नाहीं. छे ! मी कांहींच बोललों नाहीं" सदाशिव हंसत हंसत म्हणाला.

"कांहींतरी बोललां असलांच पाहिजेत. नाहींतर सासुबाईंनीं मला मुद्दाम कधींच बजाविलें नसतं ?" मंदा मान फिरवून म्हणाली.

"आई ? आईनें काय तुला बजाविलें ?" सदाशिव अधीरतेनें म्हणाला.

"मी नाहीं सांगतजा—" दूरवर दिसणाऱ्या वृक्षराजीकडे पहात मंदा म्हणालीं.

"ऍं हे ! आली वाटतं सुरसुरी म्हणे मी नाहीं सांगतजा —" "सदाशिव म्हणाला. दोघेहीं केवढ्यांदा पण हंसलीं—! "सांग नं ! आईनं काय काय शिव्या दिल्या त्या तरी ऐकूं देत—"

" ऊंऽऽहूंऽऽऽ—" असें म्हणून मंदा पुन्हा हसली!

"असं काय बरें! आपण दोस्त नं? आपलें काय ठरलं आहे?—" सदाशिव म्हणाला.

"अन् तुम्ही तरी सांगतां कां मला सगळं? दुसऱ्याला तेवढें बांधून घ्यायला तयार अन् स्वतः मात्र अगदीं मुगाचे लाडू खायचे—चलाऽऽ!" मंदा पदराचें टोक दातानें कुरतुडीत म्हणाली.

" रागावूं नकोस—माझा स्वभाव आहे थोडासा भिडस्त. हसूं नकोस. मी अगदीं खरं तेंच सांगतों आहे. माझा सारा पराक्रम फक्त तुझ्यापुढें. वडिलांना आणि आईला प्रत्यक्ष तोंडावर सांगावयाला मला धीर होत नव्हता. शेवटीं एक युक्ती योजली—कु. मालती नांवाच्या माझ्या एका काल्पनिक मैत्रिणीकडून परवांच मला एक पत्र आलं—अगदीं चक्क तीन पैशांच्या कार्डावर तिनें मला सहकुटुंब येणार नसाल तर आमच्या येथेंच उतरण्याचा आग्रह केला होता. बरं—तिच्या घरांत तिच्या एका आंधळ्या आत्याशिवाय दुसरें कोणीच नाहीं."

"आणि तें पत्र मामंजीनीं वाचलं आणि दोघांनीं मिळून मला आपलेबरोबर पाठविण्याचें ठरवलं— असंच बरं ऽ" मंदा हसूं दाबीत म्हणाली.

" असंच–पण तुझें तें दातांच्या फटींतून ' स्स्स् ' आवाज करणारें हुजूरपागी हास्य बंद कर. पण काय मंदा, आईला हें माझें खरं वाटलं?" सदाशिव म्हणाला.

" सासूबाईंना आधीं खरं वाटलं, पण मामंजीनी जेव्हां म्हटलं कीं–" आपल्या चिरंजिवांना पत्नी बरोबर पाहिजे आहे असं दिसतं आहे–" तेव्हां त्याही हसूं लागल्या. बाकी हसणार नसाल तर एक सांगूं का—?" मंदा किंचित् लाजेनें मान फिरवून खालीं पहात, खिडकीच्या चामडी पट्टयाशीं खेळत म्हणाली. सदाशिवाच्या भुंवया प्रश्नार्थक झाल्या!

" मी नाहीं जा—" किंचित् तिरप्या नजरेनें मंदा म्हणाली.

" अग पण काय? मीं ऐकतों आहे—" सदाशिव तिच्याकडे जास्तच आतुरतेनें पहात म्हणाला.

"मग असं काय पहातां माझ्याकडे?" मंदा त्याच्या कोटाच्या बाहीशीं खेळत म्हणाली.

" परक्या स्त्रीकडे पाहूं नये, तिची कुचेष्टा करूं नये, अगर कुचेष्टा करण्याचा हेतूही त्या पहाण्यांत असूं नये इत्यादि इत्यादि मजकूर पीनल कोडांत आहे पण—" सदाशिव म्हणाला.

" पुरे पुरे ! वकिलीची खुमखुमी तिनदां नापास होऊन सुद्धां अजून आहे का शिल्लक ? इंग्रजी सहा यत्ता शिकलेल्या पोरीसोरींसमोर तुमचा पराक्रम पाहून घ्यावा " मंदा मुद्दामच खोचून बोलत होती. सदाशिवाच्या हें नित्याच्या परिचयाचेंच होतें. आणि त्याचा तरी बिचाऱ्याचा काय अपराध ? बी. ए. झाला. लग्न झालें. आतां मंदासारखा गोड पोरींशीं गोडगोड गप्पा कराव्यात कीं–'ज्या अर्थीं आणि ज्या कारणें ' इत्यादि अर्थशून्य शब्दांनीं सुरवात होणारीं किचकट वाक्यें पाठ करावींत ! सदाशिवाचे समकालीन आणखी पांचसहाजण होते. सर्वांचा कार्यक्रम अगदीं एक. दरवर्षी नेमानें भरणाऱ्या मराठी साहित्यसंमेलनाप्रमाणें, परीक्षेच्यावेळीं सर्वांनीं एकत्र यावयाचें, चर्चा म्हणून कांहींतरी बडबड करावयाची, शेवटीं पांढऱ्यावर काळें करून शिणलेल्या मेंदूस कांहींतरी करमणूक म्हणून आपापल्या बायकांना घेऊन सिनेमागृहें धुंडाळावयाचीं व पुढील वर्षी भेटावयाचें आपसांत ठरवून आपापल्या गांवीं वर्षाच्या विश्रांतीकरितां मार्गस्थ व्हावयाचें—शेवटीं मंदानें " मीहीपण मॅट्रीकचा अभ्यास करतें " म्हणून धाक देतांच सदाशिवानें हा नोकरीचा राजमार्ग पत्करला.

" म्हटलं विचार कसला चालला आहे ? " मंदा त्याचा हात धरून म्हणाली.

" विचार करीत होतों कीं, माझी निंदाच करावयाची होती तर तूं कशाला माझ्याबरोबर आलीस ?—" सदाशिव म्हणाला.

" इश्श ? चेष्टा होती हो माझी ती. निंदा करण्याकरितां मी कशाला येईन ? मला करमलं असतं तरी का एकटीला ? आणि म्हटलं, तुमच्या या पत्रापेक्षां माझ्याच युक्तीचा जास्त उपयोग झाला. " मंदा लाजून म्हणाली.

" तुझी युक्ति ? तूं काय केलंस ?—"

" तेंच तर मी सांगणार होतें—सासूबाईना मी चक्क सांगितलं. अगदीं लाजभीड पार झुगारून देवून सांगितलं, कीं मुंबई मी अजून पाहिलेली नाहीं आणि मला जावसं वाटतं आहे. एक दिवस मी जेवलें सुद्धां नाहीं—दचकूं नका अगदीं—आधीं सगळ्यांच्या नकळत मी भरपूर खाऊन घेतलं होतं "—मंदा हंसत हंसत म्हणाली.

" यंवरे पट्ठे ! शिक्षणाचा असा उपयोग होतो—पण थांब, लोणावळं आलें आहे. अगदीं थेट रिफ्रेशमेंटरूमध्यें जाऊन चहा पिऊन येऊं या.—" सदाशिव वरच्या बाकाला धरून उठला.

" तिथें नकोबाई "

" अग चल—! चहाच प्यायचा आहे आपल्याला—दुसरं तिसरं कांहीं नाहीं—" .

मंदा जागची उठली. लाजेने किती लाल झाली होती ती !

मुंबईत इराण्यांची हॉटेलें, गुजराथ्यांची वाणसामानाचीं दुकानें आणि मुलांच्या शिक्षणाची आव्हानात्मक खात्री देणारी हायस्कुलें कोठें, केव्हां केव्हां आणि कशी उपटतील हें मुंबईकरांव्यतिरिक्त इतरांना तितकेसें चटकन समजणार नाहीं. " एका वर्षांत तीन इयत्ता, पांच वर्षांत मॅट्रिक, रात्रीची शाळा, दुपारची शाळा, सकाळची शाळा, " इत्यादि पाट्यांनीं विभूषित झालेल्या गिरगांवांतील एका ज्ञानगुत्यामध्यें सदाशिव रोज ११ ते ५ आपलें कर्तव्य बजावूं लागला. शाळेपासून सुमारें पंधरा मिनिटांच्या रस्त्यावर असलेल्या सुप्रसिद्ध रणछोडदास बिल्डिंगमध्यें त्यानें मंदा आणि संसार यांना तिसऱ्या मजल्यावरच्या एका डबलरूममधें आणून ठेविलें होतें. बिल्डिंगमधील वस्ती चांगल्यापैकीं होती. बिल्डिंगमधील बहुतेक मंडळी श्रीमंत जरी नव्हती तरी एकाददुसरा ' कोरडा ' बाळू बाळगण्याच्या लायकीची होती. त्या सर्वांत ४५ रुपये इतका दांडगा (?) पगार दरमहा मिळविणारा काय तो सदाशिवच होता. परंतु सदाशिवाला मुंबईंतच डॉक्टरकीचा धंदा करणाऱ्या मामांचें पाठबळ होतें, आणि म्हणूनच तो २५ रुपये भाडें दरमहा द्यावयास तयार झाला. तळमजल्याला एका मुलींच्या हायस्कुलावर प्रिन्सिपॉल म्हणून मिरविणारी एक खुडुक अंगाची, पांढऱ्या कपाळाची, आणि पाठीस पोक आलेली परंतु दिवसांतून कमींत कमी तिनदां वस्त्रांची रंगसंगती बदलणारी एक बाई रहात असे. शाळेंतून गड्यानें आणून दिलेल्या वर्तमानपत्रांमधें ती सदैव गढलेली दिसे; परंतु ' कॉंग्रेसचें काय चुकलें ? ' या तिच्या आवडत्या प्रश्नावर ती तासन्तास बोलत राहीं. या बाईचे वादविवाद टाळण्यासाठीं तरी कॉंग्रेसनें कोणत्याही चुका करूं नयेत असेंच ऐकणाऱ्याला वाटत असे.

पहिल्या मजल्यावर एक प्रोफेसर रहात होते. जागतिक मंदीच्या आधीं पंचवीस वर्षें हे नोकरीला लागले होते, म्हणून यांना दरमहा २५० रुपये दिसत असत एवढाच अर्थ. यांची सामाजिक मतें होतीं. हे स्वार्थाला धक्का न लावतां उदारमतवादी होते. आणि ' प्रामाणिक-पणानें ' बोलण्याची त्यांना लकब साधून गेली होती. यांच्या पत्नी शेंदूर लावलेल्या देवी होत्या. शिक्षण दोनचार इयत्तांचेंच; परंतु प्रोफेसरांची बायको असल्यामुळें त्या कोणालाच

हार जात नसत. त्या कविता करीत असत आणि आश्चर्याची गोष्ट ही कीं, त्या ( म्हणजे कविता ) चक्क छापून येत असत. दुसऱ्या मजल्यावर मुंबई म्युनिसिपालिटीच्या कोठल्याश्या दवाखान्यांत डॉक्टर म्हणून काम करणारे एक गृहस्थ रहात असत. बहुतेक घरीं नसतच. त्यांच्या पत्नीं विदुषी नव्हत्या. पण आधुनिक बोलपटांतील कोणत्याही नटीच्या तोंडीनें गाणी गुणगुणण्यांत त्यांचा हातखंडा ( ! ) होता. स्वतःच्या रूपसंपदेवर त्या स्वतःच बेहद्दखुष होत्या.

पुरुषवर्ग बहुतेक दुपारचा बाहेर दुसऱ्यांच्या लाथा खाण्यांत गर्क असे आणि स्त्रीवर्ग आपल्या कलेची उपासना करण्यास मोकळा असे. बिल्डिंगच्या मागच्या बाजूस एक हॉल बरेच दिवस मोकळा पडून राहिला होता. त्या हॉलमध्यें अलिकडे दोन वर्षें स्त्रीवर्गानें एक महिलासंघ स्थापन केला होता. संघाच्या स्थापनेचा हेतु नेहमीं प्रमाणेंच अत्यंत उच्च होता. महिलाजीवनविषयक प्रश्नांचा मोठ्या जिव्हाळ्यानें विचार करण्याचा त्या वाडीमधील महिलांनीं चंग बांधला होता. 'गोल नेसावें कीं कासोटा घालावा' या अत्यंत जिव्हाळ्याच्या महत्वपूर्ण प्रश्नावर सुमारें दोन महिनें चर्चा होऊन आणखी दोन महिनें एकमेकींचीं तोंडेंसुद्धां पहावयाची नाहींत हा त्याचा निकाल लागला होता. मासिकांतून लेख लिहून आदर्श गृहिणी कशा असाव्यात याविषयीं दोघी तिघी महिलांनीं एकमेकींचीं सडकून हजेरी घेतली होती.

एवंगुणविशिष्ट ( हरेराम ! ) महिला मंडळांत मंदेचा प्रवेश मोठ्या मजेदार रीतीनें झाला. सदाशिव घरीं असला म्हणजे पाळीव मांजरीप्रमाणें त्याच्या भोवतीं पिंगा घालण्यांत तिचा वेळ झटकन जाई. परंतु ११ ते २ पर्यंत सदाशिव कर्तव्यकर्मांत गुंतला जाई त्यावेळीं मात्र मंदेचें कर्म उभें रहात असें. वास्तविक शिक्षणानें ती दोन तीन अपवाद सोडून इतर महिलांच्या फारशी मागें नव्हती. परंतु ढोलगे वाजवून स्वतःच्या ज्ञानाचें सिनेमागृह करण्याची कला ती अजून शिकली नव्हती. स्वाभाविक संकोच तिला मागें खेची.

रविवारची सुटी होती. सदाशिव घरींच होता. दुपारची वेळ होती. दोघेंही एकमेकांची निंदा व स्तुति आळीपाळीनें करीत होतीं. इतक्यांत दारावर थाप आली—मंदानें झटकन् केस सारखे केले. पदर नीट सांवरला. गळ्यांतील एकदाणी डाव्या हाताच्या अंगठ्यांत माळेसारखी धरली आणि दरवाजा उघडला. महिला मंडळाचे सदस्य बाहेर उभें होते. खोलींत शिरण्याची प्रत्येकाची इच्छा होती, पण बराच वेळ कोणीच पुढें होईना. शेवटीं मंदाच "या वंऽआंत" म्हणून म्हणाली, सर्वजणीं आंत आल्या. प्रिन्सिपॉल बाईसाहेबांनीं नेहमींच्या सरावाप्रमाणें समोरच दिसणाऱ्या एकुलत्या एक खुर्चीचा ताबा घेतला. बाकीच्यांनीं उभे

राहाणें किंवा बसकरावर अवघडत बसणें यांपैकीं ज्याला जें सोयीस्कर वाटलें त्याचा त्यानें अवलंब केला. सदाशिव तेथून उठून जाणार होता, परंतु प्रि. बाईसाहेबांनीं खुणेनें त्याला जाऊं दिलें नाहीं.

"आज आमच्याकडे येण्याचा आपला—?" सदाशिवनें अर्धवट सुरवात केली.

"म्हणजे आमची टोळधाड तुमच्यावर पडण्याचा—" स्वतःला विनोदी म्हणून समजणाऱ्या एका महिलेनें म्हटलें. परंतु अपेक्षेप्रमाणें कोणींच हंसलें नाहीं.

"या आमच्यांतल्या एक विनोदी मेंबर आहेत. तुम्हीं त्यांच्याकडे लक्ष देवूं नका"—प्रिन्सिपॉलबाई बर्फासारख्या थंडगार आवाजांत म्हणाल्या. आणि विनोदी मेंबर बर्फासारखा थिजला. प्रि. बाईनीं घरांतील मोजक्या सामानाकडे एकवार तुच्छतेनें पाहून आपलें वक्तव्य पुढें चालू ठेविलें, "या तुमच्या मंदाबाईनीं या वयांत स्वतःला महिलाजीवन विषयक प्रश्नांना वाहून घेतलें तर देशाचें कितीतरी कल्याण होणार आहे—"

"आणि कल्याण झाल्यावर थोडक्याच वेळांत दिवाही लागेल. आणि नंतर ठाणेंही जवळच आहे"

विनोदी मेंबर म्हणाला. "शूः—" या आवाजानें त्यांच्या विनोदाचें स्वागत झालें.

"कॉंग्रेसचें जर कांहीं चुकत असेल तर इथेंच. देशांतल्या स्त्रियांची उन्नती करायची टाकून सुतं कसलीं काढतां आणि उद्योगधंदे कसले काढतां! स्त्रिया सुशिक्षित झाल्याशिवाय तुमच्या दारूबंदीनें आणि प्रधानगिऱ्या स्वीकारल्यानें काय स्वराज्य मिळणार आहे—? कॉंग्रेसचें हेंच चुकतें आहे—" प्रि. बाईसाहेबांनीं म्हटलें.

"झुमझुम वाळा वाजिव बाळा—" कोठूनशी लकेर दुमदुमली.

सदाशिवनें मंदाला त्या संघांत पाठविण्याचें कबूल केलें.

सर्वजणी आनंदानें परतल्या. जातांना एकीनें 'चलगे सजणे—' म्हणून एक तान ठेवून दिली. मंदेच्या मनांत नव्हतें परंतु सदाशिवच्या आग्रहाखातर तिनें त्या दिवसापासून संघांत जाण्यास सुरवात केली. पुढच्याच रविवारीं रीतसर तिचा परिचय इतर महिलांना करून देण्यांत आला. आणि संघाच्या वहिवाटीप्रमाणें मंदानें त्यांनां सर्वांना एक दिवस चहाला बोलाविलें व तीही रोज इतरांच्या येथें जाऊं लागली.

हळू हळू तिला महिलाजीवनविषयक जिव्हाळ्याचे प्रश्न कोणते याचा सुगावा लागूं लागला. एके दिवशीं दुपारीं मंदा संघांत गेली. त्या दिवशीं पुण्याहून पाहुणी म्हणून आलेल्या

एका पंडितेला व्याख्यानाची वेठ मारण्याचा प्रसंग प्राप्त झालेला होता. व्याख्यान बरोबर तीन वाजतां सुरू होणार असें जाहीर करण्यांत आलें होतें. परंतु सुमारें ४ ला सुरू होईल असा सर्वांचा तर्क होता. आतां ४। वाजून गेले होते. पटावर असलेल्या २४ जणींपैकीं मंदा धरून चौघीजणी हजर होत्या. कार्यवाह प्रोफेसरीणबाई शेजारच्या एका आपल्याच वयाच्या बड्या प्रस्थाला कांहींतरी सांगण्यात गर्क होत्या. मंदा मागेंच खिडकीशीं उभी राहून ऐकत होती. "त्या जानकीबाई आठवल्यांच्या शेजारच्या सुमतीबाई नाईक नाहींत कां—! त्यांची पुतणी विमल पुराणीक आहे नं ? तिच्याकडे म्हणे रोज त्या कांताबाई धडपडे अन् शेवंतीबाई मोगरे अन् झालंच तर रमाबाई पुंडलीक जमत असतात. मला बाई काय माहिती ? त्या सुंदराबाई जोगळेकरांकडे कमू भट येतांना, तिनं प्रत्यक्ष पाहिलें—" इत्यादि.

त्या सहस्रनामावळीमुळें मंदा अगदीं कंटाळून गेली. रोज हाच प्रकार चालू असे. एकमेकींची निंदा, आणि कुचेष्टा हेच विषय अत्यंत महत्वपूर्ण असावेत असा तिला दाट संशय येऊं लागला होता; त्याच्या जोडीला स्वतःची स्तुति वीट येईपर्यंत पेरली जात असे—. कांहीं दिवस नाविन्यामुळें मंदाला त्यांतही गोडी वाटली परंतु नवीनपणाला सुद्धां जुनेपणा हा असतोच. व्याख्यान वगैरे प्रकारांना ठराविक सात-आठजणी जमत असत आणि त्यांच्यांतही उत्साह बेताचाच असे. सर्वांचें लक्ष शेवटच्या अल्पोपहाराकडेच लागलेलें दिसून येत असें.

आजहि नित्याप्रमाणें ५ चे सुमारास सातजणी जमल्या. परंतु मुख्य वक्त्याचा पत्ता नव्हता. शेवटीं प्रोफेसरीणबाईच्या यजमानांचें आगमन झालें आणि त्यांच्याबरोबरच कार्यबाहुल्यामुळें नाइलाज असल्याचा ठराविक ठशाचा निरोप वक्त्यांकडून आला. इतका जामानिमा करून व्यर्थ जाणार या विचारानें प्रोफेसरीणबाईचा चेहेरा पडला. परंतु प्रोफेसरांनीं वक्त्याची उणीव स्वतः भरून काढण्याचें आगंतुक आश्वासन दिल्यामुळें पुन्हां त्यांच्या जिवांत-जीव आला. प्रोफेसरांची ही आगंतुक लुडबूड त्यांच्या स्वतःच्या पत्नीखेरीज इतरांना बिलकूल पसंत नसल्यासारखें दिसलें. परंतु बोलणाऱ्याचें तोंड कोणीं धरावें या न्यायानें सर्वजणी गप्प बसल्या. प्रोफेसरांनीं सर्वांनां विशेषतः मंदाला उद्देशून 'स्त्रिया आणि त्यांची सोडवणूक' या विषयावर चांगलें अर्धा तास ऐकावयास लावलें. व्याख्यानाकडे कोणाचेंच लक्ष नव्हतें. मधून मधून वक्त्यांचे धीरगंभीर शब्द हॉलच्या कोनाकोपऱ्यांत दडून बसलेल्या क्षुद्र जीवजंतूंना धक्का देऊन जागृत करीत होते.

'—स्त्रियांनीं यावेळीं आपले मायेचे पाश झुगारून दिले पाहिजेत. आणि समाजांतील आपलें महत्वाचें स्थान जगाला पटवून देण्याकरतां घराबाहेर पाऊल टाकलें पाहिजें—' उद्धेरदात्मनात्मानं ' म्हणून प्रत्यक्ष–परमेश्वरच—' इत्यादि इत्यादि—. प्रोफेसरांचा–दादासाहेबांचा–उपदेश पालथ्या घागरीवर पडलेल्या पाण्याप्रमाणें महिला वर्गाच्या कानांवर आदळत होता. शेवटीं एकदांचें दिव्य पार पडलें. टाळ्यांच्या आणि सोनेरी बिल्वरांच्या किणकिणाटांत दादासाहेब पुन्हा खालीं बसले. रीतीप्रमाणें सर्वजण प्रोफेसरीणबाईंच्या हॉलमध्यें अल्पोपहाराचा प्रश्न सोडविण्याकरतां जाऊं लागल्या. मंदा आपल्या खोलीकडे सटकण्याच्या बेतांत होती इतक्यांत दादासाहेबांचे शब्द तिच्या कानीं पडले–" वा: ! इतका वेळ घराबाहेर पडा म्हणून मी सांगत होतों आणि या मंदाबाई पहा, चालल्या लगेच घरांत–! चहाशिवाय सुटका नाहीं बरं कां मंदाबाई ! आणि रागावलेच पतिराज तर निबंधाच्या वह्या आणखीन् दोन जास्त तपासतील–"

मंदाचा इलाज नव्हता, परंतु जेव्हां तेव्हां आपल्या पतीला अनुलक्षून असे तुच्छता निदर्शक शब्द काढणाऱ्या दादासाहेबांविषयीं तिच्या मनांत बसलेली अढी जास्तच बळकट झाली.

काळानें विसर पडतो म्हणून म्हणतात, परंतु दादासाहेबांच्या चमत्कारिक वागण्याचा मंदाला जसजसा काळ जावूं लागला तसतसा जास्त परिचय होऊं लागला. दुसऱ्याच्या घरावर तुळशीपत्र ठेवण्याइतका उदारपणा त्यांच्यांत असावा कीं काय, असा मंदाला राहून राहून संशय येऊं लागला. सर्व महिलांत वयानें लहान असणाऱ्या मंदाशीं दादासाहेब इतके कां अजीजीनें वागतात याचा उलगडा तिला होईना. दादासाहेब आपल्याशीं कसे वागतात हें तिनें सदाशिवाला अजूनपर्यंत सांगितलें नव्हतें. कारण नक्की पुराव्याशिवाय या गोष्टी दुसऱ्याला सांगण्यासारख्या नसतात हें ती जाणून होती. तिला स्वतःला तरी पुरी खात्री कुठें वाटत होती ? क्षणांत त्यांचा आवाज वात्सल्ययुक्त भासे तर क्षणांत त्यांचा कंपित आवाज मनांत कंप उत्पन्न करी—. आपल्या एवढ्या वयाच्या ज्या गृहस्थाच्या मुली नागपूर, सोलापूर मुक्कामीं पतीगृहीं सुखानें नांदत आहेत त्या गृहस्थाच्या मनांत अन्य-भावना प्रादुर्भूत होण्याचा संभव शक्य आहे काय ? पण–पण मग त्यांची ती जणूं काय दूरवरच्या वस्तूकडे बारीक डोळे करून पहाण्याची भेदक दृष्टी–तिचा काय अर्थ असावा ?

शंकाकुशंकांनीं मंदाचें हृदय जड झाल्यासारखें झालें. एरवीं खेळकर वाटणारी पोर या

विचारांनीं एकदम अकालींच गंभीर दिसूं लागली. सदाशिवनें तिला पुष्कळ वेळां चिडवून बोलकें करण्याचा प्रयत्न केला, परंतु मंदा हंसण्यापलिकडे कांहींच प्रत्युतर करीत नसे. आणि तें तिचें हंसणें तरी किती कृत्रिम होतें ?

त्या दिवशीं मंदा नेहमींप्रमाणें एकटीच घरीं होती. कुठल्याशा स्त्रीजीवन विषयक प्रश्नांना वाहिलेल्या एका मासिकांतील 'भोपळ्याच्या बियांची खीर' या हास्योत्पादक लेखाकडे तिचें लक्ष वेधून राहिलें होतें. इतक्यांत खालच्या मजल्यावर दादासाहेबांच्या ब्लॉकमधून ग्रॅमोफोनचा आवाज तिला ऐकूं आला. प्रथम तिनें त्याकडे दुर्लक्षच केलें, परंतु नवीन गाणीं लावलेलीं तिला समजतांच तिनें हातांतील मासिक खालीं ठेविलें—. थोडा वेळ विचार करून प्रोफेसरीणबाईच्याकडे जाण्याचा विचार करून ती उठली.

दरवाजा लावून घेतलेला होता. आंतून येणाऱ्या संगीताच्या लहरींनीं क्षणमात्र तिला वेडें केलें. दुसऱ्याच्या घरीं गाणें ऐकण्याकरितां जाणें तिला तितकेसें पसंत नव्हतें; परंतु आतां तिला त्या गाण्यानें भारल्यासारखें झालेलें होतें. लाजेनें उडणाऱ्या छातीवर धीराचा हात देऊन तिनें दरवाजावर टकटक केलें. दरवाजा उघडला गेला; पण दरवाजा दादासाहेबांनीं उघडला होता. दादासाहेब यावेळीं घरीं असलेले पाहून तिला आश्चर्य वाटलें. कसा तरी जीव मुठींत धरून ती, '—वैनी आहेत का घरांत ?–' असें अडखळत पुटपुटत मागें पाऊल घेवूं लागली.

"आंत तर याल कीं नाहीं ?" दादासाहेब आपल्या नेहमींच्या घोगऱ्या आवाजांत म्हणाले.

"माझें कांहीं काम नव्हतं. येईन पुन्हा केव्हांतरी"—मंदा मागें वळली.

"अरे, पुन्हा केव्हांही याल पण आतां मागें कां चाललांत ? इतक्या कशा तुम्हीं भित्र्या बुवा ?"

दादासाहेब हंसून म्हणाले. मंदा माघारी वळलीच होती. ती परत गेली असती परंतु भित्रेपणाचा आरोप तिला सहन झाला नाहीं. आणि एकाद्याशीं इतक्या तुसडेपणानें वागण्यासारखा तिचा त्यांनीं काय अपराध केला होता ?

"तसं नाहीं, आपल्याशीं मला भिण्याचें काय कारण आहे ? सहज गाणीं ऐकायला म्हणून वहिनींकडे आलें होतें. तुम्हाला पाहून जरा आश्चर्य वाटलें एवढेंच कायतें"— मंदा खोलींत प्रवेश करीत म्हणाली. दादासाहेबांनीं घाईघाईनें एक खुर्ची पुढें केली.

"—असं होय—ह्यांत नवल तें काय आहे ? अहो मी प्रोफेसर आहे. आम्हा प्रोफेसरांना शाळेंतील मास्तरांप्रमाणें घंटा, तास इत्यादि जुलमांना मान वाकवावी लागत नाहीं; कोणीतरी

विनोदानें म्हटलंच आहे, कीं मास्तर म्हणजे टांगेवाला अन् प्रोफेसर म्हणजे मोटारहांक्या; आला कंटाळा—राहिलों घरीं झालं. पण तुम्ही उभ्या कां ! तुम्ही उभ्याराहून मलाही उभे राहाण्याची शिक्षा कां करतां ?—" दादासाहेब हंसून खुर्चीकडे बोट करीत म्हणाले.

" नाहीं जातें—" मंदा खुर्चीवर बसून परंतु लगेच उठून म्हणाली.

" छेः ! विश्वासच नाहीं माझा. जा बापड्या—" दादासाहेब एक उसासा टाकून म्हणाले.

मंदा पुन्हा खालीं बसली; एकाद्याचें मन विनाकारण दुखविणें तिला मान्य नव्हतें. नुसत्या संशयावरून एकाद्याला—? तिनें वर मान करून पाहिलें. दादासाहेबांचीं नजर पाहून तिला पुन्हां कससेंच झालें. या माणसाचे शब्द निराळे आणि नजर निराळी, कां असें ?

" आश्शी ! आतां कसं माणसासारखं वागलांत ? अहो मुंबईची वास्ति आणि त्या ठिकाणीं इतका सनातनीपणा बाळगून कसं चालणार ? " दादासाहेब फोनोचें झांकण लावून म्हणाले. पुन्हां मंदाला चमत्कारिक वाटलें ? या वाक्याचें दोन अर्थ उघड होते. यांचा कोणता ? तेथून निघून जावें असं तिला वाटूं लागलें; पण इतका वेळ तेथें बसल्यावर जाणें शक्य नव्हतें. निदान तिला तरी शक्य नव्हतें.

" मुंबईच्या या महागऱ्या वस्तींत कसं लोकांचें भागत असेल, राम जाणें. आतां माझे २५० रुपये पण एक पैसा राहील तर शपथ—" दादासाहेब म्हणाले.

" तसा तुमचा खर्चिक स्वभाव आहे." मंदा हळूच म्हणाली.

" तुम्हांलाही पटलं ना हें ? बस, बस ! तुम्ही कांहीं म्हणा पण तुम्ही माझा स्वभाव अगदीं सोळा आणे ओळखलात. याला म्हणतात गुणग्राहकता— ! अहो करायचं काय ? या बायकांच्या क्लबाकरतां वाटेल तसा पैसा सोडावा लागतो. स्त्रियांची परवशता पाहिली कीं अगदीं भडभडून येतें— " दादासाहेब तिच्याकडे भेदक दृष्टीनें पहात म्हणाले.

" पण स्त्रिया परवश आहेतच कुठें ? —" मंदा म्हणाली.

" अहो मवाळांना ब्रिटिश राज्यच आवडतं, तसं हें आहे. स्त्रियांच्या परवशतेची त्यांची त्यानांच ओळख नाहीं. म्हणजे तुमचा तसा दोष नाहीं, कारण तुम्हांला जन्मापासून हेंच शिकवलें आहे. आतां घटकाभर असंच धरून चालू कीं, तुमचे पती उद्यां एकाद्या तरुणी-बरोबर हिंडूं लागले, तुम्ही काय म्हणाल ?" दादासाहेब थोडेसे थांबले.

" पण मी जिवंत आहे तों पर्यंत तसं कधींच व्हावयाचें नाहीं—" मंदा निश्चयानें म्हणाली; दादासाहेब एकवार जोरानें हांसले.—

" भ्रम आहे तुमचा! पुरुषाचा नियम नाहीं असं तुम्हीच बायका म्हणतां—. समजा तुम्ही माझ्यासारख्या कां होईना एकाद्या पोक्त्यापुरत्या माणसाबरोबर हिंडू लागलांत तर तुमचे पतिराज काय म्हणतील ? "— दादासाहेब हातांतल्या पिनांच्या डबीशीं खेळत म्हणाले.

" पण त्या गोष्टी कालत्रयीं शक्य नाहींत—" मंदानें सुरवात केली.

" जगांत अशक्य काय आहे ? नवराबायको मित्र असतात पण एकमेकांचे कट्टे हाडवैरी त्यांच्यासारखे दुसरे कोणीच होणार नाहीं. तुमची संसाराची ही तोंडओळख आहे. पुढें तुम्ही जगांतल्या इतर नवराबायकोप्रमाणें डोळ्यांवर कातडें ओढून परस्पर साहाय्यक मंडळ काढण्याची तडजोड करालच कीं नाहीं तें पहा—" बोलतां बोलतां दादासाहेबांच्या हातांतील पिनांची डबी त्यांच्या हातांतून निसटली, ती नेमकी मंदाच्या पायांपुढें येऊन पडली. झांकण लापट असल्यामुळें पिना इतस्ततः पसरल्या, ' अरेच्या ?—' म्हणून गुरकावत दादासाहेब मंदाच्या पुढ्यांत पडलेल्या पिना गोळा करूं लागले.........

मंदा ताडकन उठून उभी राहिली ! तिची पुरी खात्री झाली. बायकोला क्लब काढून देऊन तिला आर्थिक मदत करणारा हा दादासाहेब, परस्पर साहय्यक मंडळाचा भागीदार होता यांत बिलकुल शंका नव्हती. उदार मनाच्या ऐसपैस पांघरुणाखालीं गोकुळांतला कृष्ण बनण्याचा हा त्याचा डाव होता. संधि आली कीं स्वरूप प्रगट करायचें हा त्याचा शिरस्ता स्वच्छ दिसत होता. नाहींतर पिना गोळा करतांना मुद्दाम तिच्या पायाला स्पर्श करण्यांत दादासाहेबांचा दुसरा असा कोणता हेतु असणार ? ती घाईघाईनें उठली आणि दासासाहेबांच्या लक्षांत येण्याच्या आंत तिनें दरवाजाकडे धूम ठोकली. दादासाहेब झटकन उठले आणि दरवाजाकडे जाऊं लागले. मंदा त्यांच्या आटोक्याबाहेर होती. तिनें दरवाजा उघडला—आणि दरवाजांतच मुलींच्या हायस्कुलावर प्रिन्सिपॉल म्हणून मिरविणारी व्यक्ति तिच्यापुढें उभी असलेली तिला दिसली. मंदाला थोडेसें हायसें वाटलें आणि लगेच परस्पर साहाय्यक मंडळाची कल्पना मनांत येऊन तिचा थरकांप उडाला.

" अग काय शिवाशिवी खेळतेस कीं काय दादासाहेबाशीं ! " हे प्रिन्सिपॉलबाईचे गलिच्छ उद्‌गार तिच्या कानावर पडले. ती त्या तिरमिरींतच जिना चढून वर आली

आणि खोलीचें दार धाडकन लावून तिनें कॉटवर अंग टाकलें. सुमारें आठ दिवस गेले असतील. मनुष्याच्या मनाच्या व्यापारांत किती उलथापालथ झाली तरी निसर्ग धिमा असतो; नियमाप्रमाणें सर्व गोष्टी निसर्गाच्या व्यवस्थित होत होत्या. भरती ओहोटी, सूर्य चंद्राचें गमनागमन, दिवसरात्र इत्यादि अविस्मयजनक गोष्टी जशा व्हाव्या तशा घडत होत्या. परंतु महिला संघांत केवढें वादळ शिजत होतें याची इतरांना कल्पना येणें अशक्यप्रायच होतें. संघांतील सभासदांमध्यें एकाएकी कसलें तरी कुतुहल निर्माण झालें होतें खास; एरवीं कधींही न जमणारा भगिनीवर्ग रोज संघाचे जागेंत नियमानें भरूं लागला. चर्चा विनोद यांना ऊत आला. हास्याच्या लकेरीची शर्यत लागून राहिली. परंतु मौज ही कीं, मंदा आली कीं, तो समाज तिच्याकडे कौतुकानें पहाण्यापलीकडे काहींच करीत नसे—. प्रिन्सिपॉल-बाईंना या आठ दिवसांत फारच जोराची मागणी होती आणखी एक कुतुहलाचा भाग म्हणजे मंदासारख्या चिमुरड्या पोरीनें आपण होऊन व्याख्यान देण्याचें कबूल केलें होतें. खरें सांगायचें म्हटलें तर मंदानें आपण होऊनच व्याख्यान द्यायला संधि मिळावी याबद्दल प्रोफेसरीणबाई ( कार्यवाह ) ची मनधरणी केली होती.

कोणत्याही महिलामंडळाचा सर्वसाधारण अनुभव म्हणजे हाच कीं, व्याख्यान माथीं मारावें लागतें. खिंडींत गांठल्याखेरीज कोणतीही स्त्री व्याख्यान द्यायला तयार होत नसते; आणि ऐकायला तर त्याहूनही तयार नसते. एकादा गर्बा, किंवा सतारीची गत छेडणें,— किंवा याच प्रकारच्या करमणूकीच्या कार्यक्रमाला सर्वजणी तयार असतात. व्याख्यान देणें व ऐकणें कोणालाच कबूल नसतें. मंदाची विनंति ताबडतोब मान्य करण्यांत आली. कोणत्या ना कोणत्या कारणामुळें तरी मंदाविषयीं कुतुहल उत्पन्न झालें होतें; त्यांत या व्याख्यानाच्या तयारीची भर! त्या दिवशीं बहुतेक सर्वजणी आपल्या इष्ट व अनिष्ट मैत्रिणींसह त्या व्याख्यानाला आल्या होत्या. व्याख्यानाचा विषय ठरलेला नसल्यामुळें ज्यास्तच उत्सुकता निर्माण झालेली दिसत होती. मंदा आपल्या नेहमींच्या साध्या पोषाखांत फळकुट्याच्या साहाय्यानें बनविलेल्या व्यासपीठावर जाऊन उभी राहिली—तिनें शांतपणें भाषणास सुरवात केली.

“ माझा विषय आगाऊं जाहीर झाला नव्हता म्हणून तो मुद्दाम आधीं सांगत आहे. ‘ स्त्रिया व त्यांचे जीवन—’ हा माझा विषय आहे. हा विषय इतक्या वेळां पिळून निघाला आहे कीं, त्यांत आतां गोडी राहिलेली नाहीं असें आपणांस कदाचित् वाटेल. परंतु

खोबऱ्याचें सत्व काढून घेतल्यावरसुद्धां राहिलेली पेंड अत्यंत रुचकर लागते हें आपणांस विदित असेलच; आणि माझा दृष्टिकोण फार भिन्न आहे. स्त्रिया स्वतंत्र असाव्यात हें तत्व फार गोड दिसतें; पण स्वतंत्र म्हणजे काय—, हें जोंपर्यंत नीट ठरलें गेलें नाहीं तोंपर्यंत या वाक्याचा दुरुपयोग होणें अगदीं शक्य आहे. पुरुषांनीं वाटेल त्या बरोबर फिरावयाला जाणें हें जसें फारसें कोणी मनावर घेत नाहीं तसेंच स्त्रियांनाही इतर पुरुषांबरोबर जाण्याची स्वतंत्रता असावी एवढाच किंवा अशाच सुराचा जर, 'स्वतंत्र' या शब्दाचा अर्थ अभिप्रेत असेल तर आपण स्वातंत्र्याचा स्वैराचार असा अर्थ लावतों आहोंत हें उघड आहे. स्वैराचार म्हणजे स्वातंत्र्य नव्हें. आणि पतीबरोबर हक्काची आणि कायद्याची भाषा बोलण्याचा प्रसंग ज्या स्त्रीवर आला ती स्त्री संसाराला नालायक आहे असेंच मी म्हणेन.

एका पुरुषाला जर प्रेमानें जिंकून मुठींत ठेवतां येत नाहीं तर जगाला प्रेमानें जिंकण्याची भाषा बोलावीच कशाला !

माझे विचार वेडगळ वाटतील—. कदाचित् मी वेडी असेन पण मी बोलतें तें सत्य आहे, हें आपणांस कबूल करावें लागेल. मुंबईतील राहणी मी गेले साहासात महिने बारकाईनें पहात आहे. महिलांना करमणुकीसाठीं संघ काढावे लागतात हें मला पटत नाहीं. घरांत करमणूक काय थोडी आहे ! परंतु जगांत दुर्दैवानें मायेचे पाश न उरणाऱ्या एकलकोंड्या स्त्रिया व पतीशीं उभा दावा खेळणाऱ्या निरुद्योगी श्रीमंत स्त्रिया यांच्या चिथावणीवरूनच या असल्या क्लबांच्या भानगडींत आपण पडतों. त्या निरुद्योगी स्त्रियांना एक उद्योग मिळतो आणि आपल्या मूर्खपणाच्या जोरावर त्यांची पोळी पिकते. इतर ठिकाणीं चुकूनसुद्धां न मिळणारा मान त्यांच्याकडे आपण होऊन चालत येतो...शेवटीं एकच सांगावेसें वाटतें कीं, आपल्यापुढें इतकें बोलल्यानंतर, 'बोले तैसा चाले—' या साधु–उक्ति प्रमाणें मी आपल्या सभासदत्वाचा राजिनामा आज देत आहे—" इतकें बोलून मंदा व्यासपिठावरून खालीं उतरली व इतरांच्या रागलोभांची यत्किंचितही पर्वा न करतां तडक हॉल बाहेर चालती झाली.

उरलेल्या सभासदांत काय गोंधळ माजला असेल याची कल्पना करण्याचेंसुद्धां तिला कारण नव्हतें असें दिसलें. सदाशिव संध्याकाळीं घरीं आला तों त्याला आश्चर्याचा धक्का बसला ! मंदा खुशींत होती आणि नेहमींप्रमाणें ती त्याच्या भोंवता पिंगा घालीत होती. त्यानें कोट काढल्याबरोबर तिनें पायानें दरवाजा जरा पुढें ढकलून त्याच्या गळ्यांत आपले

गौरवर्ण बाहू टाकले आणि त्याच्या खांद्यावर मान ठेवीत ती म्हणाली—"—म्हटलं उद्यां पहिली तारीख आली आहे—, आपण उद्यां जागा बदलूं या !—"

सदाशिवाच्या आश्चर्यांत आणखीं भर पडलीं.

"—मला आतां कांहींसुद्धां विचारूं नका. मी म्हणतें आहे त्याप्रमाणें करा. आपल्या दोघांच्या फायद्याचीच ती गोष्ट आहे, पुन्हां केव्हां तरी मी आपल्याला सगळं सांगेन—" असें म्हणून मंदानें त्याच्या खांद्यावर आपलें डोकें घुसळलें व अश्रूंना वाट करून दिली. सदाशिव जास्तच आश्चर्यचकित झाला !

सदाशिवानें जागा बदलली, मंदानें संघांतून अंग काढून घेतलें. पण संघ पूर्ववत् चालूंच राहिला. 'बालादपि सुभाषितं ग्राह्यं' हें नुसतें आपलें संस्कृतांत वाचावयाचें असतें. जगाला कोणाच्याही उपदेशाची जरूरी नसते, हाच त्याचा खरा अर्थ !

———

# गोड घोंटाळा !

घरांत बसून अतिशय उकडत होतें म्हणून भर उन्हाचा छत्री घेऊन मी बाहेर पडलों. तसें पाहिलें तर तीन साडे तीनचा सुमार झाला होता, परंतु सप्टेंबर सरताचीं तीं उन्हें होतीं, हें लक्षांत घेतलें म्हणजे 'भर उन्हाचा' या शब्दांना भरपूर अर्थ होता, याची खात्री पटेल. इतर लेखकलोक म्हणतात त्याप्रमाणें घरांत उकडणें ' मी ' म्हणत होतें आणि बाहेर ऊन म्हणजे मीच म्हणत होतें. परंतु घरांतल्या उकडण्याच्या भरीला माझी आई दुपारीं बारा वाजल्यापासून सारखीं मी या सर्वनामावर अट्टाहासानें भर देत होती. तेव्हां या घरांतल्या मी गुणिले मीला तोंड देण्या इतकें धैर्य माझ्या अंगांत नसल्यामुळें बाहेर एक चक्कर मारून यावी आणि ' पिवळा डँबिस ' सिनेमा ज्या थिएटरांत लागला असेल त्या चित्रमंदिरावरून एकदां सकौतुक नजर टाकून यावी या स्तुत्य विचारानें मी बाहेर पडलों.

वडिलांच्या पश्चात् जी कांहीं थोडी थोडकी पुंजी होती तीवर आईनें मला लहानाचा मोठा केला होता. माझ्याकरतां तिनं सासरचीं व माहेरचीं पुष्कळ बोलणीं सोसलीं होतीं. शेवटीं तिनें मला घेऊन निराळें बिऱ्हाड केलें होतें. त्यावेळीं मी चार वर्षांचा असेन. त्यावेळेपासून तों आजतागायत सुमारें २० वर्षें तिनें माझ्याकरतां, माझ्या आशेवर मोठ्या धैर्यानें

दिवस काढले होते. तेव्हां सहाजिकच तिची इच्छा ही कीं, ज्याच्याकरतां आपण येवढा त्रास सोसला त्यानें तें स्मरून वागलें पाहिजें. परंतु पांच वर्षांचा प्रभाकर ज्या गोष्टी बिनतक्रार मान्य करील त्या गोष्टीस पंचवीस वर्षांच्या एम् ए झालेल्या प्रभाकराला मान्यता देणें कठीण जाईल हें ती विसरत होती. आणि त्यामुळें 'मुलगा आपलें ऐकत नाहीं' हा मंत्र तिनें अलिकडे जपायला सुरूवात केली होती.

संध्याकाळीं दिवे लागणीला माझें घरीं न येणें, आल्यावर हातपाय न धुणें, देवाविषयीं आस्था न दाखविणें इ. अत्यंत क्षुल्लक गोष्टींतहीं तिचें माझें पटेनासें झालें; माझी आई बालबोध वळणाची होती. देवधर्मावर तिचा कमालीचा विश्वास होता. त्या बाबतींत तिचीं कमालीचीं ठाम मतें बनलीं गेलीं होतीं आणि या बाबतींत ती कोणाचाही विरोध सहन करून घेणारी नव्हती. मला हें सर्व मान्य होतें, आणि त्याप्रमाणें अत्यंत प्रामाणिक तऱ्हेनें मी तिच्या भावना न दुखवितां वागण्याचा प्रयत्न करीत असें. परंतु मी जरी मुलगा असलों तरी मलाही कांहीं भावना असूं शकतील हें तिच्या गांवींहि नव्हतेसें दिसत असें. पांच वर्षांच्या चिमुकल्या प्रभाकराच्या विजारीची नाडी बांधण्याचें काम आईनें पुढें किती दिवस करावें यालाहि कांहीं तरी मर्यादा असतेच ना? अगदीं नक्की हाच आम्हां मायलेकरांचा वांधा होता. तिच्या मतानें मला अजून सहावें वर्ष लागायला कितीतरी अवकाश होता. आणि काळानें मला सव्विसावें वर्ष बहाल करावयाचें ठरविलेलें दिसत होतें.

अलिकडे पांचसहा वर्षें हा आमचा लढा अव्याहत चालूं होता. प्रथम प्रथम मी तिला भिऊन वागत असें, पण पुढें रोजच्याच मरणाला आतां रडण्याचें कांहीं कारण उरलें नसल्यामुळें मी थोडासा बेपर्वाईनें वागूं लागलों. याचाच अर्थ आईनें मनाशीं लावला कीं, आतां हा नवीन जोडीदार मिळण्याविषयीं आतूर झाला असावा आणि यामुळेंच याचें घरांतलें लक्ष उडालें असावें. प्रामाणिकपणा पत्करून बोलायचें म्हणजे जर लग्न झालें असतें तर मला नको होतें असें मुळींच नव्हतें. उलट एक दोन वेळेस माझ्याबरोबर बी. ए. च्या वर्गांत असलेल्या एका मुलीला तसें विचारावें असें बरेच दिवस माझ्या मनांत घोळत होतें. परंतु त्या विचाराला मूर्त स्वरूप मिळण्याचें अगोदरच मला कळून आलें कीं तिचा पहारेकरी आधींच ठरलेला होता. त्या गृहस्थाची प्रथम पत्नी ओढ्यावर जाण्याचाच काय तो अवधि होता. हें ऐकल्यावर मी लग्नाच्या बाबतींत निराश मात्र कधींच झालों नाहीं. फक्त प्रेमाच्या भानगडींत डोळे मिटून न पडतां सर्व सारासार विचार डोळे उघडे ठेवून करायचा

आणि नंतर डोळे मिटून माळ घालायची हा निर्धार मनाशीं कायम केला. त्यामुळें चार-दोन आण्याचें आइस्क्रिम चारून थंडगार करण्याचें किंवा अशाच प्रकारच्या आचरटपणां-पलीकडे मीं फारशी उडी मारली नव्हती.

आईनेंच जेव्हां मात्र हा प्रश्न काढला तेव्हां माझें धाबें दणाणलें. मला एका जोडीदाराची आवश्यकता होती, परंतु आईची दृष्टी निराळी होती. तिला सून नांवाचा एक रखवालदार मुलाच्या वर्तनावर नियंत्रण ठेवण्यास पाहिजे होता. आणि म्हणूनच जेव्हां आईच्या तर्फे मुली सांगून येऊं लागल्या तेव्हां मला पुष्कळ वेळां आईचें मन दुखविणें भाग पडे. आईचें मन दुखवणें ही गोष्ट तितकीशीं सोपी नाहीं याचा अनुभव आजपर्यंत मला भरपूर वेळां आला होता. परंतु यावेळीं लग्नाचें बाबतींत मात्र मीं तिचें न ऐकण्याचें ठरवून टाकलें होतें.

विशेषतः एका मुलीचे बाबतींत आज आईनें जवळ जवळ सत्याग्रहच आरंभिला होता. दुपारीं जेवणाचे वेळीं ठरविल्याप्रमाणें आईनें सुरवात केली होती—" दिवसें दिवस माणसें अशीं तऱ्हेवाईकपणानें वागूं लागलीं आहेत कीं नाहीं—"

मी पोळीचा तुकडा तसाच पुन्हां पानांत ठेवला. आईनें पुढें सुरवात केली—" मेल्यानों, लग्नाचीं वयें झालीं तरी तुम्हाला कसलं डोंबलाचं शिक्षण आवडतं कुणास ठाऊक ? इकडे तूं हा असा ओढून धरणार अन् तिकडे मुली पहाव्या तो एकीवर एक चढ. शिकून शिकून काय गवणाराशीं लग्न लावणार आहेत ? " आई म्हणाली.

" आई, एका प्रांताला एकच गव्हर्नर असतो अन् तोही बिचारा आधींच पटकावलेला असतो बहुतकरून. गव्हर्नरसाहेबांची तुला कशाला काळजी ? त्यांतून धर्म आड येईल " मी शांतपणें म्हणालों. आईनें रागारागानें पळीभर भाजी माझ्या पानांवर जास्त ढकलली. मला पाहिजेच होती.

" मुलींचीं शिक्षणं हल्लीं फार बोकाळलीं आहेत. परवां आपलं सहज ऐकलं. बेळगांवची राहाणारीं माणसं. मुलगी चांगली दोन मुलांची आई. घरांत नवरा, सासू, सासरा सगळींजणं आहेत. अन् म्हणे सासऱ्यानं मुलीला पुण्याला तिच्या भावाबरोबर राह्यला तिला बिऱ्हाड करून दिलं. मुलांनां म्हणे आजोळीं ठेवून दिलं. आणि पाह्यलं तर मुलगी विग्रंजी ६ वींत. ही काय हौस का चेष्टा ? मग उद्यां जर त्या पोरांच्या आयुष्याचे धिंडवडे उडालें तर मग कुणाला धरायचं—? " आई म्हणाली.

" आई, हें बघ, तूं आतां कुणाकुणाची काळजी करणार आहेस ? ते कोळसे तडतडणारे दिसत आहेत. तुझीच आपली काळजी घे म्हणजे झालं." मी हंसत म्हणालों.

" तेवढं बोलणं पाहून घ्या तुझं ! अगदीं काळजी केल्याशिवायच लहानाचा मोठा झालास कीं नाहीं ? आणि आतां मला शिकवतो आहेस. त्यापेक्षां आपल्या सगुणाबाईच्या पद्मीशीं लग्न करून घेईनास—" हरदास मूळ पदावर येतो त्याप्रमाणें आईनें म्हटलें.

" आई पद्मी पावडर लावते म्हणून तूंच म्हणत नाहींस का ?" मी बारीक डोळे करून आईकडे पहात म्हणालों. आई उसळणार हें मला माहीत होतें.

" मग—आपल्या घरांत काय तांदुळाची पिठी नाहींच वाटतं ? काय बोलतोस—? लग्न होईपर्यंत हे थेरंथेरे चालतात—. एकदां गांठ बसली कीं बंबाखालच्या राखेंतून हात निघतील तेव्हांच पावडरची आठवण होईल—, समजलास !" नंतर थोडावेळ युद्धापूर्वीची शांतता पसरली. ढग जमून येत होते. वादळास सुरवात केव्हां होईल हाच फक्त प्रश्न होता. " मग सगुणाबाईची मुलगी तुला पसंत आहे का ?" आईनें शांतपणें म्हटलें.

" नाहीं." मी तितक्याच शांतपणें परंतु निश्चयाच्या स्वरांत म्हणालों.

आईनें हातांतली पळी दूर फेकली. पुढचें साहित्य तसेंच दूर सारलें; आणि मला मागचा भातहि न वाढतां माजघरांत जाऊन एका फाटक्या पोत्यावर ती पडून राह्यली. झालें एवढें जेवण पुरें झालें असा पोक्त विचार करून मी पानावरून उठलों व आईपाशीं तसाच खरकट्या हातानें जाऊन बसलों. आईनें आपली दृष्टि आढ्याला लाविली होती.

" आई असा त्रागा करूं नकोस " मी आर्जवाच्या सुरांत म्हणालों

" एकदां मी उलथलें म्हणजे मग तूं लग्न करशील. तुला फटाकड्या पोरी पाहिजेत, मला काय समजत नाहीं ! तुम्हां तरूण मुलांना आई ही अडगळ वाटत असते. माझी अडगळ घरांतून गेल्याशिवाय तुझी मेमसाहेब कशी बरं तूं आणशील ! मला काय डोळे नाहींत हें समजायला !"

" आई तुला शंभरदां सांगत असतो कीं, मला तूं अडगळ वाटत नाहींस. उलट तूं मला वाढवलंस म्हणून आज मी एवढा मोठा झालों, हें मला कबूल. असं काय करतेस ! " मी म्हणालों.

" मग पद्मीशीं लग्न करशील !" आईनें माझ्याकडे टक लावून पाहात म्हटलें.

" अग पण तिच्याशींच कां ! हा माझ्यावर जुलूम कां करतेस ! मला ती मुलगी बिलकुल आवडत नाहीं, यांत माझा काय दोष !" मीं कळवळून म्हणालों

" मग मीहि तुला आवडत नसेनच—" आई संतापानें म्हणाली. मला तशाहि परिस्थितींत हसूं आल्या वाचून राहिलें नाहीं. हा आईचा प्रश्न कितपत तर्कशुद्ध होता ?

" हें तूं कशावरून म्हणतेस ! तुला आवडलेली मुलगी मला आवडली नाहीं म्हणजे तूंहि मला आवडूं नयेस असा कुठें नियम नाहीं. उगीच काय वेड्यासारखें—! " मी म्हणालों

" मी वेडी आहेच ! तें तर ठरलेलेंच आहे. आई कधीं शहाणी असते ! तिचीं मुलं शहाणीं असतात. ऐका, आमच्या विद्वान शिरोमणी चिरंजीवांची ही भाषा ऐका. "

त्यानंतर मी तेथून उठून गेलों. थोड्यावेळानें वारें उतरल्यावर पुन्हा गाडें सुरळींत चालूं लागेल ही मला खात्री होती. आणि असा प्रकार सहन करण्यापेक्षां बाहेरचा उन्हाळा, त्रास सहन केलेला काय वाईट, या विचारानें मी त्या दिवशीं बाहेर पडलों होतों. बाहेर पडलों खरा पण कुठें जायचें हें निश्चित ठरलें नसल्यामुळें मी उगीचच वाट फुटेल तिकडे जात होतों. जातां जातां आकाशांत दूरवर दिसणाऱ्या काळ्या निळ्या झालेल्या भागाकडे सहजच माझी नजर गेली. कदाचित् संध्याकाळीं पाऊस येईल—! या पेक्षां जास्त लक्ष द्यायला मला सवड नव्हती. मी रस्त्यानें चाललों होतों पण डोक्यांत विचारांची ही गर्दी होती.—खरंच, यांत कुणाकडे दोष होता ? 'मातृदेवोभव' म्हणून टाहो फोडणारे आर्यसंस्कृतीचे रखवालदार मला दोषी ठरवतील. ज्या आईनें आपणाकरतां अमूक केलें, तमूक केलें, इतकीं दुखणीं काढलीं, इतका त्रास सहन केला, त्या आईच्या विरुद्ध बंड ! काय चेष्टा आहे ? आईनें म्हटल्यावर मुलानें तिचें ऐकलेंच पाहिजे. तिची मिजास राखलीच पाहिजे. म्हणोत बिचारे ! परंतु माझ्या आवडीनिवडीची वाट काय ! तिच्या आवडीनिवडीप्रमाणें तिनें आपलें आयुष्य आजपर्यंत काढलें. मी तिला कोणत्याहि बाबतींत दुखावलें नाहीं, असं असतां आतां माझ्या आवडीनिवडी तिनें कां पाहूं नये ? आपलाच हट्ट कां चालवावा ! आई ही व्यक्ति स्खलनशील असूंच शकत नाहीं काय ! मला जी व्यक्ति बिलकूल पसंत नाहीं ती व्यक्ति केवळ आईला आवडते म्हणून मी जन्माची जवळ करावी काय ? हा काय जुलुम—!

—आणि माझ्या सरलेची काय वाट ! मे महिन्यांत आईला न सांगतांसवरतां मी स्वतः जाऊन, पाहून, पसंत केलेली माझ्या एका मित्राच्या मित्राची बहीण सरला. तिची वाट काय ? मीं हा एक खरोखरच गुन्हा केला होता. आईला न सांगता येथपर्यंत मजल कां मारली हें माझंच मला सांगता येणार नाहीं. कदाचित् त्यावेळेला आईनें या प्रश्नाला हात घातलेला नसल्यामुळें आपण तिला कसें सांगावें या भीतीनें मीं तिला आजपर्यंत या मुलीविषयीं आणि तिच्या संबंधीं बांधलेल्या अपेक्षेंविषयीं कांहींही सांगितलें नव्हतें. मीं दुष्टपणानें तिला अंधारांत ठेविलें होतें असं नाहीं. परंतु प्रथम चूक केली, नंतर लाजमुळें म्हणा अगर माझी पसंती आईला एकदम कधींच मान्य होणार नाहीं या आजपर्यंतच्या इतर गोष्टींतल्या अनुभवावरून म्हणा मी तिला अजून या बाबतींत बोललों नव्हतों. आज सांगूं उद्यां सांगूं करतां करतां वाड्यांतल्या तिच्या ओळखीच्या सगुणाबाईची पत्नी एकाएकीं क्षितिजावर झळकूं लागली आणि नंतर मला तोंडच उरलें नाहीं. आतां दुप्पट जबाबदारी माझ्यावर येऊन पडली होती. आईची पसंती धुडकावून लावावयाची आणि आईला माझी पसंती मान्य करावयाला लावायची, या पेक्षां अजिक्य ठरलेल्या कैलास पर्वतावर आरोहण करणें जास्त सोपें होतें. सरलेच्या भावाला व तिच्या वडलानां तूर्त घाई नव्हती. मुलगी मॅट्रिकच्या वर्गात होती. तिची परीक्षा पार पडली तर बरेंच या विचारानें त्यांनीं माझेपाशीं निकडीचें बोलणें काढलें नव्हतें हें त्यांतल्यात्यांत बरें होतें. परंतु हा लपंडाव किती दिवस चालणार ? आणखी पांच सहा महिन्यानंतर हा जर्मन वसाहतीचा प्रश्न केव्हांना केव्हांतरी पुढें येणारच.

मला कोणताच ठाम विचार सुचत नव्हता. नादांत मी पुढेंच चाललों होतों. एकाएकीं जोराचा वारा सुटल्याचा भास झाला. त्यासरशीं मी भानावर आलों. इतस्ततः नजर टाकली तों-तों काय ? एक तासापूर्वीचा देखावा पार बदलून गेलेला दिसत होता.

ढगानें आच्छादून टाकल्यामुळें सूर्याचें दर्शन सुद्धां मुष्कील झालें होतें. ओबडधोबड आकाराचे काळेकुट्ट राक्षस आकाशांत एकमेकाच्या पाठीमागें हात धुवून लागल्यासारखें धांवत होते. एकादां चिमणा ढग धावतां धावतां थकून गेल्यासारखा होऊन बलिष्ठापुढें मुकाट्यानें नम्र होत होता. सृष्टींत सुद्धां बलिष्ठाचें वर्चस्व असतें यांत शंका नाहीं. राक्षसांची फौजच्याफौज आकाशमार्गानें चढाई करून वर येत होती. लांबवरून दिसणारे निळसर मेघराज जवळ आल्यावर खरोखर किती काळ्या कुट्ट अंतःकरणाचे असतात याचा पुरावा स्पष्ट दिसत

होता. मध्येंच लपकन लवणाऱ्या विजेच्या प्रकाशामुळें त्यांच्या विजयाचा आसुरी आनंद रस्त्यांतून चालणाऱ्या मनुष्यमात्रांस क्षणमात्र अंधारी आणीत होता. मध्येंच खवळलेल्या समुद्राच्या ' की जय ' घोषाप्रमाणें मेघांचा गंभीर ध्वनि दशदिशा दणाणून सोडीत होता.

वाऱ्यानें तर ताळच सोडलेला होता. कोणत्या दिशेनें वाहावें याचा कांहीं ठराविक निश्चय न झाल्यामुळें लहान मुलांच्या लहरी स्वभावाप्रमाणें वाटेल तिकडे तो आपला मार्ग काढीत होता. एकाद्या खवचट मुलाप्रमाणें जातां जातां खोडी काढण्याकरतांच कीं काय, म्युनिसिपालिटीची केराच्या पेटींत दडवलेली अब्रू भर रस्त्यावर वाटेल तशी पसरून देत होता. नागरिकांच्या डोळ्यांत धूळ फेकण्याचें मी मी म्हणणाऱ्या पुढाऱ्यांनाही न साधणारें काम सहजासहजीं करून दाखवीत होता. आणि असा खट कीं तरुणींच्या पदराशीं भर रस्त्यांत झोंबी खेळत होता. आणि पदर सांवरतांना उडालेली त्यांची धावरगुंडी पाहून जणूं काय हंसत हंसत पुन्हां पुढें निसटून जात होता. " इश्श्य ! काय मेला वारा तरी, " म्हणून कित्येक तरुणींनीं त्याला हंसत हंसत शिव्या दिल्या असतील आणि कित्येक तरुणांनीं त्याचकरितां त्याला धन्यवादहि दिले असतील.

हळू हळू अंधार दाटूं लागला होता. मधूनच एकादा टप्पोरा मोती मातींत मिसळून जात होता. लांबवरून येणाऱ्या पावसाच्या सरीचा आवाज स्पष्टपणें ऐकूं येऊं लागला; त्यासरशीं मी छत्री उघडून डोक्यावर धरली. आणि—याचक्षणीं एक सुमारें १८–१९ वर्षांची तरुणी समोरून मोठ्या लगबगीनें जात असलेली मीं पाठमोरी पाहिली—. कांहींतरी वाटलें; काय वाटलें हें मला नक्की सांगता येणार नाहीं. परंतु कुठें तरी या मुलीला पाहिलें असावें असें वाटूं लागलें.

तिच्या हातांत छत्री नव्हती—आणि भिजण्याचें टळावें म्हणून ती आपल्या फाटक्या मद्राशी वहाणा संभाळून झपाट्यानें चालत होती. तोंड दिसल्याखेरीज ओळख पटणार नाहीं या विचारानें मीं जोरानें चालून तिला गांठण्याचें ठरविलें. अर्थात् नेहमींच दुसऱ्याच्या जिवावर उदार असलेल्या रस्त्यांतल्या सायकलवाल्यांना—, कोपऱ्याकोपऱ्यांनीं मुलींच्या चेहऱ्यांचें दर्शनसुख घेण्याकरितां उभें असलेल्या ठराविक तमास–गिरांना आणि परमेश्वरावर हवाला ठेवून धूम तडक रस्त्यांतून पळत जाणाऱ्या शाळकरी मित्रांना संभाळून हें सर्व काम साधावयाचें किती कठीण आहे हें सांगून समजणार नाहीं. परंतु माझ्या सुदैवानें माझी अटकळ खरी ठरण्याचा प्रसंग आयता चालून आला. गर्दीतून आणि नुकत्याच सुरू

झालेल्या पावसाच्या तडाक्यांतून क्षणभर सुटण्याची आशा म्हणून एका निवाऱ्याच्या जागेकडे तिनें पाह्यलें असावें. आणि ती सरला होती— ! क्षणमात्र काय करावें हें मंला सुचेना. दुसरी एकादी मुलगी असती तर '—मला काय त्याचें ' हा मंत्र जपत मीं आपली सुटका करून घेतली असती. परंतु पांच महिन्यापूर्वी पाहून पसंत केलेल्या मुलीवर हा प्रसंग होता. तिला छत्री द्यावी तर आपली गैरसोय; त्यांतून मी फिरत फिरत बराच दूर आलों असल्यामुळें ओळखीचें असें एकही दुकान आसपास नव्हतें. न द्यावी छत्री तर तिकडून ही पंचाईत. प्रसंग असतात क्षुल्लक. परंतु त्या त्या व्यक्तीच्या दृष्टीकोनांतून पाहिलें म्हणजे त्याचें गांभीर्य दिसून येतें. माझ्या दृष्टींतून पाह्यलें तर हा मला पेंचच होता.

मला वाटतें सरलेनें मला पाह्यलें असावें. परंतु तिनें कां कोणास ठाऊक ओळख न दाखविण्याचें ठरविल्यासारखें दिसलें. एकवार तिनें मागें पाहून, पुन्हां झपाझ्यानें चालण्यास सुरवात केली. पाऊस चालूच होता. जनाची आणि मनाची परवा न करतां मी ' सरलाबाई ' अशी पोक्तीपुरवती हांक मारली. सरला उभी राहिली. पदर भिजलेला होता. ओल्या हातानें भिजलेले केस सांवरीत ती उभी होती.

" छत्रींत येतां कां ? " मी किंचित् लाजून म्हणालों. मला वाटलें होतें, कीं हा प्रश्न विचारण्याचा अवकाश कीं हुंदाडणाऱ्या गाईप्रमाणें पाठीवरच्या शेपट्याचा एक फलकारा या खांद्यांवरचा त्या खांद्यांवर उडवून ती विंचू डसल्याप्रमाणें चालती होईल. परंतु सरलेनें तसला कांहींएक प्रकार न करतां मुकाट्यानें ती छत्रीच्या आश्रयाला आली. आतां माझी अवस्था मात्र कांहीं विलक्षण झाली. मनांतून आनंद वाटत होता. तिच्या खांद्यावरच्या पदराचें एक टोक माझ्या कोटाला चाटून जात होतें हें मला दिसत होतें. पण कोणीं पाह्यलं तर ! हा जगाच्या आदीपासून आतांपर्यंत तरुणानां हरएक ठिकाणीं नामोहरम करून सोडणारा प्रश्न पुढें दत्त म्हणून उभा राहिला. काहींतरी बोललें पाहिजे हें दडपण दूर करण्याकरतां म्हणून मी म्हणालों—

" ओळखीचा वाटतो आहे कां मी ? "

" अनोळखी चोरापेक्षां ओळखीचा बरा म्हणतात नं–" सरलेनें उत्तर केलें.

" मुळींच नाहीं, ओळखीचा चोर जिवानिशीं मारी म्हणून म्हणतात " मी गांभीर्य कायम ठेवण्याचा प्रयत्न करीत म्हणालों.

" तरीच म्हटलें मे महिन्यांत पसंतीचा शिक्का मारून जो चोर पळाला तो सप्टेंबर संपत आला तरी मागें ठेवलेल्या जिवाचं काय झालं ह्याची विचारपूससुद्धां करायला कसा आला नाहीं ? का पकडलं कीं नाही ?—" सरलेनें हातांतील पुस्तकांचा ढीग नीट सांवरीत म्हटलें.

" तुला वाङ्मयाचा बराच नाद दिसतो आहे कीं ?—" मी हंसून म्हणालों.

" इतकी नको बरं कां काळजी लागायला ? अजून कांहीं मी इतकी वायां गेलें नाहीं." सरला म्हणाली. आणि आम्ही मनमोकळेपणानें हंसलों. आजूबाजूच्या लोकांच्या नजरा चुकवीत आम्ही चाललों होतों. जरा वेळानें आठवलें कीं पावसांत, एका छत्रींत हिंडण्याच्या सुखालासुद्धां शेवट हा असतोच.

" बरं, सरले, पाऊस तर कांहीं थांबला नाहीं. आतां काय करायचं ? " मी म्हणालों.

" घरीं चलायचें मला पोहंचवायला अन् काय ! लाडक्या जांवयाला कांहीं चहापाणी नको सासूबाईनीं द्यायला ! अन् त्यांतून पुण्याच्या रस्त्यांतून मुलीला लग्नाच्या आधीं एका छत्रींत घेऊन आले हा पराक्रम म्हणजे—, काय तोंडच्या गप्पा आहेत ? " सरलेनें हंसत उत्तर केलें.

माझ्या डोक्यांत यापेक्षां निराळाच विचार घोळत होता. आईची आणि सरलेची ओळख करून दिली तर—? पद्मेचें भूत गाडून टाकायला हा तोडगा उपयोगीं पडेल का ? साहसाचा भाग होता, पण प्रयत्न करायला काय हरकत आहे ? आईला सरला आवडली आणि क्रमानें तिला सगळा प्रकार समजावून सांगितला तर आई विरुद्ध जाईल ? एक मन सांगे सरला खात्रीनें फड जिंकील अन् एक मन सांगे कीं या साहसांत आपण बऱ्याचशा गोष्टी गृहीत धरून चाललों आहोंत. काय असेल तें असो. सरलेला आज आपल्या घरीं न्यावयाचें माझ्या डोक्यांतून जाईना. मीं हळूच तिच्याकडे पाहिलें.

" सरले, आमच्या घरीं येतेस का ? डोळे मोठे करूं नकोस, छत्रीचें पाणी जाईल आंत. काय हरकत आहे ! आई आहे घरांत अन्—" म्हणून मी माझा हेतु तिला सांगितला.

" येईन बापडी, पुढें नाहीं तरी तुम्ही लगाम खेंचाल तसं नाचायचं आहेच तर आत्तांच त्याची संवय करून पहातें. "

इतक्या लवकर कबुली मिळेल याची मला कल्पनाही नव्हती. झालेला आनंद व्यक्त करण्याकरितां म्हणून मी हंसत हंसत म्हणालों, " लग्न झालेल्या बायका जर इतक्या सुतासारख्या सरळ वागतील—."

" अशा वागतील तर संसार सुखाचें होण्याऐवजीं घराचं इस्पितळ होईल, माहिती आहे ? लग्न झालेल्या बायका अशा पावसांत कधीं बाहेर पडायच्या नाहींत. जर पडल्या तर ओळखीच्या छत्र्यांत कधीं शिरायच्या नाहींत. भिजतील अन् घरीं जाऊन डॉक्टरांना बोलवा म्हणून म्हणतील. लग्न झालेल्या बायका म्हणजे मृच्छकटिक नाटक समजलांत कीं काय ? आणि आतां लवकर पाय उचला. माझी दांतखिळी बसायची वेळ आली आहे—" सरलेनें म्हटलें.

" मीं म्हटलें केव्हां थांबणार आहेस कुणास ठाऊक—! " पुढें पाऊल टाकीत मी म्हणालों. परंतु घरीं न्याराच प्रकार वाढून ठेविला होता.

मोठ्या आशेनें घरीं आलों परंतु दाराला कुलूप पाहून थक्कच झालों. इतकेंच नव्हे तर सगुणाबाई आणि पद्मावती ही दुक्कल माडीवरून आमच्याकडे पाहून कांहींतरी कुजबुजत आहे असा भास झाला. ही घटना नवीनच होती—कधींही घराबाहेर न पडणारी मातामाउली आजच अशी परागंदा झालेली पाहून माझ्या तोंडचें पाणीच पळालें. सरलेनें माझ्याकडे पाहिलें. मीं तिच्याकडे पाहिलें. यापेक्षां जास्ती तें आम्ही काय करूं शकणार होतों ? इतक्यांत मागच्या बाजूनें काय वाजलें म्हणून मी वळलों. हातांत किल्ल्यांचा जुडगा घेऊन पद्मा उभी होती. किल्ल्या माझ्यासमोर पडल्या. आणि पद्मा मागच्या पावलीं परतली. जातांना सरलेकडे एकवार आढ्यतेच्या दृष्टीनें पाहून पद्मा गेली हें मीं पाहिलें. दोन मांजरी जशा एकमेकींकडे पाहतात तसाच कांहींसा प्रकार—.

" कोण ही ? " सरलेनें डोळ्यानेंच प्रश्न केला.

" आहे झालं—! " मी डोळ्यांच्याच भाषेंत उत्तर केलें. आईनें ठेवलेल्या किल्ल्यांचा उपयोग करून घरांत प्रवेश मिळवला खरा—पण पुढें काय हा प्रश्नच आला. त्यांतून पुन्हां शत्रूच्या माऱ्याखालीं आम्हांला कोणतीहि हालचाल करावी लागणार होती हें उघड होतें. आई आत्तां घरांत असती म्हणजे हा प्रश्न उद्भवलाच नसता. सगुणाबाई सहकन्यका आम्हांवर पाळत ठेवणार हें उघड होतें. मी मुकाट्यानें खिडकीचे पडदे लावूं लागलों—. सरला झटकन् पुढें झाली.

" वा: ! पडदे लावून घेण्यापेक्षां पडदे मोकळे ठेवणं यांतच आपण जास्त सुरक्षित आहोंत बरं का ! बरं पण असं केलं तर ! "—

" कसं—?" पुन्हां पडदे पूर्ववत सारून मी म्हणालों.

"कीं मी आतां ही छत्री घेऊन घरीं जातें आणि उद्यां परवां छत्री परत करण्याच्या निमित्तानें अशीच पुन्हां केव्हांतरी येतें. मनास नाहीं न येत?" सरलेनें– म्हटलें. वास्तविक हा मार्ग रास्त होता यांत शंका नव्हती, परंतु सरला आल्यासरशी तशींच परत जाणार हें कांहीं तितकेसें मनाला पटेना. प्रथमच तिनें छत्रींत यावयाचें नाकारलें असतें तर प्रश्नच उरत नव्हता. पण आतां मात्र पंधरा मिनिटांच्या सहवासानें आणखी सहवासाची आशा दुणावली. एक वेड्यासारखी कल्पना आली कीं सरला आतां इकडेच राहली तर—? अर्थात् तें शक्यच नव्हतें. निदान चहा घेतल्याशिवाय तर खास सोडणार नाहीं. आणि तो सुद्धां मालकिणीच्या थाटांत तिच्याचकडून करून घेतला तर—?

" सरला आतां आली आहेस तो चहा घेऊनच जा—"

" म्हणजे करून, मला देवूनच जा—! मोठे गोडाजीच कीं नाहीं." असें म्हणून तिची तिलाच लाज वाटून ओशाळगत मुद्रेनें तिनें बाहेर झिमझिम पडणाऱ्या पावसाकडे नजर वळविली —.

" पुढें केव्हांतरी या घरांत येणारच तेव्हां आत्तांच या घराचा भूगोल पाठ करून ठेव म्हणजे झालं—. मधून मधून थोडासा इतिहास सांगेन तुला मग तर झालं—" मी कोट काढीत म्हणालों.

" म्हणजे तुम्ही स्वयंपाक घरांत येवून बसणार कीं काय ! मातामाऊली मध्येंच आल्या तर—!" सरला भुवयांचें धनुष्य करीत म्हणाली.

" बरं तर चल तर तुला सगळं दाखवून देतों. आणि मग लग्न होऊन चारपांच वर्षांनंतरचा आंबला विटलेला बुरसट नवरोजी बनून बाहेरच्या बाजूस येतों आणि नवाकाळांतले अग्रलेख वाचीत बसतों. " बोलतां बोलतां सरलेच्या दंडाला मी धरलें आणि तिला आंत ढकललें. दंडावरचा हात सरलेनें दूर न सारलेला पाहून मला तितकेंच बरें वाटलें. घरांतील सर्व खिडक्या, दारें सताड उघड्या ठेवून जणूं काय स्वतःच्या निर्मळपणाची साक्ष देण्याकरतां जगाला आव्हान देऊन, मी सरलेला स्वयंपाकघरांतील आवश्यक वस्तु काढून दिल्या व एक मोडकीतिडकी ताण ठेवून बाहेरच्या बाजूस येऊन बसलों. आमचे शत्रु समोरच्या गॅलरींतून टेहळणीची कामगिरी बजावीत होते. घरकामाला चुकून स्पर्श न करणाऱ्या सगुणाबाई दुभत्याच्या कपाटांतील बागुरडे घालविण्याच्या निमित्तानें गॅलरींत

टाण मांडून बसलेल्या मी पाहिल्या, आणि पाठीमागें उभी असलेली पद्मा आपलें मुंबई इलाख्याचें भूगोलज्ञान पुस्तकाच्या सहाय्यानें उजळून पहात होती. पुष्कळ वेळां कामांत राम सांपडतो म्हणून म्हणतात तो असा.

बसल्या बसल्या आईची वाट पहाणें हाच मला उद्योग शिल्लक राहिला होता. आणि आज दुपारीं ज्या आईच्या सहवासाला कंटाळून मी वैतागानें उन्हाचा बाहेर पडलों होतों त्याच आईची मला आतां चातकपक्षासारखी तहान लागली होती. दुपारीं प्रत्यक्ष सहवासानें उद्वेग आणणारी आई, आतां आपल्या अनुपस्थितीमुळें जास्तच चीड आणीत होती. वेळ जाण्याकरतां म्हणून मधूनच माजघरांतून दूरवर दिसणाऱ्या सरलेच्या पाठमोऱ्या आकृतीकडे थोडावेळ पहावें, कोटावर बसलेला धुरळा उगीचच टिचकीनें उडविल्याप्रमाणें करावें आणि पुन्हां समोरच्या दरवाजाकडे आईच्या त्या बटु मूर्तीचें दर्शन घेण्याकरतां मोठ्या आशेनें पहावें हा माझा कार्यक्रम चालू होता.—आणि अनपेक्षित धक्का म्हणतात तसें मला एकदम झालें. एरवीं मी डगमगलों नसतों. परंतु आतां धड विचार करण्याच्या मनस्थितींत मी नसल्यामुळें जें नको होतें करायला तें नेमकें करून मी चुकलों होतों.

धांवत जाऊन "माणसं आलीं आहेत. बाहेर येऊं नकोस." म्हणून झटकन सांगून स्वयंपाक घराचा दरवाजा मी लावून घेतला, आणि धडधडणाऱ्या छातीवर मी हात ठेवीत पुन्हां बाहेर येऊन बसलों.—आंत येणारी व्यक्ति सरलेचा थोरला भाऊ होती. मित्राचा मित्र असला तरी मी त्याला पूर्ण ओळखून होतों. मीच काय पण आमच्या कॉलेजांतील गड्यांनासुद्धां 'भाऊसाहेब' पूर्ण परिचयाचे होते. माझ्याच वयाचे परंतु अजून त्यांनीं कॉलेजच्या बाहेरच्या जगांत पाऊल टाकण्याचें साफ नाकारलें होतें. वडिलांच्या पेन्शनीची पुण्याई जोपर्यंत चालू आहे, तोंपर्यंत या कठोर जगाकडे डोळे उघडून पहावयाचें नाहीं हा त्यांचा निर्धार आजतागायत कायम होता. कॉलेजमध्यें अभ्यासाव्यतिरिक्त कोणत्याहि शाखेंत भाऊसाहेब अजोड होते. ते खोलींत यावयाचे आंत सरलेच्या पुस्तकांचा ढिगारा मी कपाटांत टाकून दिला—रेनकोटाचें ऐश्वर्य खिडकीच्या दारावर सोपवून भाऊसाहेब रूमालानें तोंड कोरडें करीत आरामखुर्चीवर पडले. आपल्या आगमनाचें कारण काय असावें याविषयीं यजमानाला जाणण्याची कांहीं उत्सुकता असेल याची त्यांना जाणीवहि नव्हतीसें दिसलें. जणूंकाय घर आपलेंच आहे, त्यांत कार्यकारणपरंपरेचा भाग येतोच कुठें या भावनेनें त्यांनीं कांहीं एक न बोलतां खिशांतील सिगारेट काढून शिलगावयाला

सुरवात केली. एकाएकीं आठवण झाल्याप्रमाणें करून ते जंगी धुराचा लोट हवेंत सोडीत म्हणाले " काय एकएक लोक असतात पहा—. त्या आमच्या कोशींबीर कॉंपिटिशनच्या सेक्रेटरी मिस् मिनूकडे आज गेलों होतों. कॉलेजमध्यें माझ्या पायां पडून मतें मागणारी पोरगी पण घरीं गेलों तर बोलायला काय—, भेटायलासुद्धां तयार नाहीं—" पुन्हां एक धुराचा लोट उसळला.

" त्यावेळीं ती तुमचीं मतें मागायला आली होती आणि यावेळीं तुम्हीं आपलीं मतें तिला ऐकवावींत अशी तिची इच्छा नसेल—" काहींतरी बोलावें म्हणून मी बोललों. परंतु माझें सर्व लक्ष माजघरांतून दिसणाऱ्या स्वयंपाकघराच्या दरवाजाकडे होतें. ही स्वारी लौकर कशी जाईल हें एक कोडेंच होतें.

" म्हणे मिनू भणगे. ही भणगे कसली भंगडच म्हणानात " सिगेरेट झाडीत भाऊसाहेब म्हणाले.

" मग कशाला नस्ती उरस्फोड करतां—? कशाला जातां तिच्याकडे ? " मी तोडून टाकण्याकरतां म्हणालों.

" कशाला जातां ? काय प्रश्न आहे ? तुमचें एक ठीक आहे. तुम्ही आमची सरला गांठलीच आहेत पण आमची सोय काय ? अहो जगांत भाकरी, बेकारी, आणि राजकारण याशिवाय दुसरं कांहीं नाहींच कीं काय ? आणि ह्या त्रयींत पुन्हां बायकांशिवाय कुठें चालतें आहे ? सगळे लोक चोर आहेत. साठीचा पगडीवाला थेरडासुद्धां डोळे मिचकावून सोळा वर्षांच्या पोरीच्या सरकलेल्या पदराकडे पहायला सोडत नाहीं. याच्या नाती आतां साड्या नेसायला आणि शेपटा सोडायला लागल्या असतील. आणि आम्ही नुसतं एका पोरीकडे जाऊं सुद्धां नये ? " म्हणून म्हणत भाऊसाहेबानीं ' काय न्याय आहे ? " अशा तऱ्हेचा चेहरा केला.

" जा की–पण तीच पोरगी कशाला ? दुसरी एकादी लायक असामी पहा— " मी हंसत म्हणालों.

" मोसमी वारे सह्याद्रीवरच कां धडपडतात ? वीज ढगांचेंच कां चुंबन घेते ? असं पहा—मी तर निश्चयच केला आहे कीं ती मिसेस भाऊसाहेब म्हणून लावायला तयार नसली तर मीच मिस्टर मिनू भणगे म्हणून सही करायला सुरवात करणार आहे ! पोरगी काय आहे पण ! नुसती सुरतेची बरफी. अगदीं तुमचं तें ' मारडाला ' प्रकरण आहे ना ! प्रभाकरपंत, तुम्हांला हृदय तरी आहे कां हो ?" भाऊसाहेब काळजीच्या सुरांत म्हणाले.

" कां बुवा ही शंका—?" मी म्हणालों.

" अहो, ही पोरगी म्हणे तुमची दोस्त आहे आणि अशी पोरगी टाकून आमच्या वेंधळ्या सरलेंत तुम्हाला दिसलं तरी काय ? इकडे लग्गा साधायचा सोडून—, ह्या बासुंदीची चव सोडून तुम्हांला आमच्या सरलेचें आंबटवरणच कसं पसंत पडलं—?"

" बरं भाऊसाहेब, मला माफ करा हं—थोडं बाहेर जायचं आहे मला—?" मी घाईनें म्हणालों. कारण कपबशांचा आवाज ऐकूं येऊं लागला होता.

" असं—? फार उत्तम. चला आपण दोघेहि मिळूनच बाहेर पडूं—" म्हणून म्हणत भाऊसाहेब उठलेसुद्धां.

" तसं नाहीं—तुम्ही पुढें व्हा मला जरा काम आहे—" मी चिडून म्हणालों.

" म्हणजे घरांतच नं ? हातिच्या, मग काय तर ? बसलों मी !" म्हणून म्हणत पुन्हा पठ्या खालीं बसला. असा राग आला होता—! पण इलाज नव्हता—

" भाऊसाहेब, तुमचं काम तरी काय आहे माझ्यापाशीं—?" मी जरा स्पष्टच बोललों.

" माझं काम कांहीं नाहीं. मिनूच्या घरांतून तिच्या भय्याची खेटरें खाऊन रस्ता चालूं लागलों होतों तों वाटेंत शिंपी सायकलवरून जातांना दिसला. अलीकडे सहा महिने त्याच्यांत आणि माझ्यांत कांहीं प्रामाणिक मतभेद निर्माण झाल्यामुळें मी त्याला टाळण्याकरितां अनायासें वाटेवर असलेल्या तुमच्या घरांत शिरलों. आतां आलोच आहे तर माझं थोडेसं काम करांना—" भाऊसाहेब म्हणाले.

" काय पाहिजे तुम्हांला " मी तुटकपणानें उद्गारलों.

" एक मिनूला चिठ्ठी द्या. तुमचें काम झालेलें आहे पण आम्हाला आतां थोडासा पराक्रम करूं द्या की."

" कसली चिठ्ठी !–" मी साशंक होऊन विचारलें.

" आपली चिठ्ठी !–" भाऊसाहेब हंसून म्हणाले.

" पण काय लिहूं तिच्यांत–? हें पहा. चिठ्ठीचपाटी वाचून जमत असेल तर मी वाटेल तें तुमच्या करतां करीन. चिठ्ठी म्हटलं कीं, इलव्याप्रमाणे माझ्या अंगावर कांटा उभा राहातो–" मी म्हणालों.

—आणि अगदीं ह्याच वेळेला स्वयंपाक घरांतून—' आऽऽऽक्छीऽऽऽय् ' असा शिंकेचा आवाज स्पष्ट बाहेर ऐकूं आला! भाऊसाहेबांनीं आश्चर्य वाटलेसें दाखवून म्हटलें— " मातोश्री घरांतच आहेत कां? अन् मग स्वयंपाकघराला कडी कोणी लावली—?"

"—भाऊसाहेब रागावूं नका. ह्या वेळेला मला कांहीं एक विचारूं नका—. मला फार काम आहे. आपण पुन्हां केव्हांतरी भेटूं—" मी खिडकीवरचा रेनकोट बळेंच त्यांच्या हातांत देत म्हणालों.—भाऊसाहेब मुकाट्यानें निघून गेले. पण त्यांचें समाधान पटलेसें बिलकूल दिसत नव्हतें. जाताना स्वयंपाकघराच्या दाराकडे मांजराच्या नजरेनें पहात स्वारी बाहेर पडली. तो गेल्याची खात्री झाल्यावर मी सरलेला बंधमुक्त केली. ती हातांत चहाचे कप घेऊन हंसतच बाहेर आली.

" इश्श—! काय हा धूर! एकाद्याला वाटायचें घर पेटलें कीं काय राम जाणे! अन् खरंच, कोण आलं होतं?" सरलेनें चहाचा कप माझे हातांत देत म्हटलें.

" मिनू भंगडचा प्रियकर—! माझा सुडकरी आणि तुझा भाऊ—! व्यक्ति एकच पण छटा या अशा विविध प्रकारच्या—!" मी चहाचा घोट घेऊन म्हणालों.

" इश्श! भाऊ कां! अन् मग मला अशी कोंडलीत कशाला? त्याला मी भितें आहे? त्याचीं कुलंगडीं मला इतकीं ठाऊक आहेत कीं, एक रामायण होईल तयार लिहिलं तर! पण गडे, मी आतां लवकर जातें घरीं. माझ्या सासूबाईंना पुन्हां केव्हांतरी भेटेन. आधींच उशीर आणि—"

" आणि तुझ्या शिंकण्यामुळें स्वारी बिथरली आहे." मी मध्येंच म्हणालों.

" मी तरी काय करूं? अंगावर हें ओलं पाहिलंत का! जातेंच मी आतां. आणि पहातें त्याचा तमाशा—" सरला घाईघाईनें निघून गेली. पाऊस बहुतेक थांबला होता. आकाशांत सायंकाळीं निरनिराळ्या रंगाचे पट्टे फिरविल्यासारखें दिसत होतें, अंधार दाटूं लागला होता म्हणून मी दिवा लावला,—आणि नंतर आई ओलीचिंब भिजलेली अशी घरांत शिरली—!

त्या दिवशीं मी आईची काय काळजी घेतली! घाईघाईनें दांडीवरचें लुगडें ओढून तिला कोरडें नेसण्याचा आग्रह काय केला, आलें घालून मुद्दाम कडक चहा करून काय दिला, शेगड्या पेटवून देऊन डब्यांतले तांदूळ काय काढून दिलें—! सारेंच विलक्षण! आईनें सारें सहन केलें. कधीं नव्हता तो आजच पुत्र एकाएकीं एवढा मातृभक्त कसा झाला

हें तिला माहीत नव्हतें, परंतु याच्यापोटीं काहींतरी आहे हें न समजण्याइतकी माझी आई खुळी नव्हती. परंतु माझें आर्जवी वागणें मनांतून तिला आवडत असावें हें तिच्या चेहऱ्यावरून स्पष्ट दिसत होतें—त्या दिवशीं कांहीं विशेष घडलें नाहीं—! परंतु दुसरे दिवशीं स्फोट झाला—! आईनें दुपारीं जो पट्टा सोडला तो मला बिलकूल आवरतां आला नाहीं. मी मुकाट्यानें ऐकून घेतलें.

" दिवसाढवळ्या तरण्याताठ्या पोरी घरांत आणतां ! कांहीं शरम वाटत नाहीं ? पडदे काय लावून घेतां अगर दारं काय लावून घेतां! कांहीं मनाची तरी थोडी! " आई उसळून म्हणाली.

" आई, माझं ऐकून घे– " मी हताशपणानें पुटपुटलों.

" कशाला ! तुम्ही काय बोललांत, कायकाय थेरें केलींत, अन् कसकसें खिदळलांत ! मला काय करायचें आहे तें ऐकून ! तरी म्हटलं काल रात्रीं माझा तुला एवढा पुळका कां आला ? "

" आई, हें तुला त्या समोरच्या बायकांनीं सांगितलेलं सारं खरं वाटतं अन् मीं तुझ्या मुलानं सांगावं म्हटलं तर तूं ऐकून घ्यायला तयार नाहींस ! नाहींतर चालूं दे तुझं ! " मी जरासा रागानेंच म्हणालों. यानंतर आमच्यांत ही नवीनच पडलेली तेढ जास्तच बळकट होत गेली.

यानंतर आठच दिवसांनीं सरलेच्या वडलांकडून आलेल्या पत्रानें तर कळसच करून टाकला. एक क्षुल्लक घटनेचा इतका विपर्यास होईल अशी माझी कल्पनाहि नव्हती. इतकेंच नव्हे तर माझी आईसुद्धां याला थोडीशी जबाबदार होईल ही कल्पनाहि मोठी मनोहर होती ! पत्रांतील महत्वाचा मजकूर मी पुन्हां पुन्हां वाचूं लागलों—दर वाचनाला अर्थबोध होण्याऐवजीं जास्तच घोटाळ्यांत पडूं लागलों—

**" मे महिन्यांत आपण मुलगी पाह्यलीत—. आपल्याला पसंत पडली, परंतु त्यानंतर आपण लग्नाचे बाबतींत मुग्धच राहिलांत याचें आम्हाला राहून राहून आश्चर्य वाटत होतें. परंतु आतां उलगडा झाला. लग्नाचा विचार आपणांस तितकासा रुचत नसावा असें दिसतें. सहज गंमत म्हणून मुलगी पहाण्याचा आपण फार्स उरकून घेतला असावा असें दिसतें.— असो. यानंतर आमचे ज्येष्ठ चिरंजीव भाऊसाहेब**

मागचे शनिवारीं कॉलेज आटोपल्यावर आपणांस कांहीं संस्कृतांतील शंका विचारण्यास आले असल्याचें आमच्या ऐकण्यांत आलें आहे. तेथें त्यांना आपले वर्तनांत थोडासा अनुचितपणाचा भाग दिसून आला असेंहि समजतें—. आपल्या कोणी नात्यांतील मुलगी आपली मातोश्री घरांत नसतांना भेटावयास आली तर त्यांत बेशिस्त प्रकार झाला असें कोणीही म्हणूं शकणार नाहीं. परंतु तिला घरांत कोंडून लपविण्याचा प्रकार करणें तितकेसें उचित नाहीं असें माझ्या अल्प मतीला वाटतें. आपल्याकडून खुलासा करून घेण्याची माझी इच्छा नाहीं. कारण आपल्या वाड्यांत राहणाऱ्या एका सगुणाबाई नांवाच्या बाईना आपले पश्चात् आमच्या सौभाग्यवतीनें जाऊन या बाबतींत खुलासा मागितला होता. आणि असें समजतें कीं, आपल्या मातोश्रीचेहि ह्या बाबतींत आपल्याविषयीं असावें तितकें स्वच्छ मत दिसत नाहीं. अर्थात् सगुणाबाईची व आपल्या मातोश्रींची आणि आमच्यापैकीं कोणाचीहि गांठभेटसुद्धां यापूर्वी झालेली नव्हती. हें आपणांस माहितच आहे. तेव्हां त्रयस्थ या नात्यानें तुमच्या वाड्यांतील बायकामाणसांनीं पुरविलेली माहिती अविश्वसनीय मानण्याचें मला कांहींच कारण दिसत नाहीं—. तेव्हां मे महिन्यांत आपण आलांच नव्हतां असें आम्ही धरून चालतों. क्षमा करा; परंतु अंधारांत पोटच्या मुलीला लोटण्याचें धाडस आमच्यानें करवत नाहीं. आणि आपल्यालाहि आपल्या मनाविरुद्ध बांधून घेण्यांत हंशील दिसत नाहीं. मुलीची समजूत काढणें जरा कठीणच जाईल असें वाटतें. परंतु आपण "नकार कळवला आहे" असें सांगून तिची समजूत घालूं; इतप्पर तुम्हांअम्हांमधील संबंध सलोखा या पत्राबरोबरच संपला असं समजूं या. गैरसमज करून घेऊं नये."

गैरसमज कोण करून घेत होते हें उघड होतें. परंतु या बाबतींत हा खुलाशाचा प्रकार नक्की काय घडला हें जाणून घेण्याची मला तीव्र इच्छा होती आणि आईशिवाय तें कोणाला विचारणार–? संध्याकाळीं मीं भीतभीत आईजवळ प्रश्न काढला—आईचें उत्तर तिच्या स्वभावाशीं बिलकूल विसंगत नव्हतें.

" आई, माझ्याविषयीं कोणी तुला कांहीं विचारायला आलं होतं का ? "

" रोज कुणीनाकुणी विचारतेंच आहे. पण माझ्यातर्फेची मुलगी तुला पसंत पडेल तर ना त्या विचारण्याचा उपयोग ! त्यांतून तुझ्या कॉलेजांतल्या मैत्रिणी तुला असं सरळ आमच्या मतांप्रमाणं लग्न करूं देतील तर ना ! " आई तुटकपणानें बोलत होती हें मीं ओळखलें.

" आई, तूं गैरसमज करून घेऊं नकोस—" मी म्हणालों.

" चांगला समज झाला आहे बाबा आतां ! परवां त्या जिमखान्यावरच्या एका बाईनीं मला विचारलं कीं तुमच्या मुलाविषयीं फार ऐकूं येतें तें खरं कां ? सगुणाबाईनीं भाबडेपणानें तुझा मोठेपणा दाखविण्याकरतां रोज तुझ्याकडे इतक्या मुली येतात अन् रोज तूं त्यांच्याबरोबर फिरावयाला जातोस असं सांगितलं. मी तरी काय बोलणार ? घरांतच तूं त्या दिवशीं त्या कुठल्याशा मुलीला आणलीस अन् सगुणाबाईच्या देखत सारे चाळे केलेस—! आपलाच दाम खोटा अन् दुसऱ्याला काय बोलायचं ! " आई म्हणाली.

" आई, सगुणाबाई भोळ्या नाहींत, त्या ढोंगी आहेत, स्वार्थसाधु आहेत असं म्हटलं तर तुला खरं वाटेल कां ? " मी आर्जवानें म्हणालों.

" उगाच लोकांना शिव्या कशाला, बाबा ! त्यांची पोरगी तुला नको हें कळल्यावर त्यांना तुझ्या भानगडींत लक्ष घालून काय स्वार्थ साधावयाचा आहे ?" आई सरळ म्हणाली.

" आई हा सूड आहे. माझं नाक कापलं म्हणून दुसऱ्यांचंहि कसं कापतां येईल असला हा प्रकार आहे. " मी म्हणालों. आईचा सरळ स्वभाव बदलतां येणे कठीण आहे हें मी जाणून होतों-. आईनें कांहींच उत्तर दिलें नाहीं. परंतु तिच्या मनांत कांहींतरी गोंधळ उडाला असावा हें स्पष्ट दिसत होतें. परंतु कांहीं माणसें जगांत अशीं असतातच ना कीं एरवीं तीं कितीहि सरळ असलीं तरी आपलें मत बदलायला तीं सहज चटकन् तयार व्हावयाचीं नाहींत. त्यांतलाच मासला म्हणजे माझी आई होती. यांत आईचा दोष नव्हता. तिला खिंडींत गांठून कबुलीजबाब मागितल्यासारखें झालें होतें. सगुणाबाईना मीं दुखावलें होतें. तेव्हां त्यांनीं जातां जातां मला फटकारून जावें यांत त्यांचाहि कांहीं दोष नव्हता. भाऊसाहेबांना मी मिनूचें सूत जमवून दिलें असतें तर त्यांना स्वतःच्या डोळ्यांवर कांतडे ओढून घेणें सोपें झालें असतें. दोषी कोणी नव्हतें. माझा धांदरट स्वभावच या घोटाळ्याला कारण होता.

एकच मार्ग बाहेर पडायला मोकळा होता. घरीं आणलेली मुलगी सरलाच होती हें कळलें म्हणजे सरलेचे वडील आणि भाऊसाहेब गप्प बसतील, कदाचित् लौकरचा मुहूर्त धरण्याचा आग्रह धरतील आईलाहि शांत करणें सोपें जाईल, आणि सगुणाबाई कदाचित दुसऱ्या जागेंत राहायला जातील. पण हा समज घडून यावा कसा ? सरलेनें आपण होऊन हा खुलासा कां केला नाहीं ? का तिला यांतील एक अक्षरहि विचारण्यांत आलें नाहीं—? दुसरी शंका मनात येण्याचा अवकाश कीं उद्यां याचा सोक्षमोक्ष लावून घेतलाच पाहिजे हा विचार मीं कायम करून टाकला. झाला एवढा बावळटपणा पुरे—आतां आपला मूर्खपणा आपणालाच निस्तरला पाहिजे. या विचारासरशीं मी खोलींत येरझारा घालूं लागलों. आणि याच वेळीं घामाघुम झालेली सरला घाबरत, घाबरत घरांत शिरतांना मला दिसली. पुन्हां घोटाळा नको म्हणून आईला मीं बाहेर हांका मारून घेतली. आईनेंही बाहेर यायला फारशी हरकत घेतली नाहीं.

" ही तुमची मागच्या शनिवारीं नेलेली छत्री घ्या—! आणि यापुढें आठ काड्यांची छत्री न वापरतां सोळा काड्यांची वापरत जा. त्या दिवशीं काय मी भिजले पण—त्यापेक्षां छत्री नसती तरी चाललें असतें. मी आजारी पडायची ती जरी पडलें असतें तरी निदान हा घोटाळा तरी माजला नसता—" सरलेनं छत्री कोपऱ्यांत खुंटीला अडकवीत म्हटलें—. आईनें कौतुकानें तिच्याकडे पाहिलें. मला वाटतं आपल्या सारखीच पटाईतपणें बोलणारी ही मुलगी पाहतांक्षणींच तिच्याविषयीं आईच्या मनांत आदर उत्पन्न झाला असावा. परंतु सरलेच्या भाषणांतील एकहि मुद्दा तिला समजण्यासारखा नव्हता म्हणून तिनें प्रश्नार्थक मुद्रेनें पाहिलें. मीं कांहींच उत्तर केलें नाहीं. म्हटलं आतां परस्पर होत आहे आपण कां उगीच मधें या ? आईनें तिच्याकरतां पुढें केलेल्या खुर्चीवर न बसतां आधार म्हणून तिचा उपयोग करून सरला पुढें म्हणाली.

" सासूबाई म्हणून मी तुमची सून तुम्हाला पहिला नमस्कार करितें–" म्हणून सरलेनें पुरुषी थाटांतला नमस्कार केला.

" पण हा अगदीं कोपरापासूनचा दिसतो आहे—" मी हंसत म्हणालों.

" पहा हो ! असचं जर मला पुढें छळायचं असेल तर अनायासें उद्यां मला पाहायला येणाऱ्या एका ध्यानाच्या गळ्यांत माळ घालून मी आपली मोकळी होते कशी ! नाहींतरी मी तुम्हाला कुठं पसंत आहे म्हणा. ! बरेच आहांत कीं ! मला त्या दिवशीं इतिहास

भूगोल पटवून शेवटीं मला अशी नापास करतां काय ? म्हटलं, शिक्षक नालायक असला तर शिष्य तसाच निघणार, माहिती आहे ! म्हणे मला तुमची मुलगी पसंत नाहीं ! '' सरला अर्धवट आईला उद्देशून, अर्धवट मला उद्देशून म्हणाली.

" अग पण तुला नापास करायला मी कुठें तयार आहें ? तुझ्या वडलांनींच तुझी तशी समजूत करून दिली त्याला मी काय करूं ? " मी हंसून म्हणालों.

" अस्सं काय ? तरी मला वाटलंच ! आतां ते तुमच्याकडे येणारच आहेत. मीच त्यांना भरीला घातलं. म्हटलं नकार घ्यायचाच तर समक्षच घेऊं या. आणि त्यांतून माझ्या सासूबाईंनीं मला कुठें अजून नाकारली आहे ! आज सकाळीं मला बाबांनीं तुमच्या नकाराची ही मनोरंजक हकीकत सांगितली, तेव्हांच मीं तर्क केला कीं कांहींतरी समजुतीचा घोटाळा झाला असावा. पुढे त्यांनीं आमच्या भाऊरायांचा रिपोर्ट सांगितला. तेव्हां तर खात्रीच पटली कीं या बाळानें स्वतःवरून दुसऱ्याची परीक्षा करण्याचा हा उपद्व्याप केला असावा. दुपारीं जेव्हां मीं त्याला चांगला पेचांत धरला, तेव्हांपासून ती मिनू भंगड कां कोण आहे तिचा फोटो छातीशीं धरून बसला होता त्याचे तुकड्तुकडे करून त्यानें टाकले—.आतां बाबा अन् तो येणार आहेत. मी त्यांच्या आधीं सायकलवरून आलें—" इतकें बोलून विसावा घेण्याकरतां म्हणून ती थांबली.

—आणि त्या दिवशीं संध्याकाळीं सारे गैरसमज जितक्या वेगानें आले तितक्या जोगानें नाहींसे झाले. आणि सर्वांत मौज ही कीं आईची परवानगी मी मागण्याचा प्रयत्न न करतांच आपोआप मिळाली. त्या दिवशीं प्रत्येकानें आपली व्याख्यान देण्याची हौस फेडून घेतली. एरवीं जातिवंत वक्त्यालाहि खालीं पहावयास लावणारी आई शेवटीं फक्त एकच वाक्य बोलली.

" मला वाटतं आतां मुहूर्त मार्गेसरांतलाच धरावा हें बरें—" मनांतल्यामनांत मी काय आईवर खुष झालों म्हणून सांगू ? उगीच नाहीं कवि लोक आईची एवढी स्तुति करीत !

मीं चटकन् होकार दिला. फक्त प्रश्न होता सरलेचा. तिची परीक्षा अजून लांब होती. तेव्हां कदाचित् तिची आडकाठी येईल असें मला वाटत होतें. पण ती अडचण तिनें एका छोट्याशा व्याख्यानानें तावडतोब दूर केली.

" माझी परीक्षा ? माझं कुठं अभ्यासांत लक्ष आहे ! दर वर्षी मी नेमानें नापास होत असतें आणि दर वर्षी बाबा मला मुख्य बाईची मनधरणी करून वर चढवून घेतात—.आतां

मला अभ्यास नको. मी पुन्हां नापास होईन. त्यापेक्षां उद्यांपासून शाळेंत न जातां अकरा ते पांचपर्यंत माझ्या सासूबाईच्या या घरांतल्या शाळेंत फी देवून मी नांव घालायला तयार आहें. माझं आपलं एक मत आहें. लग्न होत नसलेल्या मुलीनें परीक्षा द्याव्यात अन् लग्नाचा संभव असणाऱ्या मुलींनीं चटकन् लग्न करून घ्यावें. म्हणजे असले घोटाळे तरी माजणार नाहींत—" सरला म्हणाली.

—आणि सांगून खरें सुद्धां वाटणार नाहीं कीं जो मी हिंदुस्तानांतल्या कोणत्याही वक्त्याच्या भाषणाला चुकूनसुद्धां हजर राहात नव्हतों तो मी त्या दिवशीचें सरलेचें नवरसपरिपूर्ण व्याख्यान मोठ्या भक्तिभावानें ऐकून घेत होतों. अशीं गोड व्याख्यानें सरलेनें मला रोज कितीही ऐकविलीं तरी तिचा एकुलता एक प्रेक्षक होण्याचें मी केव्हांहि कबूल करीन.

---

# कोडाची मुलगी

आजतागायत गाजलेल्या कथाकादंबऱ्यांतून झळकणाऱ्या झाडून साऱ्या नायिका सौंदर्य, अभिरुचि, आकर्षकपणा इत्यादि सद्‌गुणांनी विनटलेल्या लायक आसामी होऊन गेलेल्या आहेत. म्हणजे नुसतें वाङ्मय हें समाजाचें यथायोग्य प्रतिबिंब असें जर मानलें तर, मला वाटतें, महाराष्ट्रांत घरोघरीं चाफेकळी आणि तरतरीत नाकांच्या अठरा एकोणीस वर्षांच्याच पोरी फक्त विहार करतांना आढळतील. त्यांचीं कपाळें विशाल आणि सुरुचिर असतील. तो अरबी समुद्रावरून वाहणारा बेरकी वारा त्या निष्पाप कुमारिकांच्या केसाशीं निर्लज्जपणानें दंगामस्ती करीत त्यांना केसांच्या बटा आवरतां आवरतां— ' काय मेला हा वारा—-' असा शाप उच्चारायला भाग पाडीत असेल. साऱ्या जगांतील पाणी त्या मुलींच्या डोळ्यांत सामावलेलें असेल. ओठांचा रसरशीतपणा आणि गळेपडूपणा पाहून महाराष्ट्रांतील तरुणांचीं हृदयें उन्हाळ्यांत तडकणाऱ्या काळ्या जमिनीप्रमाणें कायमचीं चिरलीं गेलीं असतील—त्या मुलींचे कमनीय बांधे पाहून तरुणांच्या डोळ्यांचीं भुशिरें आणि देहांच्या अबदागिरी होत असल्यास नवल काय !

अशा या सगळ्या गोड गोड, मऊ मऊ आणि नजरबंदीच्या मोहक वातावरणांत कोड फुटलेल्या पोरीला नायिका म्हणून रंगविण्याचें पापकर्म कोण महात्मा करील ? स्वप्नसृष्टि रम्य असते, सुंदर असते आणि मोठी गोडवी असते. त्यांत रममाण होण्यास कोणाला

शिकवावें लागत नाहीं. आपल्या स्वप्नसृष्टींत ओंगळपणा येतां कामां नये, कोठेंही दुखण्या-खुपण्यासारखा प्रसंग येतां कामां नये म्हणून लेखकवर्ग कमालीचा दक्ष असतो. आणि म्हणून माझ्यासारख्या दुर्दैवी पोरींचा त्यांना कांहींएक उपयोग नसतो. मात्र मी स्वतःला नायिकेचें पद बहाल करणार आहे.

हें कविजनांचें आवडतें पद अंगावर घेतांना येणारी जबाबदारी मी पूर्णपणें ओळखून आहे. मी कुरूप आहे हें मी पूर्णपणें जाणतें. कोणीसें म्हटलें आहे कीं मनुष्य कितीही कुरूप असो तो आरशांतल्या आपल्या प्रतिबिंबावर बेफाम फिदा असतो. मी लाख वेळां आरशांत पाहिलें असेन. दरखेपेस या विधानाची तीव्रतर असत्यता पटण्यापलीकडे मला कसलेंच समाधान मिळालें नाहीं. कदाचित् एखाद्या महामूर्खानें स्वतःच्याच चेहऱ्यावर खूष होण्याचा नादानपणा झाकण्याकरतां हें वरील विधान दडपून दिलें असावें. दर खेपेस मी आरशांत पाही—परंतु माझ्या जाड केसांना कधींही भुरुभुरु उडावेसें वाटलेलें मला दिसलें नाहीं; दोन डोळ्यांमधील नाकाचा खड्डा एक तीळभरसुद्धां भरून आलेला मला दिसला नाहीं; लहानपणीं खेळतांना मी पडलें होते त्याची आठवण म्हणून हनुवटीवर पडलेला आकाशगंगेचा पट्टा गहूंभर सुद्धां कमी झाला नव्हता आणि मूळच्या मंदगुलाबी रंगाच्या ओठावर फिक्कटसर असा कोडाचा उमटलेला चट्टा यत्किंचितही कमी झाला नव्हता. मला रूप नव्हतें, त्याचा गर्व असण्याचें कारणच नव्हतें, परंतु मला मन होतें आणि त्या मनाच्या चिथावणीकडे दुर्लक्ष करणें तितकेसें सोपें नव्हतें. हें माझें मन वयाच्या पांचव्या सहाव्या वर्षी आपलें अस्तित्त्व भासवूं लागलें.

मी झगे घालीत असे त्यावेळीं. पायांत पायमोजे आणि बूट. सकाळीं अंथरुणांतून बाहेर पडलें कीं माझा हा जामानिमा आई स्वतः करीत असे. मला वाटतं, वडिलांनी मुद्दाम तिला बजावून सांगितलें होतें म्हणून ती माझे कपडे स्वतः करीत असे. त्यादिवशीं नित्या-प्रमाणें आईनें माझ्या पायांत पायमोजे चढवायला सुरवात केली. एक मोजा चढवून झाला आणि दुसरा चढवणार तोंच मी गुरगुरलें—, "हा मोजा फाटका आहे. मला फाटका मोजा नको. तो मोत्याला दे—"

आमच्या घरांत ही प्रथाच पडून गेली होती. जें आपल्याला नको असेल तें सर्व मोत्याला देऊन टाकायचें. फुटक्या बाहुल्या, काचेचे मणी इत्यादि वस्तूसुद्धां मीं मोत्याला आर्जव करून घ्यायला लावल्या होत्या. इकडे आईचें काम चालूंच होतें. मीं झटक्यासरशीं पाय घेतला आणि मोजा पायांतून काढूं लागलें.

" कार्टे, आतां गप्प बसतेस कां लगवूं एक—" आई माझा पाय पकडून म्हणाली.

" पण मोजा फाटका आहे—" मी निषेधप्रदर्शक आवाजांत म्हणाले.

" मोजा फाटका आहे ! अन् तुझं नशीब तरी काय एवढं मोठं धडकं आहे ? " आई चिडून म्हणाली.

" म्हणजे काय ? " मीं आश्चर्यानें विचारलें. कांहीं समजलें नाहीं म्हणजे हा माझा ठराविक प्रश्न असे. त्यानेंच आई जास्त खवळे.

" म्हणजे तुझं डोंबल. मोठी सुलक्षणी पडलीस कीं नाहीं ! तुला सगळे अर्थ समजावे लागतात. अन् अर्थ समजून तरी हे अनर्थ नाहींसे होणार आहेत कां ? चल आटप, पाय पुढें कर—माणसं यायची आहेत आज आपल्याकडे. जर कां कांहीं अचावचा बोलशील अन् पायमोजे काढशील तर चांगला डाग देईन पायाला " आई बुटाची गुंडी लावण्याचा निष्फळ प्रयत्न करीत म्हणाली.

" म्हंजे, या दुसऱ्या पायावर आहे तसला डाग देणार कां ! मग दोन डाग होतील " मी अजाणतेपणानें बोलून गेले.

विंचू डंसल्याप्रमाणें आईनें झटकन् माझा पाय सोडला. तिच्या डोळ्यांत कांहीं तरी गेलं असावं. तिनें चटकन् डोळे पुसायला सुरवात केली.

दुपारीं खरोखरीच आईच्या माहेरचें लटांबर येऊन थडकलें. पुरुष मंडळी फारशी नव्हती. बायकाच पुष्कळ होत्या. मला वाटतं दोन पुरुष आणि चार बायका असाव्यात. बोलण्याच्या कामांत त्या चार बायका चाळीस मर्दांना निःसंशय भारी होत्या. आणि बोलण्याचे विषय तरी किती ? 'अमकीचा नवरा तिरळा आहे' असें विधान एकीनें करतांक्षणींच दुसरीनें—तो वेळकाळ, व्यक्ति पाहून तिरळा होत असतो, असा शेरा मारावा. एकीनें सहज म्हटलें कीं 'बनूवन्संची मुलगी जरा डोक्यानं कमीच आहे' त्यावर दुसरीनें 'कां नसणार ? आई-बापांची पापं पोरांनीं नाहीं तर कुणी फेडायचीं ?' असा सवाल टाकला. एकमेकांची निंदा—, कुत्सित भाषा आणि आत्मप्रौढी या शिवाय दुसऱ्या कोणत्याही विषयाकडे त्यांनीं आपलें लक्ष फिरकूं दिलें नाहीं. एरव्ही माहेरघरची कुणबटं सुद्धां गोड करून घेणारी माझी आई संतापानें ओठ आवळून बसली होती. पडवीमध्यें आम्हां मुलांची पलटण दश-दिशां स्वैर उधळली होती. आमच्या घराला एकंदरींत मोडकळीस आलेल्या सर्कशीच्या तंबूचें स्वरूप प्राप्त झालें होतें. फरक एवढाच कीं कोणाच्या तरी तंत्रानें कामें करण्याची

जनावरांना अक्कल असतें आणि आम्ही मात्र दोरखंडे तोडून उकीरड्यावर लोळण्यांत स्वर्गसुख मानणाऱ्या प्राण्याचें अनुकरण करीत होतों.

मुलांचें खेळणें चालू असतां, कसें निघालें मला आतां आठवत नाहीं—परंतु कोण कोणापेक्षां जास्त गोरें आहे या विषयाची चर्चा मोठ्या गंभीरपणें आमच्या बोलण्यांत येऊं लागली. सर्वांच्या मतें मी जास्त काळी ठरूं लागले. माझा भाऊ माझ्यापेक्षां चार वर्षांनें वडील होता परंतु रंगारूपानें जवळ जवळ माझ्यासारखाच होता. त्यालाही जेव्हां इतर मुलांनीं माझ्यापेक्षां गोरा ठरविलं तेव्हां मात्र माझें पित्त उसळलें. निराशेनें मी प्रथम धुसपुसत कोपऱ्याकडे तोंड करून उभी राहलें. माझ्या सभोवार मुलांनीं जल्लोष सुरूं केला. मला अतिशय संताप आला. त्यांतल्या त्यांत आपल्या हातची ही गोष्ट नाहीं या जाणिवेनें तर मला जास्तच भडकल्यासारखें झालें. इतक्यांत मला एकदम आठवण झाली.

" मला काळी म्हणतां काय ?—" म्हणून म्हणत घाईघाईनें मीं पायांतले बूट पायमोजे काढून टाकण्यास सुरवात केली. माझ्या अंगांत त्वेष पुरेपूर भिनला होता. प्रत्येक जण माझ्याकडे आश्चर्यानें पाहूं लागलेला दिसतांच मला अस्मान ठेंगणें असल्यागत अभिमान वाटूं लागला. एकाद्या सराईत जादुगाराच्या शिताफीनें मीं पायमोजा दूर करून सर्वांना थक्क करून सोडलें. पायावर घोट्याचे शेजारी असलेला रुपयाच्या आकाराचा पांढरा चट्टा मीं मोठ्या अभिमानानें ह्या मुलांना दाखवला. माझा भाऊ मात्र दूर उभा राहून—" यमे—यमे, आईला सांगेन हं " म्हणून मला दटावीतच होता. त्याला माझें गोरेपण समजण्याइतकी समजूत आली होती. परंतु यावेळीं विजयाच्या उन्मादांत मी आईला आणि आईच्या रागाला पार विसरून गेलें होते. माझा श्रेष्ठपणा इतरांनी मूकपणें मान्य केलेला पाहतांक्षणींच मला कोण अभिमान वाटला !

" पण नुसताच पाय गोरा असून काय उपयोग ? अन् तो सुद्धां सगळा गोरा कुठें आहे ? "
एका चिन्तातूर आत्म्यानें शंका प्रदर्शित केली. त्याच्या या कमालीच्या बावळटपणाची कींव करण्याच्या सुरांत मीं म्हटलें—

" अहाऽऽऽरे ! एकदम कुठे गोरं होतात वाटतं ! आपण सावकाश सावकाश मोठं होत असतों तसं आहे हें ! रोज मी साबण लावत असतें. उद्यांपासून इतका फेस करीत जाईन कीं पुढच्या वर्षीं तूं आलास तर मी सब्बंध गोरी झालेली तुला दिसेन. "

माझ्या ह्या उत्तरानें त्या शंकेखोर मेंदूचें समाधान झाल्यासारखें दिसलें परंतु माझा विजय मान्य करणं त्याला तितकेसें श्रेयस्कर वाटेना. म्हणून तो शोकरसाच्या गगनभेदी आरोळ्या ठोकीत आपल्या मातृदेवतेकडे धांवत गेला. मातामाऊली छबकड्याच्या संरक्षणार्थ धावतच बाहेर आली आणि माझ्या पायाकडे लक्ष जाताच ती चपापून उभी राहिली. "बाईऽऽ ! यमे, हें ग काय तुझ्या पायावर ? हा डाग कसला ?"

"उकळत्या दुधानें तिचा पाय पोळला आहे" आणीबाणीच्या प्रसंगीं द्यावयाचें वडिलांनीं पढवून ठेवलेलें उत्तर माझ्या भावानें पुढें केलें.

"चल ! खोटं कशाला बोलतोस ? नाहीं हो काकू, मी किनई रोज साबण लावून गोरी होत आहे" मीं जोरानें म्हणालें.

एका तासांत घरांतल्या मोठ्या बायकांना माझें गोरेंपण विदित झालें. लहानपणापासून आईवडिलांनीं मोठ्या सायासानें लपवून ठेवलेलें माझें व्यंग मीच स्वमुखानें जगजाहीर करून टाकलें. संध्याकाळीं जेवणाचे वेळीं बायकाबायकांत कुजबूज चालू होती. मुलामुलांची जेवणें आधीं अवशींलाच उरकून घेण्यांत आलीं. नित्याप्रमाणें मी भाऊच्या पानाशेजारीं जाऊन बसलें. आणि पानें वाढून तयार झालीं. इतर मुलें आधाशासारखीं पानाकडे टक लावून पहात होतीं; पण मातामाऊलींच्या धाकामुळें ती दूरदूरच उभीं होतीं. कोडाच्या मुली शेजारीं आपले हे सोन्याचे गोळे बसवायला त्या तयार नव्हत्या. उगीच मुलांत मूल खेळून कांहीं नसता रोजगार उद्भवला तर काय घ्या हाच त्यांचा विचार होता. मला हें कांहीं समजत नव्हतें. मीं सर्वांना नांवें घेऊन हाका मारण्याचा सपाटा चालवला. एकादें मूल धिटाईनें तोंडांत अंगठा अडकावून एक पाऊल पुढें सरकल्यासारखें करीं; परंतु आईच्या डोळ्याकडे पाहून पुन्हां मोठ्या शितफीनें माघार घेई. मुलांचीं जेवणें लवकर उरकून घेण्याची भाषा बाहेरच्या पुरुष मंडळींकडून होऊं लागतांच प्रत्येकीनें दुसरीच्या मुलांना मोठ्या आस्थेवाईक प्रेमळपणानें आग्रह करण्यास सुरवात केली. इतर मुलांना आमिष म्हणून स्वतःचें मूल दोन पावलें पुढें ढकलल्यासारखें करावें आणि दुसरीचें मूल निघालेसें पाहून आपलें मूल पुन्हां मागें खेंचावें हा उद्योग सुरू झाला. माझे वडील दोनदां आंत येऊन गेले. आईचें आणि त्यांचें मागच्या पडवीला कांहींतरी कुजबुजणें झालें. वडील बाहेर जाऊन बसले आणि लाल डोळे झालेली आई माझ्याजवळ आली—

"यमू, तूं शहाणी आहेस, बाळ ! आपण दोघीजणी किनई मागाहून जेवायला बसायचं बरं का. ही सगळीं भुतं जेवून गेलीं कीं मग तूं अन् मी. हं ! फोडणीचा भात–तव्यावरच्या

पिठल्याची खरपूस साय—! बरंका—" आई माझ्या दंडाला धरून मला उठविण्याचा प्रयत्न करीत हलकेंच म्हणाली. पण मला हें कबूल नव्हतें.

" मला भूक लागली आहे. मी नाहीं उठणार–" म्हणून म्हणत मी पाटावर मांडा ठोकून बसलें.

आईच्या विनवण्या चालू झाल्या. भाऊही तिला मधून मधून हातभार लावीत होता. परंतु मीं माघार घेण्याचें साफ नाकबूल केलें. थोड्या वेळानें आईच्या विनवण्यांचें रूपांतर धमक्यांत होऊं लागलें–आणि शेवटीं मुद्दे संपल्यामुळें तिनें गुद्यांचा उपयोग सुरू केला. मी ओरडलें–खूप ओरडलें. माझ्या अंगात जेवढें बळ असेल नसेल तेवढें खर्ची घालून मी रडलें. परंतु मला बखोटीला धरून आईनें लांकडें ठेवण्याच्या खोलीकडे लोंबकळतच नेलें.

सर्वांचीं जेवणें उरकून माझी व आईची पाळी येईतोंपर्यंत मला अंधारांतच झोंप लागून गेली. त्या दिवशीं रात्रीं मी व आई उपाशींच झोपीं गेलों. रडण्याचा आवेग थोडासा ओसरतांच मी अंधारांत आईच्या गळ्यांतील मंगलसूत्राशीं खेळूं लागलें.

" आई, का ग मला जेवूं दिलं नाहींस ? " मीं पुन्हां त्या आठवणीनें गदगदून म्हटलें.

" यमू, तूं लहान आहेस अजून. जगांतल्या अनेक गोष्टी तुला इतक्या लहान वयांत कशा कळतील ! रडूं नकोस. वाहून ठेवलेल्या परिस्थितीला आपल्याला तोंड देणं भाग आहे—" आई माझ्या डोक्यावरून प्रेमानें हात फिरवीत म्हणाली.

" म्हणजे काय ? " ती काय म्हणाली तें न समजून मीं पुन्हां आपला ठराविक प्रश्न केला.

" मोठी झालीस म्हणजे सर्व कांहीं सांगेन हं—" म्हणून म्हणत आईनें आवेगानें माझें चुंबन घेतलें.

हें काय चाललें आहे, एवढा गोंधळ अन् आरडाओरड कशाकरतां, आई मला पानावरून उठवते कां आणि अंधारांत मला जवळ घेऊन तासन् तास बसते कां याचा मला त्यावेळीं कांहीं, कांहीं बोध झाला नाहीं. आधीं दुसऱ्याला मारायचं अन् स्वतः रडायला सुरवात करायची हा प्रकार मला न समजणारा होता. एवढें मात्र नक्की सांगतां येईल कीं आईच्या त्या ओल्या मुक्याची किंमत लाख जेवणांपेक्षां मला त्यावेळीं जास्त वाटली. मोठ्या विश्वासानें आईच्या कमरेभोंवती घट्ट विळखा घालून मी तिच्या ओंच्यांत तोंड खुपसून झोंपी गेलें.

## कोडाची मुलगी

मी मोठी झालें. लग्नाच्या बाजारांत मांडण्यालायक वस्तु म्हणून माझ्याकडे आईवडील चिन्तातूर मुद्रेनें पाहूं लागले मला आतां आईच्या त्या दिवशीच्या भाषणाचा आणि नंतर रडण्याचा अर्थ स्पष्ट कळत होता. माझें व्यंग मला उमगलें होतें आणि तें लोकांना दिसूं नये म्हणून मी आटोकाट प्रयत्न करीत असें. त्यांतल्यात्यांत सुदैव हें कीं घोटयावर, पोटरीवर व कमरेवर, लुगड्याची गांठ येते त्या ठिकाणीं, इतकेच चट्टे मला झाकावे लागणार होते. बाकी अजून हात तोंड (ओंठाचा चिंचोक्या एवढा भाग सोडून) इत्यादि भागावर शंका येण्यासारखें सुद्धां कांहींही नव्हतें. घोट्यापर्यंत भाग झांकला जावा म्हणून मीं विकच्छ नेसण्याची संवय करून ठेवली होती. मध्यंतरीच्या ' सकच्छ कां विकच्छ ' या गाजलेल्या वादाची मला मोठी मौज वाटत असे. अंगावरची व्यंगें झाकायला विकच्छ पद्धति इतकी महत्वाची असताना त्या विषयीं वाद कसला माजवायचा ?

मुलींच्या विवाहाची सरकारी वयोमर्यादा चौदा असल्यामुळें माझ्या वडिलांचा इलाजच नव्हता. परंतु कायद्याची मर्यादा ओलांडताच माझें प्रदर्शन ठिकठिकाणीं होऊं लागलें. परंतु माझें रूपच इतकें प्रभावी होतें कीं अशी सुखासुखी मी माहेर अंतरणार नव्हतें. श्रीमंतांच्या वाटेस जाण्याइतकी पैशांची ऊब आमच्याजवळ नव्हती. वडिलांना म्युनिसिपालिटींत सॅनिटरी इन्स्पेक्टरची नोकरी होती. पाऊणशें रुपयांत आमचा प्रपंच चाले. आईच्या माहेरचा गोतावळा फार जबर. त्यांतील एकाद्यातरी उडाणटप्पू पोराला म्हणा किंवा नवऱ्यानें टाकून दिलेल्या हिडिंबेला म्हण। मधून मधून वडिलांची मदत पोहोंचतच असें. स्वतःचें असें घर नव्हतें, शेती नव्हती कांहीं नाहीं. माझ्या लग्नाकरतां फार खर्च करणें शक्य नव्हतें. गरिबांचीं स्थळें प्रथम निवडण्यांत आलीं. परंतु अनुभव उलट आला. घरांत दोन प्रहरची भ्रांत असली तरी वरपिता हा त्यावेळीं स्वतःस एकाद्या सुलतानाचा बाप समजतो. मराठी सात इयता पुरी झालेल्या एका वयोवृद्ध बिजवरानें सुद्धां जेव्हां हजार रुपायांची भाषा सुनावली तेव्हां वडिलांनीं कानाला खडा लावून घेतला. त्यांतून एक दोन ठिकाणीं जमेलसें वाटत होतें तोंच आमच्या भाऊबंदांनीं माझ्या व्यंगाची चहाडी केली आणि पुन्हां तिकडून कांहींच उत्तर आलें नाहीं.

आचारी पाणकी म्हणून पैसा मिळवणाऱ्या मूर्खाला सुद्धां पोरगी फटाकडी पाहिजे असते. त्याला भरपूर हुंडा पाहिजे असतो. मनुष्यप्राणी दुसऱ्याला ओरबाडण्याच्या कामांत पशूलासुद्धां लाजवील. स्वतःची लायकी, स्वतःचा दर्जा आणि स्वतःची प्रतिष्ठा

सोयिस्करपणें विसरून मुलीच्या बाबतींत मात्र कमालीचा चोखंदळपणा दाखवणारे फार. या वरसंशोधनाचें कार्यांत माझी खूप करमणूक झाली.

मला पाह्यला एक महाराष्ट्रांतील नाटककार आले होते. वयानें ते चाळीशीच्या घरांत असावे परंतु प्रथमवर होते. हुंड्याची त्यांची अट बिलकूल नव्हती. त्यांनी जातीचीही अडचण गरज पडल्यास धुडकावून लावण्याचा आपला निश्चय माझ्या वडिलांजवळ बोलून दाखवला. त्यांना गतभर्तृका असली तरी चालली असती. एकाद्या अनाथ महिलाश्रमांतील चुकलेल्या-बाईला जन्मभर चारापाणी करण्याची त्यांची एका पायावर तयारी होती. एकंदर विवेचना-वरून मी निष्कर्ष काढला आणि तो स्पष्ट शब्दांत सांगतें. त्यांना स्वल्प खर्चांत, घरांतल्या घरांत, कायदेशीर रीतीनें वाटेल ती सत्ता गाजावायला एक नाजूक स्त्री देह पाहिजे होता. एकदां या पायरीला मनुष्य पोहोंचल्यानंतर तो काय थेरे करील आणि काय करणार नाहीं याचा विचार न केलेला बरा. त्यांच्याच शब्दांत सांगायचं म्हटलं म्हणजे आज चार वर्षें ते लग्नाची 'उठावणी' करीत पुण्या मुंबईला हिंडत होते. आणि निर्लज्जपणानें हें सांगायलाही त्याला कांहीं वाटत नव्हतें. मला पाह्यला ते आले होते ते अशाच एका सट्टा खेळणाऱ्या गृहस्थाबरोबर आले होते. मला त्या दोघांनीं चांगली निरखून पाह्यली. मला आपलें पांडित्य ऐकविलें आणि—

"मग काय आहे कां तुम्हाला सौदा पसंत ?" म्हणून महाराष्ट्राच्या लाडक्या नाटक-कारानें मला प्रश्न केला. मी यावर काय उत्तर देणार ? मी गोंधळलेल्या मुद्रेनें वडिलांकडे पाहिलें.

"ती काय सांगणार ? मुलीची जात जरा लाजाळूच असते—" वडील सौम्यपणानें उद्गारले.

"अहो तो अभिनय नुसता ! सत्यनारायणाच्या मांडवांत गेल्यावर प्रसाद खालल्या-शिवाय कां माणूस बाहेर पडतं ? एकदां जन्म आल्यावर लग्न, सहवास, मुलंबाळं इत्यादिकांचा मोह पडल्याशिवाय कां राहील ? एक वेळ वेल झाडाला बिलगणार नाहीं पण पोरगी पुरुषाचा हात धरल्याशिवाय राहणार नाहीं.—" भावी नवरदेव मुक्ताफळें उधळींतच होते.

"हें तुमच्या नाटकांतलं वाक्य कां ?" माझा भाऊ खंवचटपणानें मध्येंच म्हणाला.

" अगदीं बरोब्बर ओळखलंत तुम्हीं. नाद दिसतो आहे तुम्हाला नाटकें पहाण्याचा—" नाटककारानेंही बाजू ओळखून उत्तर केलें.

" भाऊ, मी घरांत जाऊं का—" मी उठण्याच्या तयारीनें वडलांकडे पहात भावाला उद्देशून म्हणालें.

" हे पहा अण्णासाहेब, मुलगी घरांत जाते आहे तुम्ही तिच्याबरोबर आंत जा आणि तिला विचारा. लग्नापूर्वी म्हणजे प्रत्यक्ष धार्मिकविधि होण्याचे पूर्वी स्त्रीपुरुषांना एकत्रित मिसळण्याची संधि मिळावी अशा मी मताचा आहे. मी उद्यांच भिवंडीला आमच्या वळूत्राडीकर नाटक मंडळीच्या बिऱ्हाडीं ' हेंच का प्रेम' या माझ्या नवीन लिहिलेल्या नाटकाचा दुसरा अंक बसवायला जाणार आहे. आठ दिवस तेथें माझा मुक्काम आहे. तेवढ्या अवधींत आम्ही दोघे एके ठिकाणीं राहिलों म्हणजे सहवास घडेल— "

" पण—म्हणजे मुलगी लग्नाच्या आधीं तुमच्याबरोबर एकटी धाडायची ? " माझे वडील भकास चेहरा करून म्हणाले.

" काय हरकत आहे ? भिवडी गांव म्हणजे कांहीं अरबस्तानचें वाळवंट नाहीं. आज शेंपन्नास उंबरठ्याचा, बाजारपेठेचा गांव आहे तो. मुलगी कांहीं रानांत पडणार नाहीं—" आश्चर्याचा उमाळा आल्याप्रमाणें करून नाटककार म्हणाले.

" अहो पण लोक काय म्हणतील ? अन् मुलीला तें बरं वाटेल ? " माझे वडील कुरकुर करूं लागले.

" तेंच विचारा म्हणून तुम्हाला मगापासून सांगतों आहे. तुम्ही आपला लोकांचाच बाऊ करून बसलेले. अहो, आतां त्या १९१४ च्या युद्धापूर्वीच्या 'इश्शबाई' मुली पार पुसून टाकल्या गेल्या. आतां मुली धीट झाल्या आहेत. आणि तुम्हालाच जर शंका वाटत असेल तर मी तुम्हाला आश्वासन देतों कीं या आठ दिवसांत आम्हीं बंधू-भगिनी प्रमाणें वागूं. मग तर झालं—! माझं काम हें असं चोख आहे. या वर्षी लग्न झालंच पाहिजे म्हणून मी मुंबईहून मित्र मंडळींना तारा केल्या चक्क. म्हटलं आळस उपयोगाचा नाहीं. माझ्या मित्रानीं मला कितीतरी लांबून उलट तारा करून मुली पाहायला बोलावलं आहे; पण आमच्या या दोस्ताचं मन मोडवेना म्हणून प्रथम याच्याकडे आलों. उद्यां सकाळपर्यंत मी यांच्याकडे आहे. तिथं मुलीला आणून पोहोंचवा म्हणजे झालं—. बरं मग येऊं आतां ! " असें म्हणत स्वारी उठून उभी राहिली.

अजून या डाळ-चुरमुरेवाल्या नाटककाराला मी विसरूं शकत नाहीं. पोक्तपणाची निबरट निशाणी चेहऱ्यावर स्पष्ट दिसत असतांना ऐन विशींतल्या पोराला शोभण्यासारखें त्याचें बोलणें, चालणें आठवलें कीं अंगावर शहारे येतात. नुसता काळाकभिन्न रोम्या होता. खालच्या दांतांची चाळणी आणि वरील पंक्तीपैकीं एकदोन गण फाजील चौकस बुद्धी न आवरल्यामुळें ओठांच्या खिडकीबाहेर सारखे डोकावून पहात असलेले—; डोक्यावरचा केसन् केस पांढरा शुभ्र. जणु काय सुतारफेण्याची चळतच. नाकांत कांहींतरी अडकल्यासारखे करून एकवार जोरानें 'खूं:ऽऽ' असा घोड्याच्या फुरफुरण्यासारखा आवाज आढण्याची त्याची लकब अत्यंत किळसवाणी होती. मागाहून मला कळलें कीं हा नाटककार प्रथम खेडेगांवांतल्या तमाशांना वग लिहून देत असे. नंतर आपण फार मोठे नाटककार होऊं असा आत्मविश्वास निर्माण झाल्यावरून स्वारीनें नाटकें लिहायला सुरवात केली. बिचाऱ्याचें दुर्दैव कीं त्याचवेळीं नाटक कंपन्यांना 'राम' म्हणण्याचें आठवलें. शेवटीं एका टिनपाट कंपनीचा लेखक म्हणून स्वारी उगाचच मिरवीत होती.

वडिलांना मीं स्पष्ट नाहीं म्हणून सांगितलें. त्या गृहस्थाच्या या भयंकर उठावणीनें माझें मस्तक सुन्न झालें. इतकी प्रगति आयुष्यांत मीं कोणत्याच कामांत दाखविली नव्हती. खेळांतली बाहुलीसुद्धां इतक्या तत्परतेनें लग्नाला उभी राहिली नसती. पुढें त्या गृहस्थाला आमचा नकार कोणी कळवला, मला आठवत नाहीं; पण ह्या प्रसंगाला ५–६ वर्षें होऊन गेली तरी अजून लग्नाची 'उठवण', मित्रांच्या व मित्रांना उलटसुलट तारा, महिलाश्रमांच्या उंबरठ्यांची झीज इत्यादी गोष्टी अगदीं ताज्या दमानें आजतागायत तो गृहस्थ कमालीच्या शिस्तींत पार पाडीत आहे.

त्यानंतर मी इंग्रजी सातवीच्या वर्गांत असतांना मला पाहायला आलेला प्रोफेसर दोडके. मजकूर महाशय संस्कृतचे प्राध्यापक होते. आद्य शंकराचार्य या पृथ्वीतलावरून अदृश्यमान झाल्यावर आपल्या इतका संस्कृतमध्यें पूर्वपक्ष उत्तरपक्ष कमालीच्या तर्कदुष्टतेनें मांडणारा लायक आसामी झालाच नाहीं ही त्यांची प्रामाणिक दृढ समजूत होती. घरीं पाठ करून गेलेल्या कोट्या वर्गांत आयत्यावेळीं स्फुरल्याप्रमाणें सांगण्यांत स्वारीचा हातखंडा होता असें भाऊनें मला सांगितलें. त्याची विद्वत्ता मला प्रत्यक्ष फारशी पाहायला मिळाली नाहीं. मला पहाण्याच्यावेळीं एक तासांत त्यानें जो काय काव्यशास्त्र विनोद निर्माण केला तेवढ्यावरून मीं तर्क केला कीं हा तोंडाचा खूप सैल असावा. बोलण्याच्या भरांत तो इतका

दमछाकीला येत असे कीं पुढें पुढें शब्द तोंडांतून बाहेर न पडतां नुसते तुषारच उडत असत. किरकोळ शरीरयष्टि. वर्ण काळ्यांतच जमा. बोलणारा मात्र जबर. तेवढ्या वेळांत त्यानें हिंदुस्तानच्या राजकारणाचा आढावा घेतलाच.

त्या सगळ्या गोष्टी मी मान्य करण्यास तयार होतें. आपला उणापक्ष असल्यावर आपण तरी फार चिकित्सा करूं नये. ठेंगण्या माणसानें शेंड्यावरची कैरी मिळण्याची आटापीट कां करावी ? परंतु—

दुसरे दिवशीं भाऊनें तपास काढला कीं एक पत्नी अशिक्षित या सबबीवर धारवाडला ठेवून प्राध्यापक इकडे आले होते. इकडे आले ते स्वस्थ बसले नाहींतच. त्या घटकेला त्यांचे तीन चार ठिकाणीं बरोबर एकटे फिरावयास जाण्याइतके 'क्षुल्लक' प्रेमसंबंध होतें. असलें हें कप्प्या कप्प्याचें प्रेम मला नवीन होतें; आणि मान्य ही होणारें नव्हतें. या सर्वांवर कडी म्हणजे विलायतला जाण्यास जो खर्च येईल तो सासऱ्यानें देण्यास तयार व्हावें अशी त्यांची मनिषा त्यांनी कळवली.

"पत्नीला बरोबर घेऊन जाणार कां म्हणून विचारा त्यांना" आई कडवट मुद्रेनें म्हणाली.

"मग काळी बायको फुकटांत करूं कीं काय असा त्यांनीं सवाल टाकला आहे" माझे वडील शांतपणानें म्हणाले.

"हें पहा—त्यापेक्षां मुलीचं लग्न न झालं तरी चालेल. पैशापाठीं लागलेले हे पशु आज पैसे घेतील अन् उद्यां पोरीचं उणं दिसलं की पुन्हां सरळ माहेरीं आणून गुदरतील." आई म्हणाली.

"अग पण इतके पैसे द्यायला तरी माझ्याजवळ हवेत नं—" वडील खिन्नपणानें हंसून म्हणाले.

"आपण आतां असंच करावं. असेल नशिबांत पोरीच्या तर आपला नवरा हाताला धरून ओढीत आणील. तोंपर्यंत मुलगा समजून थोरल्याबरोबर कॉलेजांत घालावी. आपल्या हातानं तिचा नास नको व्हायला—" आई म्हणाली. आणि मला खरोखरीच आनंद वाटला.

मी कॉलेजांतील पहिल्या वर्षांत असतांना माधवशीं माझी ओळख झाली. खरं सांगू—? मीच ती ओळख करून घेतली. कोण माझी छाती धडधडत होती. मी काय करीत आहे याचें मला भान नव्हतें. माझा घसा कोरडा शुष्क होता, जीभ टाळ्याला चिकटल्यासारखी

झाली होती, डोळे धुंद झाल्याप्रमाणें जड झाले होते; माझा आत्मविश्वास, धिटाई सर्व कांहीं मला पारखें झाल्यासारखें वाटत होतें.

आमच्या कॉलेजनें दुसऱ्या एका कॉलेजशीं क्रिकेटचा सामना घेतला होता. सामना कांहीं मोठा महत्वाचा नव्हता. प्रेक्षकांची गर्दी सुद्धां बेताचीच होती. पण माधव मनांत असलें तर क्रिकेट फार चांगले खेळत असल्याचें मीं ऐकलें होतें, त्याला त्याच्या पराक्रम-भूमीवर पहावा या इच्छेनें मी मुद्दाम क्रीडांगणावर उन्हाची गेलें होते. सामन्याचा निकाल सालाबादप्रमाणें आमच्या विरुद्ध झाला. त्यांत वाईट वाटण्याइतकीं आमचीं हृदयें हळुवार राहिलीं नव्हतीं. दरवर्षी कोसळणाऱ्या पावसाला कां कुणी नांवें ठेवतें ? आमच्या बाजूवर आपत्तींच्या सरीवर सरी कोसळणार, आम्ही माना खालीं घालून शेवटपर्यंत लढणार आणि शेवटीं पराभूत होऊन आपला पराभव कसा झाला याचें सिंहावलोकन करीत परत फिरणार हें अगदीं सूर्यप्रकाशाइतकें स्वच्छ होतें. त्यांत कोठेंही म्हणून शंकास्थानाला जागा नव्हती.

पण माधवनें मात्र यावर्षी खूप नेट धरला—. अकरा गड्यांत सुद्धां यंदा घ्यावें कीं नाहीं अशी परिस्थिति आपल्या पूर्वीच्या शंकास्पद पराक्रमानें निर्माण करणारा बहाद्दर शेवटपर्यंत टिकाव धरून होता. उरलेल्या दहा गड्यांच्या धावांच्या बेरजेपेक्षां तिपटीनें धांवा काढून तो अमर राहिला. आमचा पराजय अवघ्या २१५ धावांनीं झाला. सारे खेळाडू व प्रेक्षक इतस्ततः पांगले. मी मात्र घरीं परतलें नाहीं. मोकळ्या मनानें सांगतें कीं मला माधवशीं बोलावेसें वाटत होतें. माधवच्यावर टेहेळणी करीत त्याच्या मागोमाग फिरणें उचित दिसलें नसतें हें जाणून सुद्धां मी जागची हाललें नाहीं. थोड्या वेळानें सायकलवर टांग टाकून माधव जाणार असें दिसतांक्षणींच मी आवेगानें पुढें झालें.

" एक मिनिटभर थांबाल कां ?— " मी काय बोललें हें माझें मलाच त्यावेळीं समजलें नाहीं.

माधवनें सायकल माझ्याकडे वळवली. नेहमीच्या बेफिकिरी थाटांत तो दातांमध्यें गवताची काडी धरून माझ्यापुढें उभा राहिला. पुन्हां माझ्या छातींत कसेसेंच होऊं लागले. मन सांगूं लागलें कीं हा अतिप्रसंग करणं चांगलं नाहीं.

" मला तुम्ही बोलावलंत—? " माधव सायकलवर रेलून म्हणाला. मीं मानेनेंच होकार दिला.

" तुमची मी पाठ थोपटणार आहे—म्हणजे तुमची स्तुति करणार आहे— " मीं कसेबसें म्हणून टाकलें.

" बापरे ! म्हणजे मग मी मेलोच म्हणानं ! माझ्यापेक्षां तुम्ही सशक्त दिसतां आहां. माझी पाठ म्हणजे बडवायला काढलेली जमीन समजता कां काय— ? " माधव चेष्टेनें म्हणाला. पण मला वाईट वाटलं.

" मर्जी तुमची. मी भोळ्या भावानं तुम्हाला शाबासकी देणार होतें. तुम्हीं विपरीत अर्थ घेतलात— " मी म्हणालें. आणि पाठ फिरवून चालूं लागलें. दोन चार पावलें मी गेलें असेन इतक्यांत माधवचें हंसणें माझ्या कानावर आलें.

मी चमकून मागे वळून पाहिलें. " हें पहा, माझं थोडसं एकून घ्या. तुम्हाला लागावं असं मी चुकून बोललों." माधवच्या चेहेऱ्यावरून मला त्याच्या म्हणण्याची सत्यता लगेच कळून आली. मी तो पुन्हां जवळ येईपर्यंत थांबलें.

" असं करूं या. तुम्हाला जर पसंत असेल तर आपण जरा गांवाबाहेर जाऊं या. मलाही कुणाशीं तरी फार फार बोलावसं वाटत आहे—येतां ? " माधवच्या स्वरांतील ऋजुतेनें आणि आर्जवीपणानें माझा विचार कायम केला.

संध्याकाळची उन्हें तिरकस होत चाललीं होतीं. लवकरच अंधार पडून घरीं जायला उशीर होईल आणि आईच्या चौकस दृष्टीला माझें बाहेर राहाणें चमत्कारिक दिसेल हें स्वच्छ दिसत असतांनासुद्धां मी तयार झालें. आजपर्यंत मी परक्या पुरुषाबरोबर अशी एकटी कधीच बाहेर गेलें नव्हतें. या आयुष्यांत पुन्हां केव्हां जाईन असा संभव सुतराम् नाहीं असें वाटलें.

त्या दिवशीं आम्ही रात्रीं ८॥ वाजेपर्यंत घरीं परतलों नाहीं. किती किती आम्ही बोललों. अन् किती मोकळेपणानें.

" मी तुमची स्तुति करीत असतांना तुम्ही असला खंवचटपणा कां केलांत ? " मीं त्याच्याकडे पहात म्हणालें.

" खरं सांगूं ? ती एक व्यथित मनाची प्रतिकृति होती. यापेक्षां दुसरा कांहीं मुद्दा नाहीं " तो सहज बोलून गेला.

" म्हणजे काय ? " माझ्या बालपणीचा अवशेष अजून नाहींसा झालेला नव्हता. संवयी लवकर जात नाहींत त्या अशा.

" पुन्हां केव्हांतरी सविस्तर खुलासा करीन. तूर्त इतकंच सांगतों कीं नेहमीच्या सरावाला

अनुसरून तुमची स्तुतिसुद्धां मला प्रथम खरी वाटेना. कुणी स्तुति करूं लागलं कीं माझ्या अंगावर काटा उभा राहतो. पण तुमचा विरस झालेला पहातांच मला फार वाईट वाटलं. जन्मांत प्रथम सहानुभूतीचा शब्द तुम्हीं मला ऐकवलात—" माधवच्या बोलण्यांतील तळमळ उघड होती.

" जरा थांबा. आधीं मला ' अहो ' 'जाहो' म्हणणं सोडा पाहूं—" मी मध्येंच म्हणालें.

" किती छान बोललीस बघ. मला वाटतं तुझं नांव जोशी नाहीं कां—. पण हा अहो मिस् जोशी म्हणण्याचा साहेबी थाट मला नाहीं आवडत—, त्यापेक्षां—" सूचक मुद्रेनें माझ्याकडे पहात माधव म्हणाला.

" त्यापेक्षां ' यमू ' म्हणा. काय पुरुषांची जात तरी लबाड ! इतक आडवळण कशाला ? सरळ कां नाहीं विचारलंत ?" मी हंसून म्हणालें.

" हल्लीं सरळ बोलण्याची सोय तुम्ही मुलींनीं ठेवलीच कुठे ? तुम्ही सरळ पायांतली उचलतां." माधव मिस्कीलपणें हंसून म्हणाला.

" तें नका सांगूं हं. सरळ कोण आहे अन् तसला कोण आहे हें जाणण्याचं सूक्ष्म ज्ञान आम्ही मुलीं आईच्या कुशींत असतानांच शिकत असतों." मी अभिमानानें मान तुकवून म्हणालें.

" तरीच जगांतले शेंकडा नव्व्याण्णव विवाह अपेशी ठरतात—" माधव मोठ्यानें हंसत म्हणाला.

" पण ते तसे ठरायला कारण पुरुष—" मी जोरानें म्हणालें.

" भले ! म्हणजे प्रथम तुझ्या स्तुतीचा मला संशय आला तो खराच म्हणायचा तर !" माधव म्हणाला.

" इश्श ! तसं नाहीं बरं का ! पण मी म्हणतें तुम्ही इतके कसें चांगलें खेळतां ?" मी जिज्ञासेनें प्रश्न केला.

" आजच हा मी चांगला खेळलों. थांब, मधें बोलूं नकोस. तूं पाहयला येणार असशील याची मला मुळींच कल्पना नव्हती. उगीचच स्वतःकडे मोठेंपण घेऊन फुशारून जाऊं नकोस." माधव कोटांच्या खिशांत हात अडकावून म्हणाला.

" पुन्हां तुम्ही चालला हं वळणावर." मी क्रोधाचा लटका अभिनिवेष आणून म्हटलें.

" अच्छा ! सरळ सांगायचं म्हणजे मला तुझ्या स्तुतीमुळें आज पोटभर जेवण जाणार हें निश्चित. स्तुति कोणाला प्रिय नाहीं ? माझी एकच आतां विनंती आहे. मधून मधून अशी माझी थोडीशी स्तुति मुद्दाम करीत जा. त्यामुळें मी बिघडणार नाहीं. उलट जेवण चांगलें जाऊन प्रकृति सुधारेल अन् आज तीन वर्षे इंटरला गचके खातों आहे त्यांतून लवकर तरी सुटेन. काय होतं—? एकदां मनुष्य जगाच्या सहानुभूतीला पारखा झाला कीं तो माणसांतून उठतो. माझे वडील नाहींत. आई नाहीं. मामांच्या आणि मामींच्या मनाविरुद्ध मी जगलों. आजपर्यंतच्या पंचवीस वर्षांच्या माझ्या आयुष्यांत दोन गोड शब्द बोलणारी तूं पहिली मुलगी." बोलतां बोलतां माधव गंभीर झाला होता.

"आणि तुम्हीही पण माझ्यासारख्या काळ्या, नकट्या अन्–अन्–कुरूप मुलीशीं इतक्या मोकळेपणानें बोलणारे पहिले पुरुष आहांत." मीही थोडीशी भावनावश होऊन म्हणालें.

" जो आपलें कुरूपपण इतक्या जाहीर रीतीनं प्रकट करतो तो इतर कांहीं गुणांचं पाठबळ असल्याशिवाय असं धिटाईनं बोलत नसतो. " माधव गंभीर होऊन म्हणाला.

आम्ही घरीं परत आलों. माधवला मी दुरूनच आमचें घर दाखवून ठेवलें. घरांत मी एकटीच एखाद्या चोरासारखी लपत छपत शिरलें. आईनें माझ्याकडे गोंधळलेल्या नजरेनें पाहिलें. मी कांहींच बोललें नाहीं. जेवणें वगैरे उरकल्यावर मी आईला झाला प्रकार यथाक्रम सांगून टाकला. आई जास्तच विचारांत पडल्यासारखी दिसली.

" आई, तेही माझ्याइतकेच अन्य प्रकारानें दुर्दैवी आहेत " मी तिचें समाधान करण्याकरतां म्हणालें.

" तें सगळं खरं, यमू ! पण मला तुझी फार काळजी वाटते. आतां बरोबरची झाली आहेस. तुला स्पष्ट सांगायला हरकत नाहीं. तुझ्यासारख्या मुलींना वाईट मार्गाला नेऊन स्वतः नामानिराळे राहणारे पुरुष हजारांनीं सांपडतील. मात्र तूं एखाद्या वेळीं भलत्या संकटांत जाऊन पडशील. असं झालं तर कुत्रा तुझे हाल खाणार नाहीं. म्हणून मी भितें " आई माझ्या पाठीवर हात फिरवीत म्हणाली.

" आई, मग मीही तुझ्या गळ्यावर हात ठेवून सांगतें कीं मी मोहाला बळी पडणार नाहीं. तुला ज्या दिवशीं मी खालीं पहायला लावीन त्याच्या दुसऱ्या दिवशीं मी जगांतून नाहींशी होईन " मी निश्चयानें म्हणालें.

" असं वेडंवाकडं बोलूं नये ! वाढून आलेल्या परिस्थितीला तोंड द्यायला आपल्याला शिकलं पाहिजे " आई म्हणाली

" मी त्यांना आपल्या घरींच बोलावलं आहे. तूंच त्यांच्याशीं एकदा बोल. बघ, तुझी खात्री होईल " मी उत्साहानें म्हणालें.

—आणि वर्ष सहामहिन्यांत माधव आमच्या कुटुंबांतला एक समजला जाऊं लागला.

किती सरळ मनाचा मुलगा. दुसऱ्याकडून चांगलं म्हणून घेण्याकरतां कोण त्या जिवाची धडपड. एके दिवशीं मी सहज त्याच्या लांब केसाबद्दल नापसंती दाखवतांच दुसऱ्या दिवशीं त्यानें ते आंखूड करवून घेतलें. आईनें एखादी वस्तु नाहीं म्हणून म्हणतांच ती दुसऱ्या दिवशीं आमच्या घरांत येऊं लागली. माझ्या वडिलांनीं बकध्यान लावल्यासारखें केलें होतें. परस्पर मुलीचें जुळत आहे, कशाला मधें पडा या विचारानें ते दुरून दुरून पहात होते. भाऊची अन् माधवची चांगली गट्टी जमली.

कालावधीनंतर माधवविषयीं माझ्या मनांत प्रेम उत्पन्न झालें. नाटककादंबऱ्यांतून धुडगूस घालणारें तें प्रेम नव्हतें. त्याचें चांगलें व्हावें, त्याला कोठेंही कमी पडूं नये, त्याला नेहमीं हंसतमुख ठेवावें असल्या विचाराचें तें सात्विक प्रेम होतें आणि याच प्रेमानें माझा घात केला आहे.

इतकें निर्मळ प्रेम जर आमचें नसतें तर मी माधवला केव्हांच फसवला असता. त्याला स्त्रीचें सौंदर्य नको होतें. तिच्या वर्णाबद्दल त्याचा आग्रह नव्हता. त्याची कसलीच अट नव्हती. फक्त त्याच्यावर मनापासून प्रेम करणारी सोबतीण त्याला पाहिजे होती. ज्या सहानुभूतीला तो जन्मापासून दुरावला होता ती सहानुभति पुरवणारी सहचरी त्याला पुरे होती. आणि याच दृष्टीनें तो माझ्याकडे पहात होता. मला त्याच्या सहवासाचा विलक्षण मोह पडला होता. जगांत विवाहाच्या विचारापेक्षां अनेक महत्त्वाच्या गोष्टी आहेत हें मला कबूल आहे. पण विवाह ही बाबसुद्धां त्यापैकींच एक नाहीं कां ? ठराविक वयोमर्यादेला विशिष्ट ओढ लागत असते हें नाकबूल करण्यांत काय स्वारस्य आहे ? माधव समोर असला कीं मला जग निराळं वाटे. तो बोलूं लागला कीं डुलावेंसें वाटूं लागे. आणि तो नसला कीं नाना दुष्ट विचार डोक्यांत थैमान घालूं लागत.

ज्याला मी मनांतून भीत होतें तोच प्रश्न माधवनें एकाच वेळीं आईला व मला टाकला. माझ्याशीं विवाह करण्याची परवानगी आईनें अत्यंत आनंदानें दिली. परंतु मला विचार पडला.

मी काय उत्तर देऊं ?

माधवला नाहीं म्हणणं माझ्या जिवावर येणार आहे—मीं नाहीं म्हणून म्हणतांच तो सरळ माझ्या आयुष्यांतून चालता होईल. पुन्हां तो मला दिसणार नाहीं. आणि पूर्ववत् वर्षोपाठी-मागचें माझें भकास आयुष्य पुढें चालूं राहील. त्यालाही पण माझ्यावांचून करमणार नाहीं. मी जरी सुंदर नसलें तरी त्याच्या चित्तवृत्ति उफाळून टाकण्याइतकें सामर्थ्य माझ्यांत खास आहे. कदाचित् तो वरगडींत खंजीर खुपसल्याप्रमाणें घायाळ होऊन माझ्यापासून दूर जाईल. कदाचित् जगरहाटीला जागून दुसऱ्या एखाद्या मुलीशीं विवाहबद्ध होईल. पण मला तो विसरणें शक्य नाहीं.

मीं जर होकार दिला तर— ? तर— ?

तर मी त्याची वंचना केल्यासारखें नाहीं का होणार ? माझें व्यंग त्याला अजून समजलें नव्हतें, तें समजूं नये म्हणून मी अत्यंत खबरदारीनें वागलें होतें. जर उद्यां त्याच्या नजरेस तो प्रकार आला तर त्याला वाईट वाटल्याशिवाय राहील कां ! अन् मग मी त्याची समजूत कशी घालणार ? अपराधी मनानं मीं त्याला कशी सुखी करूं शकणार ? माझें मन मला जन्मभर खात राहील आणि त्यालाही पश्चात्ताप होईल.

मला नक्की माहीत नाहीं पण असं लोकांना बोलतांना मी ऐकलं आहे कीं घराण्यांत असलेला हा कलंक पुन्हां केव्हां ना केव्हांतरी उमटतो. समजा उद्यां माझ्याच मुलीवर अशी आपत्ति आली तर मी काय करणार ? माझें व्यंग छपवण्याकरतां माझ्या आईवडिलांना काय यातना झाल्या, आणि होत आहेत तें मी डोळ्यानें पहात आहे. उद्यां आमच्या पोरा-बाळांचे असेच हाल आम्ही करावें काय ?

अशी सोन्याची संधि पुन्हां येणार नाहीं. जन्माच्या जोडीदाराचा प्रश्न पुन्हां उपस्थित होणें शक्य नाहीं. माधवची फसवणूक मी जाणून बुजून करूं ? आणि परिणामाला सिद्ध होऊं ?

कां माझ्या सात्विकतेला साक्ष ठेवून माधवला नकार देऊं ? पुन्हां, आईचें मन मोडणें माझ्या जिवावर येत आहे. वडिलांच्या आशाआकांक्षा मी धुळीला मिळवल्यासारखें होईल—आणि दिवाभीताप्रमाणें सारा जन्म घरांत बसून मला काढावा लागेल.

एक वेळ वाटतं माधवला सर्व कांहीं नीट समजून सांगावं. याच्या कानावर सारा प्रकार

मोकळ्या मनानें घालावा. त्याच्या हातांपायां पडावं. त्याची करुणा भाकावी आणि मग काय व्हायचें असेल तें होईल. परिस्थितीला तोंड द्यायला तयार व्हावं. पण माझं स्वार्थी मन कचरत आहे. अतिस्पष्टवक्तेपणा सुद्धां कधी कधी घातक ठरतो. ज्याला आपण भीत आहोंत तोच प्रकार कशावरून घडणार नाहीं ? माधव निघून गेला तर—तर—

मी उद्यां त्याला काय उत्तर देऊं ?

त्याला मी कसं नाहीं म्हणून म्हणूं ?

आणि हो म्हणून तरी कसं म्हणूं ?

मग करूं तरी काय ?

---

# पोतेरें

हातांतली तपेली मोरीच्या कट्ट्यावर ठेवून उमानें पदराच्या टोकानें हात, तोंड कोरडें केलें. अजून उन्हें पडायला खूप अवधी होता. पूर्वेच्या बाजूला नुकतीच रंगरंगोटी होण्यास सुरवात झालेली होती. आकाशांतील इतका वेळ मोठ्या दिमाखानें मिरवणाऱ्या तारका हळूहळू निस्तेज होऊं लागल्या होत्या. पश्चिमेच्या बाजूला क्षितिजावर रेंगाळणाऱ्या चांदोबानें आपल्या प्रयाणाचें प्रस्थान ठेविलें होतें. पांढुरक्या आणि निळसर असा धुक्याच्या झिरझिरत पडद्याआडून वस्तुमात्र हळूहळू दृग्गोचर होऊं लागला होता. दूर अंतरावर रानांत बांधाच्या कडेला पालापाचोळ्याच्या धुरकट ज्वालेभोंवती घोंगड्या पांघरून बसलेल्या व्यक्ति उमाला खिडकींतून अस्पष्टपणें दिसत होत्या. समोरच्या एका नांगरलेल्या वावराच्या कडेला एक गवताचा ढीग पडलेला होता. त्याच्या पोटांत मुटकुळा करून पडलेलें एक तीन पायांचें कुत्रें उमाला दिसत होतें. दूरवर मोहोरलेल्या भरदार आम्रवृक्षाच्या आसऱ्याला उभारलेल्या छोटेखानी गंजीच्या आसपास एक सवत्स धेनु आशाळभूतपणानें रेंगाळत होती. त्यांच्या भाऊबंदाच्या पैकींच एकाची ती गाय होती. एक वीतभर जमिनीच्या तुकड्याकरतां मुंबईच्या हायकोर्टापर्यंत धांव घेणारा गंगूनाना कांहींना कांहीं तरी खेंगटें निर्माण करून उमाच्या नवऱ्याला खिजवूं पाहत होता. या वेळीं त्यानेंच ही गाय आयत्या गंजीवर मोकळी सोडली असली पाहिजे हें उमा जाणून होती. एकवार तिच्या मनांत आलें कीं, अनायासें सांपडली

आहे तर ती गाय दावणीला बांधून ठेवावी, किंवा धुणें वाळत घालण्याच्या कळकीनें तिचें पाठाड धिरट्यासारखें विरविगीत करून सोडावें. पण तिनें यापैकीं कांहीं केलें नाहीं. गाय स्वतःही हाकलली नाहीं कीं बाहेर असलेल्या माणसाचें तिच्याकडे लक्ष वेधविण्याचें काम तिनें केलें नाहीं.

त्या गाईचे दूरवरून दिसणारे भिरभिरे डोळे पाहून आणि क्षुल्लक आवाजाला भिऊन एकाएकीं मधूनच ताठरलेले तिचे कान पाहून उमाला धीरच झाला नाहीं. जगांत अशक्त आणि दुबळे जीव आपल्या जगण्यालाच जिथें भितात तिथें आणखी त्यांना दंडाची भीति कशाला? असाच कांहींसा विचार तिच्या मनांत उभा राहिला असावा. विशेषतः त्या इवल्याशा वासराचें तिला फार कौतुक वाटलें. किती निःशंक मनानें आईच्या पायांत घुटमळत तो चिमणा जीव आला दिवस साजरा करीत होता! अगदीं आपल्या पाळण्यांतल्या भगवंताप्रमाणेंच!

सव्वा वर्षाच्या भगवंताच्या विचारासरशीं उमानें झटकन् मान फिरवून माजघराच्या दिशेनें सस्नेह पाहिलें. जिवाला केवढा विसांवा होता त्या माजघरांत! मोडकळीस आलेल्या जहागिरदाराच्या पत्नीला दिवसाचा शीण घालवायला दुसरें कोणतेंच साधन नव्हतें. बापूसाहेब तीन वर्षांपूर्वीं लग्नाच्या वेळीं जहागिरदार होते. आजहि ते जहागीरदार म्हणून मिरवीत होते. परंतु उताराला लागलेल्या चेंडूच्या अवसानानें ते झपाट्यानें खालीं येत होते. उमानें पहिल्या वर्षीं दोन मोलकरणी व तीन गडीमाणसें राबवून घेतलीं. दुसऱ्या वर्षीं एक बाई व एक गडी असा जमाना सुरू झाला व तिसऱ्या वर्षाचे शेवटीं 'दादा, बाबा' करून अर्धोळीनें जमीन करणाऱ्या कुळवाड्यांच्या मागें लागून तिला घरांतील अवजड कामें करून घ्यावीं लागलीं. परंतु उमा एका शब्दानें बापूसाहेबांना बोलली नाहीं. तिला धीरच झाला नाहीं. गांवच्या खळखळ वाहणाऱ्या ओढ्यानें सागराला दमदाटी देऊन कसें चालेल या विचारानें तिनें सारें सहन करून घेतलें. आतां घरांतलीं सर्व कामें तिनेंच करावीं, दोन्ही सांजा शहाण्णव खणांचा उकिरडा दंड दुखेपर्यंत केरसुणीनें साफ करण्याचा प्रयत्न करावा, बापूसाहेबांच्या मिजाशी कंबर दुखेपर्यंत सांभाळाव्यात आणि रात्रीच्या वेळीं पाळण्यांत पडलेल्या भगवंताला चंद्रमौळी छपरांतून डोकावणाऱ्या 'चांदोबा'चें दर्शन घडवीत त्याला उद्देशून 'अंगाई गीतें' गावींत यांतच तिला आपल्या जिवाचें सार्थक करून घेणें भाग होतें.

ही कर्मकथा उमाच्या अंत:करणाला नेहमीं पाझर फोडी. आईबापांनीं डोळे उघडे ठेवून लावून दिलेले संबंध जर असे कुजके निघतात तर बिचाऱ्या पशुपक्ष्यांना आपण जास्त हालांत कां ढकलां ?

पुन्हा एकवार ओलसर पदरानें स्वच्छ तोंड करून उमा आंत जायला निघाली. बाल- पणासून जडलेल्या संवयीमुळें जातां जातां तिनें उगवत्या सूर्यनारायणाला भक्तिभावानें वंदन केलें.

फार वेळ गमावणें आतां शक्य नव्हतें. बापूसाहेबांची बडदास्त राखणें हें त्यांच्या धर्म- पत्नीचें आद्यकर्तव्य होतें. एरव्हीं बापूसाहेब छपराच्या झरोक्यांतून येणाऱ्या किरणांनीं जाग आणल्याशिवाय कधींहि उठत नसत परंतु आजची वेळ जरा निराळी होती. सुमारें दहा मैलांवर असलेल्या भोळी गांवांत जत्रा भरणार होती. सकाळीं कासराभर दिवस वर आल्यावर ते डोईवर दिवस येईपर्यंत तमाशांची बारी लागणार होती. गांवच्या पाटील- तलाठ्यानें काल रात्रींच मोठ्या सन्मानानें जहागिरदारांना आंवतण केलें होतें. आणि त्यांतून अत्यंत महत्त्वाची गोष्ट म्हणजे थेट कोल्हापुराहून येणारा एक वग बापूसाहेबांच्या खास सलगींतला होता. लग्नापूर्वीं एकदोन वर्षें त्यांनीं उदारपणानें त्या मंडळींना स्वतःच्या खर्चानें गांवोगांवीं हिंडवलें होतें. आणि लोकापवाद असाहि होता कीं, त्यांच्यांतल्या विटेकरणीनें त्यांचा दिल आणि त्यांची दौलत या टोकापासून त्या टोकापर्यंत सफा कापण्याची करामत करून दाखवली होती.

माणसाला असले छंद नसले तर जहागिरदार कसला ? या कल्पनेनें बापूसाहेबांनीं त्या बाईला आपल्या विश्वासांत ओढलेली होती. जहागिरदारानें लबाड लोकांपासून सावध असावें, हा मृत वडिलांचा इशारा त्यांच्या दृष्टीआड झाला नव्हता. तरी सुद्धां लुटून लुटून किती लुटणार या अवसानानें त्यांनीं त्या विटेकरणीचा लोभ दूर केला नाहीं. लग्नानंतर उमा घरांत आली. आणि बापूसाहेब बाहेर पडले स्वत:चें घर ही त्यांची मधूनमधून टेकण्याची धर्मशाळा झाली, व तमाशाच्या वगाचा मुक्काम हें त्यांचें वैकुंठ झालें.

आज त्यांना जाणें भाग होतें, आणि तें कां हें उमाला माहीत होतें. उमानें आपल्या स्वभावाला जागून त्यांना एका अक्षरानें विचारलें नव्हतें. बापूसाहेबांच्या विवाहित भगिनीनें एके दिवशीं उमाला वस्तुस्थितीचें यथार्थ ज्ञान करून दिलें म्हणून उमाला कळलें. नाहीं तर जहागिरीसंबंधाच्या खटल्यानिमित्त पुण्यामुंबईच्या कोर्टांत जावें लागतें, अशा पतीनें

करून दिलेल्या समजुतीवरच ती गप्प बसली होती. आणि आतां हें कळून तरी काय फरक पडला? स्त्रीस्वभावसुलभ असूयेच्या तिडकीनें ती चार दिवस मनांत खात राहिली आणि शेवटीं पतीला विचारण्याचें धाडस आपल्या हातून होणें शक्य नाहीं असा विचार करून ती नित्याच्या कामाला लागली.

उभा जन्म खेड्यांत वडिलांच्या कडक शिस्तींत घालवलेल्या, मराठी दोन बुकें ओळखणाऱ्या पोरीनें जहागिरदाराला विचारावें तरी कसें? आईवडिलांना सांगण्याची सोय नाहीं हें पाहून बिचारीनें आपल्या फुटक्या नशिबाला हात लावला. बापूसाहेब निरंकुश स्थितींत नवीन लफड्यांत घोटाळूं लागले. जहागीर सावकाराच्या घशांत जाऊं लागली—पण जहागिरदारांचा नूर अल्पांशानें देखील पालटला नाहीं.

पुष्कळ दिवसांच्या धुराच्या सान्निध्यानें बुडाला चकाकणाऱ्या हंड्यावरून उमानें घाईघाईनें हात फिरविल्यासारखें केलें. रानशेणीच्या ढिगाऱ्याखालीं वाळलेला पाचोळा सरकावून तिनें हंड्याखालीं जाळ केला. धुराचे लोटच्यालोट आसमंतात् पसरूं लागले. नाकातोंडांत धूर शिरल्यामुळें उमानें हातातली लोखंडी फुंकणी थोड्याशा चिडखोरपणानें जमिनीवर आपटली आणि आतां डोळे मिटवून तोंडाचा चंबू करून ओणव्यानें फुंकर घालण्यास सुरुवात केली. कुरकुरत का होईना पण आळसलेला अग्नि जिभा लोलावूं लागलेला पाहतांक्षणींच उमा रडक्या चेहऱ्यानें हसूं लागली.

थोड्या वेळानें बापूसाहेब बेंबीवर सरकलेलें धोतर वर खेचीत मागच्या परसूंकडे गेले. बांधाच्या कडेला बसलेल्या कुळवाड्यांनीं सावकारांना पाहतांक्षणीं दुरूनच रामराम केला. तीन पायांच्या कुत्र्यानें भीतीनें आपलें अंग जास्तच चोरून घेतल्यासारखें केलें, हा वेळपर्यंत दोन पावलें अलीकडे आलेल्या सवत्स धेनूनें कान उभारून विरुद्ध दिशेनें चालायला सुरुवात केली. गंगूनानांची गाय पाहतांक्षणींच बापूसाहेबांनीं हंडयाखालीं जळणारे बांड खसदिशीं बाहेर उपसून घेतले, व त्याक्षणीं गैरहजर असणाऱ्या गंगूनानांच्या बेचाळीस पिढ्यांची एका ठेवणींतल्या शब्दानें बोळवण करीत ते पुढें झाले.

गाईची पूजा यथाविधि उरकल्यानंतर त्यांनीं माघारीं परतून उमाला हाक मारली. त्वरेनें उमा बाहेर आली. "माझी जहागीर म्हणजे गांवच्या उपटसुंभांना अन् त्यांच्या जनावरांना चरण्याची फुकटची जागा आहे काय? दोन डोळ्यांनीं तूं पाहत होतीस पण तिथपर्यंत जायला काय तुझे पाय मोडले होते? उन्हाळ्याची साठवलेली दाणावैरण

अवलादींनीं सफा चट केली, तर तुझा बाप येऊन चार चवल मोजणार आहे ? बघतेस कुणीकडे ? मी तुझ्याशीं बोलतों आहे. जेजुरीच्या खंडोबाशीं बोलत नाहीं मी. '' बापुसाहेब हातांतलें विझलेलें लाकूड पुन्हा हंड्याखालीं ढोसून म्हणाले. उमानें वर मान करून सुद्धां पाहिलें नाहीं !

'' आणि हें माझं आंघोळीचं पाणी. गांवांतले माझे चार शत्रूसुद्धां माझ्या प्रेताला यापेक्षां जास्त गरम पाण्यानें आंघोळ घालतील. तूं बायको नाहींस, लाकडाचा ओंडका आहेस. चल हो बाजूला. हंड्याखालीं दोन लाकडं खुपसण्यापेक्षां तुझे हातपाय कां घालीत नाहींस त्यापेक्षां ? नेहमींचे बारावर एक आहेतच. पण एकादे वेळीं जरा लवकर आंघोळ उरकावी म्हटलं तर या जन्मांत जमायचं नाहीं. '' बापूसाहेब संतापानें उमाकडे पाहून म्हणाले.

तरीसुद्धां उमानें उत्तर केलें नाहीं. आपल्यावरचा पतीचा राग अन्यायाचा आहे हें तिला कळत असूनसुद्धां उलट उत्तर करण्याचें धारिष्ट तिला करवलें नाहीं. जें रक्तांतच नाहीं तें आयत्या वेळीं कसें आणतां येणार ?

बापूसाहेबांनीं रागारागानें हंड्यांतील पाणी चुलींत ओतलें आणि हंडा दूर भिरकावून दिला.

—नंतर पुन्हां एकदां चहाच्या वेळीं त्यांच्या स्वभावानें उचल केली.

'' हा सांजा केला आहेस का चिखल कालवला आहेस ?'' बापूसाहेबांनीं सांजा बोटानें चाचपीत म्हटलें.

'' घरच्या रव्याचा आहे तो ! अन् साखर दोन दिवस झाले संपली होती म्हणून गूळ घातला आहे. '' उमानें एका हातानें थरथरणाऱ्या छातीला आधार देत म्हटलें.

'' जीभ लांब काढून बोलतेस वर ? बाजारचा रवा, साखर, पोतं पोतं आणून टाकली तरी माझ्या नशिबीं हा रेंदा आहेच ! कुणाला नेऊन देतेस का काय करतेस, मला तलास काढलाच पाहिजे. '' बापूसाहेब हातांतली बशी जमिनीवर आदळून म्हणाले. बशी फुटली नाहीं परंतु शिरा मात्र मातींत कालवला गेला.

बापूसाहेब रागारागानें उठून उभे राहिले. '' एक, एक काम तुझं धड नाहीं. बापाला हाव सुटली जहागिरदाराचा सासरेपणा मिळण्याची अन् हें गोणपाट त्यानं माझ्या अंगावर भिरकावून दिलं. म्हटलं, रूपानं हिरडाबेहडा असली तरी घरकामाला चोख उतरेल. पण धड रूपाची लज्जतहि नाहीं अन् दावणीला बांधण्याच्या उपयोगाचीसुद्धां नाहीं. अंबोण खायला मात्र वखवखून येशील. खा आतां तें मातींतलं शेण—तुझ्यापेक्षां हजारपटीनं

देखण्या पोरी माझ्या पायावर लोळण घ्यायला तयार आहेत. तूं काय समजली आहेस ? तूं घरांतला भटारखाना नीट संभाळलास तर बरं आहे, नाहीं तर पेकाटांत लाथ मारून घालवून देईन— ''

बापूसाहेब ताबडतोब घराबाहेर पडले आणि उमानें पदरानें डोळे पुसले.

उमा विचार करूं लागली. खरंच, काय जगण्यांत अर्थ होता ? सौंदर्य कांहीं कुणाच्या हातांत नसतं. त्यांतून कांहीं झाकूनपाकून हा लग्नाचा बनाव घडवून आणलेला नव्हता. उभयपक्षीं पसंतीचा शिक्कामोर्तब झाल्यावर हें शुभमंगल झालें होतें. मग आतांच हा दुस्वास कां ? हिरडा-बेहडा म्हणून नेहमीं आपल्याला हिणवण्यांत यांना काय पुरुषार्थ वाटतो ? हिरड्याच्या किंवा बेहड्याच्या अंगीं औषधी गुण नाहींच का ? आपला असा छळ करण्यांत मतलब काय ?

बापूसाहेबांची विचारसरणी उमाच्या लक्षांत येणें शक्य नव्हतें. तिच्या सौंदर्यावर खूष होऊन त्यांनीं तिला आपल्या घरांत आणली नव्हती. तिच्यावर आपला जीव कुर्बान करावा असें त्याला एक क्षणभर देखील वाटलें नव्हतें. तिला जवळ करण्यांत त्यांचा एकच हेतु होता आणि तो म्हणजे औरस संततीचा. आपल्या गुणी स्वभावामुळें आणि मराठी सहा इयत्तांच्या अफाट शिक्षणाच्या लौकिकामुळें आपल्याला आसपासच्या प्रदेशांत रूपवती भार्या मिळणें शक्य नाहीं हें पूर्णपणें ओळखून त्यांनीं आपल्या दोस्तांमार्फत चौकशीचा खडा खानदेशांतल्या एका खेडेगांवच्या भिक्षुकावर फेकला होता. खडा बरोबर लागला, आणि उमा जाहगिरदारीण बनली. कदाचित् औरस संततीच्या कल्पनेलासुद्धां बापुसाहेब बळी पडले नसते. परंतु आपल्या पश्चात् जहागिर आपल्या भाऊबंदाच्या हातांत जाऊं देण्यास ते मुळींच राजी नव्हते. येवढ्या-करितां त्यांनीं उमाच्या हाताला हात लावण्याचें ढोंग केलें. भगवंत जगांत सव्वा वर्ष लोटलें होतें. बापूसाहेबांनीं टपलेल्या भाऊबंदांच्या टाळक्यांत बडगा घातला होता. आतां उमा त्यांना कशाला पाहिजे होती ?

स्वतःच्या चैनीकरता त्यांना दाही दिशा मोकळ्या होत्या. बाहेरच्या जगांतील सुखाला हपापलेल्या त्यांच्या जिवाला उमाचा सीधेपणा कसा खपावा ? आतां सोडतां येत नव्हते आणि धरावेंसें वाटत नव्हतें. दोनदा त्यांनीं उमाला माहेरीं जाण्याची आज्ञा केली होती. पण उमानें घर सोडण्याचे साफ नाकारलें. नाहीं म्हणावयाला एवढा धीर तिनें केला होता; काय वाटेल ते झालें तरी आपलें घर सोडायचें नाहीं हा तिचा निश्चय होता. दर पंधरवड्यानें बापूसासाहेबांच्या नव्या पराक्रमाची हकीकत तिच्या कानांवर कर्णोपकर्णी येत होतीं—पण तिनें घराचा उबरठा कांहीं ओलांडला नाहीं.

आज मात्र अति झालें होतें. बापूसाहेबांचें फटकळ, तोडून टाकणारें भाषण तिच्या सरावाचें झालें होतें. तरी सूर्योदयापूर्वी पाहिलेल्या गाईच्या आठवणीनें तिला चैन पडेनासें झालें. सवत्स धेनूला मारणाऱ्या बापूसाहेबांच्या हातून आपलीही अशीच बोळवण होईल की काय या भीतीनें तिचा जीव उबगून गेला होता. त्या पशूला निदान वाटा मोकळ्या होत्या—पण आपली तशी स्थिति नाहीं. आपण काय करणार ?

पाळण्यांतल्या भगवतानें हंबरडा फोडलेला कानीं पडतांच उमा हातांतलें उलथनें तसेंच टाकून घाईघाईनें माजघरांत पळाली.

दुपारीं न्हाऊंमाखूं घालून मुलाला उमानें पाळण्यांत घातलें. सकाळपासून खस्ता खाण्यांत तिचें मन गुंतल्याकारणानें ती सकाळचा प्रकार थोडाबहुत विसरल्यासारखी झाली होती. परंतु पाळण्याच्या हेलकाव्यासारखी पुन्हा त्या आठवणीला हेलकावे बसूं लागले. बाळ किती शहाणा आहे नाहीं? ती मनांतल्या मनांत म्हणाली. आई म्हणून कोणी म्हटल्याबरोबर आपल्याकडे बोट दाखवून धावत येतो, गुलामाला आई कशी ओळखते? कोणी शिकवलं त्याला ? अन् भाकरीचं पीठ मळण्यांत आपण गुंतलों असतांना पाठीवर तरी कसा पालथा पडतो आपल्या ? सतरादां बुदवुद पडतो पण चालण्याचा कोण नाद !

विचारासरशीं उमा स्वतःशीच हसली. झोका थांबवून बाळाचा मुका घेण्याचा तिचा विचार होता. आवेगासरशीं ती किंचित् पुढें वाकली—आणि झटकन् तिनें आपलें तोंड मागें घेतलें. निजलेल्या मुलाचा मुका घेणं वाईट असतं हा आईचा शब्द तिला एकाएकीं आठवला. पुसटता विचार सुद्धां शिल्लक राहूं नये म्हणून तिनें आपले आसुसलेले ओंठ पदराआड दडवले.

सहजच तिनें बाहेरच्या दरवाजांतून दिसणाऱ्या रस्त्याकडे पाहिलें. एका पोऱ्याच्या डोक्यावर एक कातडी बॅग व लहानशीं वळकटी अशा सरंजामानिशीं घरांत शिरणारी नणंद दृष्टीस पडतांक्षणींच, बाळाच्या पाळण्यावर जुनेऱ्याची घडी घाईघाईनें पसरून ती जवळ जवळ धावतच पुढें गेली.

"आज मधेंच एकाएकींच इकडे कुणीकडे ? अन् पत्रानं कळवलं सुद्धां नाहीं ?" नणंदेचा हात धरून उमा म्हणाली. "पत्र पाठवायचं कुणाला ? आमचे बंधुराज वर्षांतून बारा महिने बाहेरच असणार. त्यांतून तुला पत्र पाठवण्यापेक्षां समक्षच भेटलेलं जास्त चांगलं म्हणून केला कंटाळा. बरं, मला फार वेळ राह्यला सवड नाहीं. मी पुण्याहून आमच्या घरनं फक्त आजचीच परवानगी घेऊन आलें आहे. आतां वाजले आहेत बारा. संध्या-

काळच्या गाडीपर्यंत मला राहतां येईल. रात्रीं नऊ वाजतां पुण्याला पोहोचलें नाहीं तर साहेब पोलिसांत वर्दी देणार आहेत. आधीं मला भूक लागली आहे. एकादं झकास थालपीठ करशील का ?'' मनगटावरील चमेचंची खुंटीला टांगून उमाची नणंद म्हणाली. पोऱ्याच्या डोक्यावरचें सामान उमानें उतरून घेतलें.

'' अगदीं घोड्यावरनं आल्यासारख्याच वागतां आहांत, वन्सं !'' उमा रागाचा आविर्भाव आणून म्हणाली.

'' घोड्यावरनं का, चांगली सर्विस मोटारनं आलें. अन् मला चांगलं नांवानं सुलभा म्हणणार असशील तर बरं आहे. नाहींतर ही आत्तांच परत जातें.'' सुलभा उमाच्या हातांत हात अडकवीत म्हणाली.

'' वन्स, मानानं अन् वयानं तुम्ही माझ्यापेक्षां वडील आहांत, कितीदां तुम्हांला सांगूं ? तुम्हांला नांवानं हांक मारण्याचा मला अधिकार नाहीं. तुम्ही कितीहि जरी रागावलांत तरी मी पायरीला पाय लावणार नाहीं !'' उमा हसून म्हणाली.

'' हा तुझा बावळटपणाच तुला नडतो आहे. विसाव्या शतकांत राहून तूं सत्ययुगांतल्या गोष्टी बोलतेस ! अशानंच दादाला फावल्यासारखं होतं. तुझ्या लग्नाच्या आधीं मी त्याला घरांत शब्द बोलूं देत नव्हतें.'' सुलभा म्हणाली.

'' थांबा हं. त्या पोरानं मेल्यानं दार ढकलूनसुद्धां घेतलं नाहीं. आपण स्वयंपाकघरांत बोलत बसूं. मी थालपीठ लावतें—'' म्हणून म्हणत अल्लडपणानें उमा बाहेरच्या दरवाजाकडे धावली.

उमानें लांकडें सारखीं केलीं. बरोबर आणलेल्या डब्यांतला चिवडा दोघींच्या मधोमध ठेवून सुलभा बोलत होती व मध्येंच खात होती. उमा आपल्या कामांत गर्क होती. मध्येंच आठवल्यासारखें करून सुलभा म्हणाली, '' अन् आज बापूसाहेब कोणत्या दौऱ्यावर गेले आहेत ?''

'' भोळीला जत्रा आहे आज—'' उमानें उडवाउडवी करण्याच्या हेतूनें तुटक उत्तर केलें.

'' म्हणजे हा नक्की गुण उधळायला गेला ! काय माणसाची जात असते पाहा. वाल्हे गांवांतला हा सर्वांत श्रीमंत जहागिरदार. कितीहि ऐदीपणानं बसून खाल्लं तरी चार पिढ्यांना सरणार नाहीं इतकी लक्ष्मी कोपऱ्यांतनं लोळत होती. माझ्या लग्नाला तूं येण्याच्या पूर्वी चार वर्षे पांच सहा हजार रुपये खर्च केला. आणि या मागच्या दहा वर्षांत ही

बाळानं अवकळा आणून सोडली. आमच्या आईनें याला लाडोबा करून ठेवला, त्याची हीं फळं आहेत. " आडोशाला बिड्या ओढतोस? नको बाळा, चार-चौघांत धूर काढ" असल्या या फाजील लाडानं हा वाह्वला. आणि आतां बायको मिळाली ती ही अशी रड्बाई ! मला पाहिलं म्हणजे कसा गुरकावतो पण ? " सुलभा हसून म्हणाली.

" वन्सं, आपल्या माणसांना आपणच नावं ठेवलीं तर लोक कमी करतील का ? " उमा हलकेच म्हणाली.

" पण ही झाली तुझी बाजू. याला कांहीं त्याचं आहे का ? मी तेवढ्याचकरतां आज आलें आहे. तुझं थालपीट खातां खातां तुला सांगतें, भगवंत झोपला वाटतं—!" पाळ-ण्याच्या दिशेनें पहात सुलभा म्हणाली.

ऊन ऊन थालपीठ बोटावर फुंकर मारीत सुलभा खात होती.

" मी तुला आज माझ्याबरोबर पुण्याला नेणार आहे ! " सुलभा मधेंच म्हणाली.

" पुण्याला नको गडे; विलायतेला का नेत नाहीं त्यापेक्षां ? " उमा गालांतल्या गालांत हंसून म्हणाली.

" तुला चेष्टा वाटते आहे ! खरंच, तुला मी पुण्याला नेणार आहे. एकंदर सगळ्या परिस्थितीचा विचार करूनच मी बोलतें आहे. हा विषय चेष्टेचा नाहीं. तुझ्या सबंध आयुष्याचा हा प्रश्न आहे. " गंभीरपणानें सुलभा म्हणाली.

" माझ्या आयुष्याचा प्रश्न आतां पुन्हा कशाला निघेल ? " आश्चर्यानें उमा सुलभेकडे पाहात म्हणाली.

" खुळी आहेस. दादाचा तूं फार भरंवसा धरूं नकोस. तो आतां माणसांतला राहिला नाहीं, हें उघड आहे. परवां त्याच्यासंबंधींच्या एक एक गोष्टी मला आमच्या घरांत समजल्या, तेव्हां त्यांचं सुद्धां हेंच मत पडलं कीं, तुला शिकवून स्वतःच्या पायावर उभं राहण्याची धमक आणल्याशिवाय तुझा निभाव लागणार नाहीं. एकदां माझ्या हातून एक पाप घडलेलं आहे. "

" इश्शं ! काय बोलतां हें वन्सं ! " उमा खालच्या मानेनें म्हणाली.

" तूं भलता अर्थ घेऊं नकोस ! माझं पाप म्हणजे हेंच कीं मला आमच्या बंधुराजांची पुरी माहिती असतांनासुद्धां मी तुझ्या घरच्या माणसांना त्यांतलं एक अक्षर सांगितलं नाहीं. तुझा गळा या टोकापासनं त्या टोकापर्यंत कापायला मीं अप्रत्यक्षपणें मदत केलेली आहे–" सुलभा दूरवर पाहत गंभीर होऊन म्हणाली.

" वन्सं, कसं हो तुम्हांला असलं बोलवतं ? " उमा खिन्नपणानं मान हालवून म्हणाली.

" स्त्री जातीला स्त्री जातीचीं दुःखं नेमकीं कळतात. माझी प्रथम कल्पना होती कीं लग्न झाल्यावर दादा नीट वागेल. पण ती कल्पना खोटी ठरली. इतकंच नव्हे तर एका गरीब गाईच्या जन्माचा मीं घात केला हें मीं पूर्णपणें समजलें आहे. गोष्ट होऊन गेली; त्याला इलाज नाहीं. पण वेळकाळ आला तर तुझ्या हातांत एखादं स्वसंरक्षणाचं हत्यार तरी असूं द्यावं म्हणून मी धडपडत आलें. बापू असता तर त्याला विचारलं असतं—" सुलभा विचार करीत म्हणाली.

"वन्सं, रागवूं नका—पण तुम्ही म्हणतां तें शक्य नाहीं." उमा निश्चयाच्या स्वरात म्हणाली.

" कां ? नवऱ्यानं वाटेल ते ढंग करावेत तें चालतं अन् बायकोनं स्वतःच्या संरक्षणाची सुद्धां तरतूद करूं नये ? माझं तूं ऐकून घे. बायकोच्या जातीनं पुरुषांच्या तोडीसतोड म्हणून भलता मार्ग पत्करावा असं मीं स्वप्नांतसुद्धां मान्य करणार नाहीं. पण स्वतःच्या सामान्य सुटकेचा मार्गसुद्धां तिला मोकळा असूं नये असं कोण म्हणेल ? तूं माझं ऐक. " सुलभा आर्जवाच्या सुरांत म्हणाली. उमानें कांहींच उत्तर केलें नाहीं.

" बापूच्या मनांतून तूं उतरलेली आहेस हें मला माहीत आहे. यापुढें तो कदाचित् तुला—" सुलभा एकदम थांबली.

आपल्याला आपले पतिराज कदाचित् मारहाण करून हाकलूनसुद्धां देतील हें उमाला सांगायला सुलभेची जरूरी नव्हती. पेकाटांत लाथ मारून घालवून देण्याची भाषा गेले सहा महिने ती ऐकतच होती. बापूसाहेबांचा दिवसेंदिवस वाढत जाणारा छळ उमाच्या डोळ्या-समोर स्वच्छ उभा होता. या घरांत आपली धडगत नाहीं हें स्पष्ट होतें. पण-पण-

हा मार्ग विचित्रच नव्हता का ? या घरांत पोतेऱ्यापेक्षां आपल्याला जास्त किंमत नाहीं हें ती जाणून होती. आपण निघून गेलों तर बापूसाहेब आपल्या नांवानें आंघोळ करून मोकळे होतील हेंहि तिला माहिती होतें. पण-पण— !

" तुला अवघड वाटत असेल तर आजच कांहीं माझी घाई नाहीं. आठ दिवसांनीं म्हणत असशील तर आठ दिवसांनंतर मी तुला घेऊन जाईन. मात्र हें नक्की ध्यानांत ठेव कीं बापू कोणत्याहि उपायानं सुधारणं शक्य नाहीं. श्रीमंताची मूर्ख मुलं शेवटीं भिकारी-पणांतच मरायचीं असतात. त्यांच्या संपत्तीला तो शापच असतो. जगांतला कितीही मोठा महात्मा त्यांच्यापुढें आणून उगाळला तरी त्यांना उपरति होत नसते. एरव्हीं पैसा चंचल कसा म्हणतां येईल ? "

सुलभा उमाच्या खांद्यावर हलकेच हात ठेवून म्हणाली. उमानें तिच्या मांडीवर डोकें ठेवून मुक्त कंठानें रडण्यास सुरुवात केली.

आठ दिवस होत आले तरी उमाचा निश्चय झाला नव्हता. एक वेळ वाटे सुलभेच्या म्हणण्याप्रमाणें करावें आणि पुन्हा वाटे एवढ्याच करतां का आपण आईबापांचें घर सोडून आलों ? हेंच का आपल्या आयुष्याचें ध्येय ? मांडलेला संसार मोडणें स्त्रीला फार कठीण वाटतें. ज्या हौसेनं संसार मांडला तो मोडतांना त्यांना कमालीचें दुःख झाल्याशिवाय कसें राहील ? पुरुषाची वृत्ति नेहमीं नवीन पराक्रम करण्याची असते; पण स्त्रीची वृत्ति त्यानें मिळून आणलेलं ठीकठाक ठेवण्याकडेच जास्त असते.

सातव्या दिवशीं सुलभेनें पुण्याहून धाडलेलें पत्र बापूसाहेबांच्या हातांत पडलें. पत्र अर्थातच त्यांना उद्देशून होते. त्यांनीं पत्राचें वाचन शांतपणानें केलें. आश्चर्याचा, रागाचा, शोकाचा कसलाच भाव त्यांच्या चेहऱ्यावर दिसत नव्हता.

" तुझ्या दिवट्या नणदेचं पत्र आलं आहे—" म्हणून म्हणत उपरोधिकपणानें हसून त्यांनीं पत्राची घडी उमाच्या अंगावर फेकली. उमा भगवंताला मांडीवर घेऊन खेळवीत होती. तिनें तें पत्र वाचलें नाहीं. बापूसाहेब थोडा वेळ मुकाट्यानें येरझारा घालीत होते. उमा भगवंताच्या गालावर बोट ठेवून त्याला हसवीत होती. हिंडतां हिंडतां बापूसाहेब मधेंच थबकून म्हणाले—, " तूं गेलीस म्हणून कांहीं जग ओस पडणार नाहीं, समजलीस ? तुझ्यासारख्या खतरुड तोंडाच्या खोकडाशीं जन्म काढायला मी कांहीं तितकासा उत्सुक नाहीं. तुला एकदां स्पष्ट सांगून टाकतों. तूं मेलीस किंवा या घरांतून गेलीस तर मला तेंच पाहिजे आहे. परवांच्या जत्रेंत मी त्या विटेकरणीला शब्द देऊन टाकला आहे. तूं इथं राहिलीस तरी चार आठ दिवसांत ती इथं येईल. तिची लुगडीं तुला धुवावीं लागतील. माझी जवानी तुझ्यासारख्या खरबुजावरून ओवाळून टाकायला मी केव्हांहि तयार नाहीं. माझ्या हातून जें राहील तें पुरतं उधळायला हा औरस पोरगा आहे तेवढा बस्स आहे. तिकडं तूं शीक नाहींतर—" बापूसाहेबांनीं अत्यंत अभद्र शब्दानें आपलें वक्तव्य पुरें केलें. उमा कसली तरी शंका येऊन घाबऱ्या स्वरानें म्हणाली—

" म्हणजे भगवंताला तुम्ही माझ्याजवळ ठेवणार नाहीं ?"

" तो जहागीरदाराचा मुलगा आहे, सैंपाकिणीचा नाहीं. तूं गेलीस तर त्याला छप्पन आया मी पुरवीन."

बापूसाहेब म्हणाले. उमा विचार करीत होती. पोतेऱ्याला निदान मन तरी नसतें. आपल्याला तें नसतें तर किती छान झालें असतें! काय करावें? विचारासरशीं तिनें मोठ्या प्रेमानें भगवंताला छातीशीं घट्ट आवळून धरलें. त्या दिवशीं सकाळीं पाहिलेल्या सवत्स धेनूची आठवण होऊन ती जास्तच घाबरल्यासारखी झाली. 'तुमच्या पायाशीं जीभ हासडून प्राण देईन पण पोराला मांडीवरून सोडणार नाहीं' असें उत्तर तिच्या जिभेवर होतें; उत्तर देणें सोपें होतें; पण मग सुलभेनें सुचवलेल्या स्वसंरक्षणाच्या मार्गाची काय वाट?

हलक्या कुळांत जन्मलेल्या घाणेरड्या बायकांचीं नुसतीं लुगडीं धुऊन भागण्यासारखें नव्हतें. त्याच्याबरोबर पतिराजांची भेदक बोलणींहि सहन करावीं लागणार होतीं. ह्यांतून एकादे वेळीं अति झालें म्हणजे त्या बाईचींहि बोलणीं खावीं लागतील. क्वचित् प्रसंगीं अंग-झटीचाहि प्रसंग येण्याचा संभव जबरदस्त होता. खरं सांगायचं तर बापूसाहेबांच्या घरांत एक पळभरसुद्धां राहूं नये असें उमाला राहून राहून वाटत होतें. मनुष्य बोलला नाहीं तरी सहनशीलतेलासुद्धां मर्यादा असतेच. साध्वी पतिव्रता असली तरी तिच्या साधूपणालासुद्धां केव्हां ना केव्हां तरी ओहोटी लागतेच. बापूसाहेबांच्या बोलण्यावरून व वागण्यावरून ती मर्यादा घालण्याची वेळ आलेली आहे हें उमाला कळून चुकलें. शब्दानें शब्द वाढत जातील, कुरापतींना उसंत राहणार नाहीं आणि शेवट शरीराचे हालहाल होऊन जिवंतपणीं नरकयातना सहन कराव्या लागतील हें तिला पटलें होतें—पण—पण—

भगवंताच्या निष्पाप डोळ्यांकडे तिनें एकवार आधाशीपणाने पाहिलें.

सव्वा वर्षाच्या पोराला मातेच्या कुशींतून दूर ढकलून द्यायला तिचें मन तयार होईना. बापू-साहेब कधींहि सुधारण्याची तिला आशा नव्हती; पण आपल्या पोराला आपण या खाईंत टाकून जावें तिला पटेना. गाईमागें तिचें वासरूं नको का जायला? सुलभेकडे आपण गेलों तर शिकूं; एकादी नोकरी करून स्वतःच्या कमाईनें चार पैसे मिळवून पोटाची खळगी भरूं. पण शरीराच्या भुकेपेक्षां मनाची भूक जास्त तीव्र असते; ती भूक आपण कशी भागवणार? सुलभेनें विचार केला तो तिच्या दृष्टीनें बरोबर असेल. पण लग्नाला आठ वर्षे झालीं तरी ती अजून आई झाली नव्हती. तिला आईच्या वेदना कशा समजणार?

"मग—केव्हां या घरांतून काळं करणार बोल?" बापूसाहेब अटीतटीच्या सुरांत म्हणाले. काय करावें याचा निश्चय न झाल्यामुळें भगवंताला घट्ट, घट्ट छातीशीं आवळून उमा ओक्साबोक्शीं रडूं लागली.

---